ष्टाः पतिता इह ते स्मृताः ॥४३॥ यः स्वशाखां परित्यज्य परशाखां समाश्रयेत् ॥ स शाखारंड इत्युक्तः पतितोऽयमिति स्मृतः ॥४४॥ कितवो वृषली भर्ता ग्राम्यो नीचश्च दुष्कविः ॥ सेवको नृत्यदैवज्ञः षडमी पतिताव्हयाः ॥ ४५ ॥ स्वर्णस्तेयी शाकुनिको दैवानुष्ठानविक्रयी ॥ महापातकिनश्चाथ नवैते पतिताव्हयाः ॥४६॥ सत्राधिकारी यो विप्रो नृपस्यान्यस्य चाज्ञया ॥ पतितः स तु विज्ञेयः कन्याविक्रयिकस्तथा ॥४७॥ देवांस्तीर्थेभ्य आनीय कारयित्वा च कारुभिः ॥ प्रतिमाविक्रयी योऽसौ करोति पतितः स्मृतः ॥४८॥ जीवनार्थं परास्थीनि धृत्वा तीर्थं प्रयाति यः ॥ तीर्थं स पतितो ज्ञेयो यस्य कस्य चिदाज्ञया ॥४९॥ चंडालादंत्यजातेर्वा प्रतिगृण्हाति यो द्विजः। अज्ञानात्तत्स्त्रियो गच्छेत्पतितः सोऽपि कीर्तितः ॥५०॥ ज्ञात्वैव जातिं यो विप्रो गमनं च प्रतिग्रहम् ॥ गच्छेद्गृण्हीत वा भुङ्क्ते स द्विजः पतितः स्मृतः ॥५१॥ तांबूलवाटिकां* कृत्वा तया जीवति यो द्विजः ॥ पतितः स तु विज्ञेयस्तक्रविक्रयिकस्तथा ॥५२॥ वेश्यामाश्रित्य तद्द्रव्यमुपजीवति यो द्विजः ॥ निरंतरं मा-

---

कांहींचें ह्मणणें आहे. जन्मप्रभृति स्वभावतः जे भ्रष्ट असतात त्यांस पतित असें ह्मणतात. (४४) जो आपली शाखा सोडून परशाखेचा स्वीकार करितो तो शाखादंड असें समजतात. तो पतित मानिला आहे. (४५) लबाड मनुष्य, जारिणीचा नवरा, ग्राम्य व नीच दुष्टकवि सेवक, नृत्यज्ञ ( नाच्या), दैवज्ञ ( जोशी ) हे सहा पातकी मानिले आहेत. (४६) सुवर्ण चोरणारा, शकुन सांगणारा, देवाच्या अनुष्ठानाचा विक्रय करणारा हे नऊ पातकी असें मानितात. (४७) राजाच्या किंवा दुसऱ्या कोणाच्या आज्ञेवरून झालेला जो सत्राधिकारी विप्र तो, तसेंच कन्याविक्रय करणारा हे पतित मानिले आहेत. (४८) तीर्थस्थलांहून देवांना आणून कारागिरांकडून प्रतिमा करवून त्या विकणारा तो पतित होय असें समजतात. (४९)कोणाच्याही सांगण्यानें दुसऱ्यांच्या अस्थि घेऊन पोटाकरितां जो तीर्थाला जातो तो पतित समजावा. (५०) चांडालापासून किंवा अंत्यजापासून जो ब्राह्मण दान घेतो तो किंवा अज्ञानानें त्याच्या स्त्रीजवळ जातो तो हे उभयतां पतित मानिले आहेत.(५१) जाति माहित असून जो विप्र तत्स्त्रीशीं गमन करील, हीनाकडून प्रतिग्रह घेईल किंवा भोजन करील तो पतित असें जाणावें. (५२) पानमळा करून उदरपोषण करणारा ब्राह्मण व ताक विकणारा ब्राह्मण हे उभय पतित होत. (५३) कसबि-

---

* वीटिकां.

समेकं ततः स पतितः स्मृतः ॥५३॥ महिषीत्युच्यते भार्या सा च व्यभिचरेद्यदि ॥ तां वीक्ष्य तूष्णीमास्ते यः स तु स्यान्माहिषाऽह्वयः॥५४॥* दानकर्मानुपात्रत्वमेतेषां न हि विद्यते ॥ पतितेष्वेषु यद्दत्तं दाता दुर्गतये स्मृतः ॥५५॥ शूद्रादीनां नमस्कारे योग्याः स्युः पतिता अपि ॥ तेभ्यः श्रेष्ठा इति ज्ञेया बहुमानविधावपि ॥५६॥ अत्रोक्तपतितानेतान् जातु सद्ब्राह्मणादयः ॥ नार्चयेयुरमी श्रेष्ठा यदि ते यांतु× दुर्गतिं ॥५७॥ पतितोऽपि वरो विप्रो न हि शूद्रो जितेंद्रियः ॥ कः परित्यज्य गां दुष्टां खरीं दुग्धवतीं दुहेत् ॥५८॥ स्वस्यायोग्यक्रियायुक्तो यदि शूद्रस्तपश्चरेत् ॥ कृतं तेन तपस्तस्य नरकायैव कल्प्यते ॥५९॥ शूद्रात्किमपि मन्त्रं यो द्विजो गृण्हाति यद्यपि ॥ स शूद्र इति वक्तव्यो न तु ब्राह्मणसंज्ञकः ॥६०॥ एवं ज्ञात्वा स्वधर्मेण ब्राह्मणो ब्राह्मणं यजेत् ॥ ब्राह्मणानां विशेषेण ब्राह्मणो वै गतिर्मतिः ॥६१॥ अनेकजन्मसिद्धानां श्रौतस्मा-

---

णीचा आश्रय करून तिच्या द्रव्यावर जो निरंतर किंवा मासपर्यंत उपजीविका करितो तो पतित असें मानावें. (५४) जर बायको व्यभिचार करील तर तिला महिषी असें ह्मणतात. त्या व्यभिचारिणी बायकोला पाहून जो कानाडोळा करितो त्यास माहिष असें ह्मणतात. (५५) दान करण्यास हे योग्य नव्हत ह्या पाप्याना दान करण्यानें दान करणारा दुर्गतीस जातो. (५६) जरी हे पतित आहेत तरी शूद्रांस वंदनीय आहेत. बहुमानप्रसंगीं त्यांहून हे श्रेष्ठ आहेत असें समजावें. (५७) श्रेष्ठ सज्जन ब्राह्मणांनीं येथें सांगितलेल्या पाप्यांचें पूजन करूं नये; केल्यास तेही दुर्गतीस जातील. (५८) ब्राह्मण पतित झाला तरी तो जितेंद्रिय शूद्राहून प्रशस्त आहे; कारण दुष्ट झाली ह्मणून गाय टाकून दुभती गाढवी घेऊन कोणी दूध काढील काय? (५९) आपणांस अनुचित कर्म करून कोणी शूद्र तपश्चर्या करूं लागला तर तें तप त्याच्या नरकपातास कारण होईल. (६०) शूद्रापासून कोणी द्विज जर मंत्रग्रहण करील तर त्यास शूद्र ह्मणावें, ब्राह्मण ह्मणूं नये (६१) असें जाणून आपल्या धर्मानें ब्राह्मणानें ब्राह्मणाची पूजा करावी. विशेषतः ब्राह्मणांना ब्राह्मणच गति आहे असें मी समजतों. (६२) अनेक जन्मांपासून शुद्ध असलेले, श्रौतस्मार्तकर्मानुष्ठान करणारे व निष्पाप अशा लोकांचीच शंकराच्या ठि-

---

* वेदेभ्यश्च सकर्मभ्य पठनात्पाठकः स्मृतः × यांति.

तोनुवर्तिनां ॥ नराणां क्षीणपापानां शिवे भक्तिः प्रजायते ॥६२॥ बहुधा कृतसत्कर्मफलसंक्षीणकर्मसु ॥ सत्सु शैवी भवेद्भक्तिः पुनरावृत्तिहारिणी ॥ ६३॥ ततो विषयवैराग्यं वैराग्याज्ज्ञानसम्भवः ॥ ज्ञानेन हि परा भक्तिः प्रसादस्तदनंतरं ॥६४॥ प्रसादान्मुच्यते जंतुर्मुक्तः शिवसमो भवेत् ॥ वेदः साक्षाच्छिवो वेदो वेदाध्यायी सदाशिवः ॥६५॥ तस्माद्वेदपरो नित्यं वेदाध्यायिनमर्चयेत् ॥ यो न वेत्ति शिवं तत्त्वं निराभासं निराकुलं ॥ शास्त्रवित् सर्ववेत्तापि चतुर्वेदी पशुस्तु सः ॥ ॐ ॥ मनुष्येषु च ब्राह्मणो यथा विशिष्टो भवति ॥ तथा देवनिकाये महाब्राह्मणः परमेश्वर एव विशिष्टः ॥६६॥

॥ इति श्रीशैवरत्नाकरे तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

---

कार्णीं भक्ति जडते. (६३) अनेक प्रकारें केलेल्या सत्कर्मफलानें ज्यांचा कर्मक्षय झाला आहे अशा सज्जनांचे ठिकाणीं पुनर्जन्म टाळणारी शिवभक्ति उत्पन्न होते. (६४) नंतर ऐहिक विषयांविषयीं वैराग्य ( अप्रीति ) उत्पन्न होतें, वैराग्यापासून ज्ञानोत्पत्ति व ज्ञानापासून उत्कृष्ट भाक्ति हीं उत्पन्न होऊन नंतर प्रसादलाभ होतो. (६५) व प्रसादानें प्राणी मुक्त होऊन शिवसाम्य पावतो. वेद साक्षात शिव आहे व वेदाध्ययन करणारा शिव होय, ह्मणून वेदपरायण होऊन वेदाध्ययन करणाऱ्याचें नित्य अर्चन ( पूजन ) करावें. (६६) जो निश्चित, निराकुल असें शिवतत्व जाणीत नाहीं तो चतुर्वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण असला तरी तो पशुवत् मानावा. (६७) मनुष्यांत जसा ब्राह्मण श्रेष्ठ आहे तसा देवसमूहांत परमेश्वर शिव महाब्राह्मण ह्मणून श्रेष्ठ होय.

याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रन्थांतील तिसरा अध्याय संपूर्ण झाला. ॥ श्रीः ॥ श्रीः ॥

## चतुर्थोऽध्यायः

श्रीगणेशाय नमः ॥ शिवधर्मशास्त्रे ॥ पूर्वमेकार्णवे घोरे नष्टे स्थावरजंगमे ॥ विवादः सुमहानासीद्ब्रह्मविष्णवोः परस्परं ॥ १ ॥ अहं कर्ता त्वहं कर्ता न मत्तोऽन्यो जगत्प्रभुः ॥ एवमाह हरिं ब्रह्मा ब्रह्माणं च हरिस्तथा ॥२॥ तयोर्दर्पापहारार्थं प्रबोधार्थं हि देवयोः ॥ मध्ये समुत्थितं लिंगमैश्वरं तैजसं परं ॥३॥ ज्वालामालावृतं दिव्यमप्रमेयमनौपमं ॥ योजनायुतविस्तीर्णं स्थितं तद्विमलांभसि ॥४॥ ज्वालाभिर्मोहितौ तस्य लिंगस्य सुरसत्तमौ॥ तदा विस्मयमापन्नौ पश्यन्तावमराधिपौ॥५॥ गतावूर्ध्वमधस्तस्य संप्रधार्य परस्परम् ॥ अधो द्रष्टुं गतो विष्णुरूर्ध्वं द्रष्टुं पितामहः ॥६॥ अपश्यन्तावधश्चोर्ध्वं तौ समेत्य परस्परम् ॥ कृतांजलिपुटौ भूत्वा लिंगं तुष्टुवतुस्तदा ॥७॥ नमस्ते ज्ञानलिंगाय शिवलिंगाय ते नमः ॥ नमस्ते गूढलिंगाय परलिंगाय भोगिने ॥८॥ जगत्कारणलिंगाय जगतां पतये नमः ॥ आवयोः पतये नित्यं पतीनां पतये नमः ॥९॥ एवं स्तुत्वा महादेवं प्रणम्य शिरसा पुनः ॥ ब्रह्मविष्णू समापन्नौ

---

श्रीगणेशाय नमः शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं —— पूर्वी एका भयंकर स्थावरजंगमाचा नाश झालेल्या महासागरांत ब्रह्माविष्णूंचा परस्परांशीं मोठा वाद झाला. (२) मी कर्ता आहें, मी कर्ता आहें माझ्याहून दुसरा जगन्नाथ नाहीं; याप्रमाणें ब्रह्माविष्णु परस्परांस ह्मणूं लागले. (३) त्या दोघां देवांचा गर्व हरण होऊन त्यांस ज्ञान व्हावें ह्मणून त्या दोघांमध्यें तेजस्वी व उत्कृष्ट शिवलिंग निर्माण झालें. (४) अग्निज्वालावेष्ठित, दैदीप्यमान, अतर्क्य, अनुपम, दशसहस्र योजन विस्तृत असें तें शिवलिंग त्या स्वच्छोदकांत उत्पन्न होऊन राहिलें (५) त्या लिंगाच्या त्या अग्निज्वाला पाहून ते देवश्रेष्ठ मोहित झाले व मूढ व विस्मित होऊन त्या लिंगाकडे पाहूं लागले. (६) त्या परस्परांनीं विचार करून त्या लिंगाचा अंत पाहण्याकरितां विष्णु खालीं गेला व ब्रह्मदेव वरती गेला, (७) नंतर ते दोघे, खालींवर परस्पर पाहूं लागले. व नंतर हात जोडून लिंगाची स्तुति करूं लागले. (८) हे ज्ञानलिंग, हे शिवलिंग, तुला नमस्कार असो. हे अज्ञेयलिंग, हे श्रेष्ठलिंग हे भोगिलिंग, तुला नमन असो. (९) हे जगन्निर्माणकर्तृलिंग, हे जगत्पते, तुला नमस्कार असो. हे आमच्या स्वामिलिंगा, हे नाथाधिनाथलिंगा, तुला नमन करितों. (१०) ह्याप्रमाणें स्तुति करून त्यांनीं महादेवाला शिरःप्रणाम केला व ते

भक्त्या परमया युतौ॥१०॥जिव्हाचापल्यभावेन ह्यपराधः कृतो मया॥ तत्क्षंतव्यमनौपम्य कस्त्वां स्तौति महार्णवं ॥११॥ लिंगमध्ये परं लिंगं स्थितं प्रादेशसंमितं ॥ समाधिस्तोत्रसंपन्नौ दृष्टवंतौ शिवात्मकं ॥ १२ ॥ नैव तत्कांचनं रौप्यं ताम्रं स्फाटिकमौक्तिकं ॥ लक्षमात्रस्थितं शांतं केवलं तच्छिवात्मकं॥ तयोस्तुष्टो महादेवः प्रददौ वरमुत्तमं॥१३॥ सृष्टिं कुरुष्व हे ब्रह्मन् त्वं पालय जनार्दन ॥ कारणत्वमनुप्राप्य तत्रै-वांतरधीयत ॥१४॥ प्रांजलि प्रणतौ भूत्वा ब्रह्मविष्णू ह्यतःपरं॥ पूर्वं लिं-गं समभ्यर्च्य पश्चात् कार्याणि चक्रतुः ॥१५॥ ब्रह्मा ब्रह्माक्षरैर्दिव्यैर्लिंगं पूजयते सदा ॥ गंधपुष्पादिभिर्नित्यं विष्णुः पूजयते शिवं ॥१६॥ तदा-प्रभृति ब्रह्माद्याः प्रतिष्ठाप्य सुरासुराः॥ तल्लिंगानुकृतं लिंगमीडिता मु-नयः सदा ॥ १७ ॥ परं गूढं शरीरस्थं लिंगक्षेत्रमनादिमत् ॥ यदाद्यमै-श्वरं तेजस्तल्लिंगं पंचसंज्ञकं ॥१८॥ कल्पांते तस्य देवस्य लीयंते सर्व-देवताः ॥ दक्षिणे लीयते ब्रह्मा वामभागे जनार्दनः ॥ १९ ॥ हृदये चैव

---

ब्रह्माविष्णु भक्तियुक्त होऊन परस्परांजवळ आले. (११) जिव्हाचापल्यानें मीं तुझा अपराध केला आहे करितां हे अनुपम शंकरा मला क्षमा कर; हे अगाध-माहात्म्या कोण तुझी स्तुति करणार असें ह्मणूं लागले ( १२ ) त्या थोर लिंगा-मध्यें दुसरें एक वीतभर परशिवात्मक लिंग होतें. तें त्यांनीं समाधी लावून व स्तोत्र करून पाहिलें. (१३) तें सोन्याचें, रुप्याचें, तांब्याचें, स्फटिकाचें किंवा मोत्याचें नव्हतें तर तें केवल शिवस्वरूपी व शांत असें लक्षमात्र राहिलें होतें. त्या दोघांवर श्रीशंकर संतुष्ट झाले व त्यांनीं त्यांस उत्तम वर दिला. (१४) हे ब्रह्म-देवा तूं सृष्टि निर्माण कर व हे जनार्दना तूं तिचें रक्षण कर—नंतर तेथेंच महा-देव अंतर्धान पावले. (१५) नंतर त्या ब्रह्माविष्णूंनीं हात जोडून नमस्कार केला व त्या पूर्वींच्या लिंगाचें पूजन करून आपापलें कार्य करिते झाले. ( १६ ) त्या वेळेपासून ब्रह्मदेव दिव्य ब्रह्माक्षरांनीं लिंगाचें पूजन करितो. व विष्णु गंध, पुष्प, धूप, दीप इत्यादि उपचारांनीं नित्य शिवपूजा करितो. (१७) त्या वेळेपासून ब्र-ह्मादि सर्व देवदानव त्या लिंगाची प्रतिमा स्थापन करून स्तुति करूं लागले. तसेंच पू-जाई सर्व मुनि प्रतिष्ठापना करून पूजन करूं लागले. (१८) शरीरान्तरीं असलेलें परमरहस्य, लिंगक्षेत्र, अनादि, आद्य असें जें ईश्वरी तेज आहे त्यास पंचसंज्ञक-लिंग ह्मणतात. (१९) कल्पांतीं त्या शिवलिंगांत सर्व देवता लीन होतात. दक्षिण भागीं ब्रह्मा लय पावतो व डाव्या भागीं विष्णु लीन होतो. सर्व (२०) वेदांत उ-

गायत्री सर्ववेदोत्तमोत्तमा ॥ लीयंते मूर्ध्नि वै वेदाः सषडंगपदक्रमाः ॥२०॥ जठरे लीयते सर्वं जगत्स्थावरजंगमं ॥ उत्पद्यते पुनस्तस्माद्ब्रह्माद्यं सचराचरं ॥ २१ ॥ आकाशं लिंगमित्याहुः पृथ्वी तस्याधिपीठिका ॥ आलयः सर्वभूतानां लयनाल्लिंगमुच्यते ॥२२॥ तस्माल्लिंगं प्रतिष्ठाप्य सर्वविश्वोद्भवं भवं ॥ स्थापितं तेन सर्वं स्यात् पूजितं न च संशयः ॥ २३ ॥ अथ वातुलतंत्रे तत्त्वभेदपटले ॥ लिंगपीठप्रकारेण कर्मसादाख्यलक्षणं ॥ नादो लिंगमिति ज्ञेयो बिंदुः पीठमुदाहृतं ॥२४॥ नादबिंदुयुतं रूपं कर्मसादाख्यमुच्यते ॥ चत्वारि कर्तृरूपाणि केवलं नादमुच्यते ॥२५॥ लिंगं शंभुरिति ज्ञेयं पीठं शक्तिरुदाहृता ॥ योनिलिंगप्रकारेण जगत्सृष्ट्यर्थकारणं ॥ २६ ॥ कलासंयोगभावत्वात्कर्मरूपमुदाहृतं ॥ बिंदुमध्यगतो नादो नादमध्ये तु मूर्तयः ॥२७॥ मूर्तिमध्यगतं तत्त्वं तत्त्वमध्यगतः शिवः ॥ एतच्छिवमयं लिंगं सर्वतत्त्वालयं स्थितं ॥२८॥ लिंगेन जायते तत्त्वं जगत्स्थावरजंगमं॥ तस्माल्लिंगं विशेषेण कर्मरूपमुदाहृतं ॥२९॥ कर्मोदयाच्च सृष्टिः स्यात् कर्मांते संहृतिर्भवेत् ॥ एतत्क-

---

त्तम जी गायत्री ती हृदयांत अंतर्धान पावते आणि पदक्रमासहित षडंग वेद मस्तकांत लीन होतात. (२१) स्थावरजंगम सर्व सृष्टि पोटांत लय पावते. व नंतर पुनः तेथूनच हें ब्रह्मादि चराचर जगत् उत्पन्न होतें. (२२) आकाशास लिंग असें ह्मणतात व पृथ्वीस त्याचें पीठ अशी संज्ञा आहे. सर्व भूतमात्रांचें लयस्थान ह्मणून त्यास लिंग असें ह्मणतात. (२३) ह्मणून सर्व विश्वाचें उद्भवस्थान अशा लिंगाची ज्यानें स्थापना केली त्यानें सर्व स्थापना करून पूजन केलें असें मानावें याविषयीं संशय नाहीं. वातुलतंत्रांत तत्वभेदपटलांत असें सांगितलें आहे कीं— (२४) लिंगपीठप्रकारानें कर्मसादाख्य लक्षण जाणावें; नादास लिंग असें मानावें व विंदूस पीठ असें ह्मणतात. (२५) नादबिंदुयुक्त रूपास कर्मसादाख्य असें ह्मणतात. चार कर्तृ रूपें आहेत. त्यांस केवलनाद असें ह्मणतात. (२६) लिंगास च शंकर असें समजावें व पीठास शक्ति असें समजावें. योनिलिंगप्रकारानें लिंग जगताच्या उत्पत्तीचें कारण आहे. (२७) कलासंयोगभावानें कर्मरूप सांगितलें आहे. विंदूमध्यें नाद आहे व नादांत मूर्ति आहे असें ह्मणतात. (२८) मूर्तिमध्यें तत्व आहे व तत्वांत शिव आहे. हें शिवमय लिंग सर्व तत्वांचें स्थान असें मानिलें आहे. (२९) स्थावरजंगमात्मक हें जगत् लिंगापासून उत्पन्न होतें ह्माकतां लिंग हें विशेषतः कर्मरूप मानिलें आहे. (३०) कर्मोदयापासून सृष्टि उत्पन्न

मैशरूपं तु सृष्टिस्थितिलयावहं ॥३०॥ पंचसादाख्यसंयोगं कर्मसादाख्यमुच्यते ॥कर्षणादिक्रिया या तु सा कर्मेति निगद्यते॥ तस्माद्वै स्थापनादीनि कर्ममूर्तौ तु कारयेत् ॥ ३१ ॥ अथ लिंगलक्षणम् क्रियासारे ॥ शिवस्य पूजास्थानानि प्रवक्ष्यामि ततः शृणु ॥ सपीठं शिवलिंगं यत्तद्बिंबमिति कीर्तितं ॥३२॥ पूजार्थमुदितो देशो योऽसौ स्थलमुदाहृतं ॥ तत्रापि द्विविधं बिंबं स्थिरं चरमिति स्मृतं॥३३॥स्वयंभु च कृतं बिंबमिति शास्त्रविचक्षणैः ॥ स्थिरे चरे वा लिंगार्चा कर्तव्याऽहरहः सदा ॥३४॥ स्वयंभुविकृते वापि यथालब्धे यथाविधि॥ लिंगं स्वयं समुद्भूतमदृष्टादि यथाश्मनि ॥३५॥ लिंगं यत्तत्स्वयंभु स्यादुत्तमं भुक्तिमुक्तिदं ॥ ऋषिभिः स्थापितं लिंगमार्षं यत्तदुदाहृतं ॥ ३६ ॥ देवैः प्रतिष्ठितं लिंगं दैविकं समुदाहृतं ॥ एवं स्थिराख्यं बहुधा लिंगं सर्वत्र तिष्ठति ॥३७॥ सद्भक्तैरपि संपूज्यं तेषामिष्टार्थसिद्धिदं ॥ नवाष्टसप्तहस्तोच्चं लिंगं स्यादुत्तमं त्रिधा ॥३८॥ षट्पंचचतुर्हस्तोच्चं लिंगं तन्मध्यमं त्रि-

---

होते व कर्मांचा अंत झाला असतां सृष्टिसंहार होतो. हें शिवरूप कर्म सृष्टिस्थितिलयात्मक आहे.(३१)पंचसादाख्य संयोगास कर्मसादाख्य असें ह्मणतात.कर्षणादि जी क्रिया तिला कर्म असें ह्मणतात. ह्मणून स्थापनादि कर्म मूर्तींच्या ठिकाणीं करवावें आतां लिंगलक्षण सांगतात; क्रियासारांत सांगितलें आहे कीं(३२) शिवाचीं पूजास्थानें सांगतों ऐक. सपीठ शिवलिंगास बिंब असें ह्मणतात. (३३) पूजेकरितां जो प्रदेश त्यास स्थल असें ह्मणतात. त्यांत स्थिर व चर असे बिंबाचे दोन प्रकार आहेत. (३४) स्थिर किंवा चरलिंगाची प्रत्यहीं पूजा करावी (३५) स्वयंभु लिंग नसल्यास वेळीं जें लिंग मिळेल त्याची यथाविधि पूजा करावी. लिंगावस्थेस पोंचणें वगैरे जसें दगडांत अदृष्ट (नशीव) स्वयंभूत असतें तसेंच स्वयंभू लिंग आपोआप उत्पन्न होतें. (३६) जें स्वयंभु लिंग असेल तें भोग व मोक्ष देणारें आहे. ऋषींनीं स्थापिलेल्या लिंगास आर्षलिंग असें ह्मणतात. (३७) व देवांनीं स्थापिलेल्यास दैविक लिंग असें ह्मणतात. याप्रमाणें स्थिरलिंग सर्वत्र बहुविध असतें. (३८) सद्भक्तांनीं त्याची पूजा करावी तें त्यांचे इष्टार्थ पुरविणारें आहे. नऊ, आठ किंवा सात हात उंच असलेलें तीन प्रकारचें लिंग उत्तम असें समजतात. (३९) व सहा, पांच, किंवा चार हात उंच असलेलें लिंग मध्यम होय. हे मध्यमाचे तीन प्रकार व तीन, दोन किंवा एक हात उंच असलेलें लिंग

धा ॥ त्रिद्व्येकहस्तमानं यल्लिंगं स्यादधमं त्रिधा ॥ ३९ ॥ एवं नवविधं लिंगमुत्तमादिप्रभेदतः ॥ ब्रह्मविष्ण्वादिदेवैश्च चतुरष्टास्रवर्तुलं ॥ ४० ॥ सद्ब्रह्मसूत्रसहितं लिंगं यत्तत्स्थिरं स्मृतं ॥ स्थिरलिंगं स्थितं यत्र सालयं वाप्यनालयं ॥ ४१ ॥ तत्रैव पूजकः पूजां कुर्वीत चतुरानन ॥ स्वयंभु च कृतं लिंगं चरेऽपि द्विविधं स्मृतं ॥ ४२ ॥ नर्मदाजनितं श्रेष्ठं शिवनाभाव्हयं तथा ॥ महानदीजं श्रीशैले तीर्थेष्वपि च संभवं ॥ ४३ ॥ स्वयंभु लिंगमित्युक्तं भुक्तिमुक्तिफलप्रदं ॥ श्वेतं रक्तं सुवर्णाभं कृष्णं चेति चतुर्विधं ॥ ४४ ॥ लिंगं विप्रादिवर्णानां चतुर्णां क्रमशः स्मृतं ॥ पीठं तस्य तथा ज्ञेयं स्वस्वजातिशिलामयं ॥ ४५ ॥ तदलाभेऽनुलोमेन वर्णेनैवाश्मनापि वा ॥ लिंगस्य देहमानेन पीठमर्धेन गोमुखं ॥ ४६ ॥ वृत्तं वा चतुरस्रं वा पीठं स्वस्य यथा रुचि ॥ वृत्तं डमरुगाकारं सपद्ममय-कुंभकं ॥ चतुरस्रमिदं ब्रह्मन् पीठमेवं द्विधा स्मृतं ॥ ४७ ॥ एवं न चे-त्स्वजात्युक्तं कृष्णलिंगमथापि वा ॥ सर्वेषामेव वर्णानां भुक्तिमुक्तिप्रदं

---

कनिष्ठ असें समजावें ह्याचेहि तीन प्रकार आहेत. (४०) एकूण उत्तम, मध्यम, व अधम या तीन प्रकारांवरून नऊ प्रकारचीं लिंगें झालीं. ब्रह्मदेव, विष्णु इत्यादि देवांनीं वेष्टिलेलें चतुष्कोनी किंवा अष्टकोनी वाटोळें (४१) असें सद्ब्रह्म सूत्रप-रिवेष्टित जें लिंग तें स्थिरलिंग होय असें समजतात. हे ब्रह्मदेवा असें हें स्थिर-लिंग मंदिरासह किंवा मंदिराविना जेथें असेल (४२) तेथें पूजकानें त्याची पूजा करावी. चर लिंगांत स्वयंभु व कृत असे दोन भेद आहेत. (४३) नर्मदेंत उत्पन्न झालेलें शिवनाभ ह्या नांवाचें श्रेष्ठलिंग. तसेंच महानदींत किंवा श्रीशैलपर्वतावर किंवा अन्य तीर्थांत उत्पन्न झालेलें लिंग (४४।४५) यास स्वयंभु असें ह्मणतात. तें लिंग भोगमोक्षफलदायक आहे. ब्राह्मणक्षत्रियादि वर्णक्रमानें पांढरें, तांबडें, पिवळें व काळें अशीं चार प्रकारचीं लिंगें असतात व त्यांचें पीठही स्वजात्यनु-रूप शिळेचें असतें असें जाणावें (४६) तसें न मिळालें तर क्रमशः दुसऱ्या व-र्णांचें घ्यावें. लिंगाच्या आकाराच्या मानानें पीठ असावें, त्याच्या अर्ध्यानें गो-मुख असावें. (४७) तें पीठ वाटोळें किंवा चौकोनी आपल्या आवडीप्रमाणें अ-सावें. डमरूच्या आकारासारिखें वाटोळें किंवा पद्ममय कुंभकाकृति चौकोनी अ-सावें. ह्याप्रमाणें हे ब्रह्मदेवा पीठ दोन प्रकारचें आहे. (४८) आपल्या जात्यनुरूप लिंग न लाभल्यास काळें लिंग सर्व वर्णांना भोग व मोक्ष देणारें आहे असें मा-

स्मृतं ॥ ४८ ॥ लिंगस्य शिवनाभेस्तु न हि पीठप्रकल्पनं ॥ तदाधारः शिवैवास्य तत्तु पीठमिति स्मृतं ॥ ४९ ॥ स्थिरासनं मध्यनाभि हेमरेखाविराजितं ॥ स्निग्धं नेत्रप्रियं यत्र शिवनाभिषु सत्तम ॥५०॥ उत्तमं मध्यमं नीचमिति लिंगं त्रिधोच्यते ॥ एष्वेकैकं त्रिधा तद्वदुत्तमांगुलिमानतः ॥५१॥ नवाष्टसप्तांगुलकं लिंगं श्रेष्ठं तथा स्मृतम् ॥ षट्पंचचतुरंगुलकं मध्यमं तत्स्मृतं तथा ॥५२॥ त्रिद्व्येकांगुलिमानं यत्तत्कनिष्ठं तथा स्मृतम् ॥ एवं नवविधं प्रोक्तं चरलिंगं यथाक्रमात् ॥५३॥ उत्तमं बुद्बुदाकारं मध्यमं कुक्कुटांडवत् ॥ अधमं गोककुष्प्रख्यमिति लिंगं त्रिधा स्मृतम् ॥५४॥ त्रिकोणं फलकाकारं शूलांगं जर्ज्जरं नतं ॥ कपिलं चापि यल्लिंगं तद्गृहस्थो न पूजयेत् ॥५५॥ सुवर्णरौप्य (कांश्य) ताम्रैश्च रत्नैश्च नवभिर्भृशं ॥ स्फाटिकेन कृतं सम्यक् यत्तल्लिंगं चरं स्मृतं ॥५६॥ नवानां रत्नलिंगानां स्वर्णेनैव विनिर्मितम् ॥ पीठं लोहमयं चाश्मलिंगस्य स्फटिकस्य च॥५७॥ अथ शिवधर्मशास्त्रे ॥ इंद्रनीलमयं लिंगं विष्णुः पूजयते सदा॥ विष्णुत्वं प्राप्तवांस्तेन साद्भुतैकं सनातनं॥५८॥

---

निलें आहे.(४९)शिवनाभ लिंगाला पीठ नको; शिवा(पार्वती)हीच त्याचा आधार आहे. तिलाच त्याचें पीठ असें ह्मणतात. (५०) हे सज्जनश्रेष्ठा, नाभीच्या मध्यभागीं सुवर्ण रेखामंडित, सुंदर, नेत्राल्हादक स्थिरासन ज्या शिवनाभ लिंगांत असतें (५१) तें लिंग उत्तम, मध्यम, कनिष्ठ असें तीन प्रकारचें असतें. ह्या एकेकामध्यें अंगुलिमानानें उत्तमादि तीन भेद आहेत. (५२) नऊ, आठ, सात अंगुलिप्रमाणक लिंग तें श्रेष्ठ होय. त्याचे तीन प्रकार आहेत. सहा, पांच, चार अंगुलिप्रमाण लिंग तें मध्यम होय. (५३) त्याचे तीन प्रकार आहेत, तीन, दोन किंवा एक अंगुलिप्रमाण लिंग तें कनिष्ठ असें समजतात त्याचे तीन प्रकार आहेत. याप्रमाणें चर लिंगाचे नऊ प्रकार सांगितले. (५४) बोंबाड्याच्या आकाराचें तें उत्तम, कोंबड्याच्या अंड्याच्या आकाराचें तें मध्यम. व बैलाच्या कोळयाच्या आकाराचें तें कनिष्ठ असें तीन प्रकारचें लिंग आहे. (५५) त्रिकोणाकृति, फलकाकृति, शूलांग, फुटलेलें, वांकलेलें, किंवा कपिल वर्णाचें जें लिंग तें गृहस्थानें पुजूं नये. (५६) सोन्याचें, रुप्याचें, कांशाचें, तांब्याचें, नऊ रत्नांचें किंवा स्फटिकाचें केलेलें जें योग्य लिंग तें चरलिंग होय (५७) नवीन रत्नांनीं केलेल्या लिंगांचें पीठ सोन्याचें केलेलें असावें दगडाच्या लिंगाचें लोंखंडाचें किंवा स्फटिकाचें पीठ असावें, शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं (५८)— इंद्रनीलमय लिंगाचें विष्णु सदैव पूजन करितो त्यानें त्यास अद्भुत व चिरंतन विष्णुत्व प्राप्त झालें.

ब्रह्मा पूजयते नित्यं लिंगं शैलमयं शुभं ॥ तस्य संपूजनात्तेन प्राप्तं ब्रह्मत्वमुत्तमं ॥५९॥ ताम्रलिंगं सदाकालं भक्त्या देवो दिवाकरः ॥ त्रिकालं यजते तेन प्राप्तं सूर्यत्वमुत्तमम् ॥६०॥ मुक्ताफलमयं लिंगं सोमः पूजयते सदा ॥ तेन सोमस्य संप्राप्तं सोमत्वं च ततोज्वलं ॥ ६१ ॥ शक्रोऽपि देवराजेंद्रो लिंगं मणिमयं शुभं ॥ भक्त्या पूजयते नित्यं तेन शक्रत्वमाप्तवान् ॥६२॥ लिंगं रत्नमयं चारु वरुणोऽर्चयते सदा ॥ तेन तद्वरुणत्वं हि प्राप्तं वृध्या समन्वितं ॥ ६३॥ लिंगं हेममयं कांतं धनदोऽर्चयते सदा ॥ तेनासौ धनदो देवो धनदत्वमवाप्तवान् ॥ ६४ ॥ संपूज्य वसवः कांस्यं सर्वान् कामानवाप्नुयुः ॥ नागाः प्रवालजं लिंगं संपूज्यापुः सुखानि च ॥ ६५ ॥ एवं देवाः सगंधर्वाः सयक्षोरगराक्षसाः ॥ पूजयंति सदाकालमीशानं सुरनायकं ॥६६॥ सर्वं लिंगमयं लोके सर्वं लिंगे प्रतिष्ठितं ॥ तस्मात्संपूजयेन्नित्यं यदीछेत्सिद्धिमात्मनः ॥ ६७ ॥ ॐ ॥ तद्यथा ब्रह्मविष्ण्वादिपुरंदरपुरःसराः सर्वे देवासुराः स्वकीयां पदवीमपेक्ष्य लिंगाकारं परमेश्वरमेव सदा यजंति ॥ तथैव श्रीनंद्यादि-

---

(५९)ब्रह्मदेव शुभकारक शिलामयलिंगाचें नित्य पूजन करितो. त्या लिंगार्चनानें त्यास उत्तम ब्रह्मत्व प्राप्त झालें. (६०) सूर्य सर्वकाल तांब्याच्या लिंगाचें भक्तिपुरःसर त्रिकाल पूजन करितो. त्यायोगें त्यास उत्तम सूर्यत्व प्राप्त झालें. (६१) चंद्र मोत्याच्या लिंगाची नित्य पूजा करितो त्यामुळें त्यास उज्वल सोमत्व प्राप्त झालें. (६२) देवराज इंद्र मणिमय शुभदायक लिंगाची पूजा नित्य भक्तिभावानें करितो ह्मणून त्यास इंद्रत्व लाभलें. (६३) वरुण सुंदर रत्नमय लिंगाचें सदैव अर्चन करितो त्यामुळें त्यास वैभवसंपन्न वरुणत्व मिळालें. (६४) कुबेर सोन्याच्या-चकचकीत लिंगाची नेहमीं पूजा करितो ह्मणून ह्या कुबेराला धनदपद लाभलें. (६५) वसूंना कांशाच्या लिंगाची पूजा करून सर्व मनोरथ सिद्धि झाली. नागांनीं पोंवळ्यांच्या लिंगाची पूजा करून राज्य मिळविलें. (६६) ह्याप्रमाणें, गंधर्व, यक्ष, नाग, राक्षस यांसह देव नित्य देवराज शंकराची पूजा करितात. (६७) ह्या लोकांत सर्व कांहीं लिंगमय आहे व लिंगांत सर्व प्रतिष्ठित आहे. ह्याकरितां आपली सिद्धि व्हावी अशी ज्यास इच्छा असेल त्यानें नित्य लिंगार्चन करावें. (६८) ह्याकरितां ब्रह्मदेव, विष्णु, इंद्रप्रभृति सर्व देवदानव आपल्या स्थानाची अपेक्षा धरून लिंगरूपी परमेश्वराचें सर्वकाल पूजन करितात. त्याचप्रमाणें नंद्यादि सर्व

प्रमथगणाः श्रीरुद्रगणाः पुरातनभक्तगणाश्च मृत्युंजयमनश्वरपदप्राप्त्यर्थं "त्रियंबकं यजामहेति" वचनप्रामाण्यान्मृत्योर्मृत्युरूपं परमेश्वरमेव सदाकालं यजंति ॥ शुकवामदेवसनकसनंदनवसिष्ठागस्त्यादिमुनींद्राश्चापवर्गापेक्षया "ब्रह्मलोकपदान्वेषिणो रुद्राराधनतत्परा" इति वचनप्रमाणात् परमेश्वरमेव सदा यजंति ॥ गर्भस्थाश्च सर्वजन्मजरामरणदुःखोपशमनार्थं पुनः संसारनिवृत्त्यर्थं "यदि योन्याः प्रमुंचामि तं प्रपद्ये महेश्वरमिति" वचनप्रामाण्याद्योन्या झटिति निष्क्रम्य "परमेश्वरं यजामह इति" गर्भगता एवं स्मरंतीति ॥ ॐ ॥६८॥ ब्रह्मा विष्णुस्तथा शक्रो लोकपालाश्च देवताः ॥ लिंगार्चनरता ह्येते मानुषेषु च का कथा ॥६९॥ हन्यात्क्रुद्धोऽपि चाकाशं क्षुधार्थं खादयेद्विषं ॥ त्यक्त्वा लिंगार्चनं मूढो मुक्त्यर्थी त्रितयं वृथा ॥७०॥

इति श्रीशैवरत्नाकरे चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

---

प्रमथगण, रुद्रगण, प्राचीन भक्तजन श्रीशंकराचें अक्षयपद प्राप्त व्हावें ह्मणून "त्रियंवकं यजामहे" ह्या वचनाच्या आधारानें मृत्यूचा मृत्यु जो परमेश्वर त्याचें पूजन करितात. शुक, वामदेव, सनक, सनंदन, वसिष्ठ, अगस्त्यप्रभृति ऋषिसमुदाय "मोक्षाच्या इच्छेनें ब्रह्मलोकपदाचा शोध करणाऱ्यांनीं रुद्राराधन तत्पर व्हावें" ह्या वचनावरून नित्य परमेश्वराची पूजा करितो. "गर्भस्थ जीव जन्मजरामरण संबंधी सर्व दुःख शमन व्हावें व पुनःसंसारप्राप्ति न व्हावी ह्मणून योनींतून बाहेर पडल्याबरोबर त्या महेश्वरास शरण जाईन असें ह्मणत असतो." ह्या वचनप्रमाणावरून योनींतून निष्क्रमण झाल्याबरोबर त्या परमेश्वराचें पूजन करूं असें गर्भस्थ जीव स्मरण करीत असतात. (६९) ब्रह्मदेव, विष्णु तसेंच इंद्र, लोकपाल व देवता जर लिंगपूजापरायण आहेत तर मनुष्यांची काय कथा(७०) रागावून आकाशास ठार करूं पाहणारा, क्षुधाशमनार्थ विष प्राशन करणारा व लिंगार्चन सांडून मोक्षाची इच्छा करणारा हे तिघेही व्यर्थ श्रमी होत.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकरग्रंथांतील चौथा अध्याय पुरा झाला. श्रीः श्री.

## पंचमोऽध्यायः

श्रीगणेशाय नमः ॥ क्रियासारे ॥ अथ भव्यानि पूज्यानि यानि द्रव्याणि चार्चने ॥ तानि तेषां प्रवक्ष्यामि लक्षणानि शृणु क्रमात् ॥ १ ॥ वार्गंधाक्षतपुष्पाणि पत्रपीतांबराणि च॥यज्ञोपवीततांबूलधूपदीपकसाधनं ॥ २ ॥ घंटापंचमहाशब्दा नैवेद्याभरणानि च ॥ एतानि पूजाद्रव्याणि प्रोक्तानि चतुरानन ॥३॥ उत्तमं तु नदीतोयं तटाकांभस्तु मध्यमं ॥ कनिष्ठं कूपसलिलं चाभिषेके यथा क्रमं ॥४॥ तत्र स्वादुपयः श्रेष्ठं कनिष्ठं लवणोदकं ॥ मध्यमं मिश्रसलिलमिति वारि त्रिधा स्मृतम् ॥५॥ अभावे स्वादुपयसो मिश्रैरपि च कारयेत् ॥ सरक्तं सकफम् सास्थि सविण्मूत्रं सजांगलं ॥६॥ सोच्छिष्टं सासवं वारि सशवांभः परित्यजेत् ॥ यानि कार्याणि कर्माणि वस्त्रपूतेन वारिणा ॥ तानि सर्वाणि कुर्वीत देवताराधने सदा ॥७॥ सिद्धार्थः कुसुमं दूर्वा कोष्ठं लामज्जकं शशि॥अमूनि चात्र द्रव्याणि पाद्यस्य कथयंति षट्॥८॥ कुशाग्रतिलसिद्धार्थयवव्रीहिपयांसि च ॥ द्रव्याण्यमूनि षट् प्राहुरर्घ्यस्य मुनिपुंगवाः ॥९॥ फलं कचोरं कर्पूरं कोष्ठैलोशीरकानि च ॥ अमून्याच

---

श्रीगणेशाय नमः क्रियासार ग्रंथांत सांगितलें आहे कीं, (१) शिवपूजनास ज्या जिनसा योग्य आहेत त्या सांगून त्यांचीं लक्षणें क्रमशः सांगतों ऐक. (२) जल, गंध, अक्षता, पुष्पें, पत्री, पीतांबर, यज्ञोपवीत विडा, धूप, दीप. (३) पंचमहाशब्दात्मक घंटा, नैवेद्य, अलंकार हीं पूजाद्रव्यें हे ब्रह्मदेवा सांगितलीं आहेत.(४) अभिषेकाला नदीचें पाणी उत्तम, तटाकाचें पाणी मध्यम व विहिरीचें पाणी कनिष्ठ असें मानिलें आहे. (५) त्यांत गोडें पाणी श्रेष्ठ व खारें पाणी कनिष्ठ व मिश्रित ( मचूळ ) पाणी तें मध्यम असे पाण्याचे तीन प्रकार आहेत. (६) चांगलें गोडें पाणी न मिळालें तर मिश्रोदकानें पूजन करावें परंतु रक्त, कफ, हाडें, विष्ठा, मूत्र, यांहीं युक्त किंवा जंगली (७) उच्छिष्ट व ज्यांत दारू किंवा प्रेत आहे असें पाणी मात्र वर्ज्य करावें. देवपूजेंत जीं कांहीं कर्में करावयाचीं तीं नित्य वस्त्रानें गाळलेल्या पाण्यानें करावींत. (८) पांढऱ्या मोहऱ्या, फुलें, दूर्वा कोष्ट, लामजक, व कापूर हीं पाद्याला सहा द्रव्यें सांगितलीं आहेत. (९) कुशाग्रें, तीळ, पांढऱ्या मोहऱ्या, सातु ( जव ), साळी, दूध हीं सहा अर्घ्याचीं द्रव्यें असें मुनिवर्यांचें म्हणणें आहे. (१०) जायफळ, कचोर, कापूर, कोष्ठ, वेलची, वाळा हीं सहा आच

मनीयस्य द्रव्याणि प्रवदंति षट् ॥ १० ॥ स्नपने चरलिंगस्य पंचाढक-मितं जलं ॥ गंधप्रसवकै रत्नमंत्रतोयान्यमूनि च ॥११॥ एतानि ताम्र-कुंभेषु पंच प्रस्थमितेषु च ॥ वस्त्रपूतानि तोयानि समापूर्य विनिक्षिपे-त् ॥१२॥ नंदा सुभद्रा सुरभिः सुशीला सुमनास्तथा ॥ गावः शिवपु-रात्पंच क्षितिं प्राप्ताः शिवाज्ञया ॥१३॥ गोमयं रोचनं मूत्रं दधि क्षीरं घृतं गवां ॥ षडंगानि पवित्राणि सर्वसिद्धिकराणि च ॥ १४ ॥ पयोद-ध्याज्यमध्विक्षुरसैर्मूलेन पंचभिः ॥ ततो गोधूमचूर्णेन घृष्ट्वा कोष्णेन वारिणा ॥१५॥ स्नापयेदनिषिद्धैर्वा मुद्गचूर्णैरलाभतः ॥ स्नापयेदथ गं-धाद्भिः पुष्पाद्भिः स्नापयेदथ ॥ १६ ॥ स्नापयेदथ हेमाद्भी रत्नाद्भिः स्नापयेदथ ॥ स्नापयेदथ मंत्राद्भिः क्रमेणैव समाचरेत् ॥१७॥ शिवध-र्मशास्त्रे ॥ घृताभ्यंगेन लिंगस्य दहेत्सर्वं न संशयः ॥ कल्पकोटिसह-स्रैस्तु यत्पापं समुपार्जितं ॥ १८ ॥ कृष्णाष्टम्यां घृतस्नानं कृत्वा लिंगे सकृन्नरः ॥ कुलैकविंशमुध्दृत्य शिवलोके महीयते ॥१९ ॥ दशापराधं तोयेन क्षीरेण तु शतं क्षमेत् ॥ सहस्रं क्षमते दध्ना घृतेनाप्ययुतं क्षमेत्

---

मनाचीं द्रव्यें असें मानितात. (११–१२) चरलिंगाचे स्नानाकरितां गंध, पुष्पें, रत्नें घालून मंत्रित केलेलें व वस्त्रानें गाळलेलें पांच आढकप्रमाण पाणी पांच प्र-स्थप्रमाण तांब्याच्या घागरींत घालून ठेवावें. (१३) नंदा, सुभद्रा, सुरभि, सुशी-ला, सुमना ह्या पांच गायी शिवपुराहून शंकराच्या आज्ञेनें पृथ्वीवर प्राप्त झाल्या आहेत. (१४) शेण, गोरोचन, मूत्र, दहीं, दूध, तूप, हे गायीपासून मिळणारे सहा पदार्थ सर्वसिद्धिदायक व पवित्र आहेत. (१५) दूध, दहीं, तूप, मधु, उंसाचा रस, ह्या पांच द्रव्यांनीं शिवलिंगास मूलमंत्रानें अभिषेक करावा. नंतर गव्हांच्या पिठानें घासून कोमट पाण्यानें मूलमंत्रानें (१६) स्नान घालावें. गव्हांचें पीठ न मिळाल्यास शुद्ध मुगाच्या पिठानें घासावें. नंतर गंधोदकानें, पुष्पोदकानें, (१७) सुवर्णोदकानें, रत्नमिश्रित उदकानें, व मंत्रोदकानें क्रमशः स्नान घालावें. (१८) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं,–शिवलिंगास घृताभ्यंग (अंगास तूप माखणें) केला असतां मनुष्याचें अनंतकालापासून केलेलें पाप निःसंशय दग्ध होतें.(१९) मानवानें कृष्णाष्टमीचे दिवशीं शिवलिंगास एकवार घृतस्नान घातलें असतां त्याच्या एकवीस कुलांचा उद्धार होतो व तो शिवलोकीं महत्पद पावतो. (२०) पाण्यानें लिंगाभिषेक केला असतां दहा अपराधांची क्षमा होते; दुधानें शंभर अ-पराधांची; दह्यानें हजार अपराधांची; व तुपानें दशसहस्र अपराधांची क्षमा होते.

॥२०॥ लिंगाभिषेकं यः कुर्यात् वस्त्रपूतेन वारिणा ॥ स मुनिः स महासाधुः स योगी च शिवं व्रजेत् ॥२१॥ मंत्राष्टशतजप्तेन विमलेनांभसा शिवं ॥ स्नापयित्वा सकृद्भक्त्या शिवलोके महीयते ॥२२॥ पाटलोत्पलपद्मानि करवीराणि सर्वदा ॥ स्नानतोये योजयिता शिवलोके महीयते ॥२३॥ कर्पूरागरुतोयेन यो लिंगं स्नापयेत्सकृत् ॥ सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोके महीयते ॥२४॥ सितेन भस्मना स्नाप्य भक्त्या लिंगं प्रमोदते ॥ स चंद्रनिर्मलः श्रीमान् शिवलोके महीयते ॥२५॥ पट्टदेवांगचीनादिविचित्राणीतराणि वा ॥ सितानि सूक्ष्मवासांसि रक्तानि प्रीतिकृत्यलं ॥२६॥ कृतशास्त्रोक्तविधिना प्रशस्तानि पितामह ॥ न्याय्यागतानि नूत्नानि हृद्यप्रियाणि दृढानि च॥२७॥ अंशुकानि विशुद्धानि प्रशस्तान्युच्छ्रितान्यपि ॥ वासांसि सुविचित्राणि सारवंति मृदूनि च ॥ धूपितानि शिवे दद्यात् विकेशानि नवानि च ॥ २८ ॥ जीर्णं दग्धं धृतं स्थूलमाखुदष्टं सरंध्रकम् ॥ देवस्वं दुःक्रियायुक्तं वस्त्रेष्वेवं विधं त्यजे-

(२१) वस्त्रानें गाळिलेल्या पाण्यानें जो लिंगाभिषेक करितो तो, मुनि मोठा साधु, व योगी आहे असें समजावें. तो शिवलोकाला जातो.(२२) अष्टोत्तर शतमंत्र जप करून शुद्ध पाण्यानें भक्तिपुरःसर एकवार मनुष्यानें शंकरास स्नान घातलें असतां तो शिवलोकीं महत्पद पावतो. (२३) पाटलपुष्प, निळेंकमल, कमल किंवा कण्हेरीचीं फुलें हीं स्नानाच्या पाण्यांत पूजकानें घालावींत ह्मणजे तो मनुष्य शिवलोकीं महत्व पावतो. (२४) जो मनुष्य पाण्यांत कापूर व अगरु घालून त्या पाण्यानें एकवेळ शिवलिंगास स्नान घालितो तो सर्व पापांपासून मुक्त होऊन शिवलोकांत श्रेष्ठत्व मिळवितो. (२५) पांढऱ्या भस्मोदकानें स्नान घालून जो भक्तीनें शिवलिंगास आनंदित करितो तो भाग्यवान पुरुष चंद्रकिरणांप्रमाणें निर्मल होऊन शिवलोकांत श्रेष्ठ पदास चढतो. (२६) चित्रविचित्र रंगाचीं उत्तम रेशमी वस्त्रें किंवा दुसरीं पांढरीं अगर तांवडीं वस्त्रें देवास प्रिय आहेत; (२७) हे पितामह ( ब्रह्मदेव) तीं शास्त्रोक्त विधीनें केलेलीं प्रशस्त असावींत. तीं न्यायसंपादित, नवीं, सुंदर व मजबूत असावींत. (२८) वस्त्रें जरी उंची असलीं तरी तीं विशुद्ध व प्रशस्त असावींत. रंगित, वळकट, मृदु, सुगंधित, व नवीं केशरहित अशीं वस्त्रें शंकराला अर्पण करावींत. (२९) फाटकें, जळालेलें, वापरलेलें, जड, उंदिरांनीं खाल्लेलें, भोकें पडलेलें, देवाचे मालकीचें, दुष्ट क्रियेनें युक्त असें वस्त्र वर्ज्य

त् ॥ २९ ॥ यावत्तद्वस्त्रतंतूनां संख्यायाः समवस्थितिः ॥ तावद्वर्षसहस्राणि शिवलोके महीयते ॥ ३० ॥ कृतं शास्त्रोक्तविधिना सौवर्णं देवमानतः ॥ सकालधौतं वैकक्ष्यमुपवीतमिति स्मृतं ॥ ३१ ॥ अथवा ॥ मृदु शुक्लं सपीतं च पट्टसूत्रादिनिर्मितम् ॥ दत्वोपवीतं रुद्राय भवेद्वेदांतिकः सुखी ॥ ३२ ॥ चंदनागुरुकर्पूरकुंकुमाद्यनुलेपनं ॥ सप्तान्यमूनि द्रव्याणि न योग्यानीतराण्यपि ॥ ३३ ॥ गंधानुलेपनात्पुण्यं द्विगुणं चंदनस्य च ॥ चंदनादगुरोर्ज्ञेयं पुण्यमष्टगुणाधिकं ॥३४॥ कृष्णागुरोर्विशेषेण द्विगुणं फलमिष्यते ॥ तस्माच्छतगुणं पुण्यं कुंकुमस्य विधीयते ॥ ३५ ॥ चंदनागुरुकर्पूरैः श्लक्ष्णपिष्टैः सकुंकुमैः ॥ लिंगं लिंपेच्च यो वै स शिवलोके महीयते ॥ ३६ ॥ सौवर्णे तारकारौप्यपीठोपर्यधरे त्वपि ॥ शोभार्थं पंक्तिरूपेण न्यसेदितरतोपि वा ॥३७॥ स्वर्णेन वाथ रौप्येण शुद्धसौराष्ट्रकेन वा ॥ कृत्वा बुद्बुदवत्सूक्ष्मचषकान् द्वारसंमितान् ॥३८॥ तान् रंध्रं द्वितयं कुर्यात्प्रत्येकं सकलानपि ॥ सूत्रेण प्रोत्य मालां वा द्वारस्योपरि बंधयेत् ॥ ३९॥ एषा नक्षत्रमालाख्या करणी-

---

करावें. (३०) वस्त्रांतील तंतूंच्या संख्ये इतकीं सहस्त्र वर्षें तो पुरुष शिवलोकांत महत्व पावेल. (३१) देवप्रमाणानें शास्त्रोक्त विधीनें सोन्याचें केलेलें, योग्यकालीं धुतलेलें व काखेखालून खांद्यावर घ्यावयाचें जें आभरण त्यास उपवीत असें ह्मणतात. (३२) अथवा नरम, शुभ्र व पिंवळें कापसाच्या सुताचें केलेलें असें उपवीत शंकरास देऊन वेदान्तिकानें सुखी व्हावें. (३३) चंदन, अगरु, कर्पूर, कुंकुम, वगैरे सात अनुलेपन द्रव्यें होत इतर अनुलेपनास योग्य नव्हत. (३४) सुवासिक गंधाच्या लेपनापेक्षां चंदनाच्या लेपनाचें दुप्पट पुण्य आहे. चंदनलेपापेक्षां अगरुलेपाचें पुण्य आठपट अधिक आहे. (३५) त्याहून काळ्या अगरूच्या लेपनाचें विशेषतः दुप्पट फल सांगितलें आहे. त्याहून कुंकुमाच्या लेपाचें पुण्य शंभरपट अधिक सांगितलें आहे. (३६) चंदन, अगरु, कापूर हीं कुंकुमांत कुटून उत्तम बारीक करून तो लेप शिवलिंगास अर्पण केला असतां तो मनुष्य शिवलोकांत महत्व पावतो. (३७) सोन्यारुप्याचे पठिावर व खालीं शोभेकरितां पंक्तीनें तारका ठेवाव्यात व इतरत्रहि ठेवाव्यात. (३८) सोन्याचे, रुप्याचे अथवा सौराष्ट्रधातूचे बुडबुड्याप्रमाणें लहान लहान पेले दाराला शोभादायक असे करून (३९) त्या सर्वांस दोन दोन भोकें करून त्यांची माला करावी व ती दारावर बांधावी. (४०) ही नक्षत्रमाला श्रीमंतांनीं करावी. न मोडलेले शंखाप्रमाणें पांढरे शुभ्र व

या धनेश्वरैः ॥ अभिन्नाः शंखवच्छ्वेताः सुस्निग्धा व्रीहितंडुलाः॥४०॥ स्मृताः स्युरर्चने योग्या नेतराश्चतुराननं॥ पुष्पैः कतिविधैः पूजा कर्तव्या कथयस्व मे ॥४१॥ पुष्पैरारामसंभूतैः पत्रैर्वा गिरिसंभवैः॥ अपर्युषितनिश्छिद्रैः प्रोक्षितैर्जंतुवर्जितैः ॥ ४२ ॥ आत्मारामोद्भवैर्वापि पुष्पैः संपूजयेत् शिवं ॥ अर्कारग्वधनीरेजनंद्यावर्तकजातयः ॥४३॥ करवीरबकद्रोणवृहतीनवमालिकाः ॥ मल्लिकोत्पलपुन्नागकदंबाशोकचंपकाः ॥४४॥ सेवंतीकर्णिकाराख्यत्रिसंध्यारक्तकेसराः ॥ सितकांचनधत्तुरास्तथा लोहितकांचनाः ॥४५ ॥ पलाशः पाटलीत्येषां प्रशस्ताः प्रसवाः स्मृताः॥बिल्वापामार्गकश्चूतो दमनो मरवोऽर्जकः॥४६॥ दूर्वा तुलसिकांकोलो गौरी सुरभिका शमी ॥ ढुंडीकांतारदमनो भृंगारः पारिभद्रकः ॥४७॥ जंवू कुशाग्र इत्येके प्रशस्ताः पत्रसंग्रहे॥ पूर्वोक्तकुसुमालाभे पत्रैरेतैः शिवं यजेत् ॥४८॥ पत्राणामप्यलाभे तु पुष्पजातिदलैर्यजेत् ॥ विना धत्तूरनीरेजपलाशोत्पलकांचनात् ॥४९॥ सनालैः सदलैः पक्वैः प्रत्यग्रै-

---

तेजस्वी साळीचे तांदूळ (४१) शंकरपूजेस योग्य असें मानिलें आहे. हे ब्रह्मदेवा इतर प्रकारचे तांदूळ पूजेस योग्य नव्हत. किती प्रकारच्या फुलांनीं पूजा करावी हें मला सांग. (४२) बागेंतील फुलांनीं व डोंगरांतील पत्रीनें पूजा करावी. तीं शिळीं, किड्यांनीं न खाल्लेलीं व भोकें नसलेलीं असावींत व त्यांवर पाणी शिंपडलेलें असावें. (४३) किंवा आपल्या बागेंतील फुलांनीं शिवपूजन करावें; रुईचीं फुलें, बाहव्याचीं फुलें, कमलें, नंद्यावर्तकाचीं फुलें, जाईचीं फुलें,(४४) कण्हेरीचीं फुलें, बकुळीचीं फुलें, द्रोणफुलें, रिंगणीचीं फुलें, बटमोगरा, मोगरा, चंद्रविकासिनी कमलें, उंडलीचीं फुलें, कळंबाचीं फुलें, अशोकाचीं फुलें, सोनचांपा (४५) शेवंतीचीं फुलें, पांगाऱ्याचीं फुलें, त्रिसंध्या, रक्तकेसर, सितधोतरा, कांचनधोतरा त्याचप्रमाणें तांबडा कांचन, (४६) पळसाचीं फुलें, पाटलकुसुमें हीं फुलें प्रशस्त मानिलीं आहेत. व बेल, अपामार्ग, आंबा, दवणा, मरवा, अर्जक, ह्यांची पत्री (४७) व दूर्वा, तुळसी, कांकोल, गौरी, सुरभिका, शमी, ढुंडीकांतर, दवणा, भृंगार, देवदार (४८) जांब, कुशाग्र हीं झाडें पत्री घेण्यास प्रशस्त होत. मागें सांगितलेलीं फुलें मिळालीं नाहींत तर या पत्रीनें शिवपूजन करावें. (४९) पत्री न मिळेल तर धोतरा, कमल, पळस, उत्पलकांचन यांचीं पानें सोडून इतर फुलांच्या झाडांच्या पानांनीं पूजन करावें. (५०) देंटासकट, पानासहित, प्रफुल्लित, नव्या, व सुंदर

नैयनप्रियैः ॥ पुष्पैर्यथोचितैरेवंविधैराराधयेच्छिवं ॥५०॥ यान्यबद्धानि पुष्पाणि पत्राण्यपि तथैव च ॥ तानि देयानि मंत्रेण बध्वा शोभार्थमर्चयेत् ॥५१॥ पट्टदेवांगचीनानां सूत्रं च तदलाभतः ॥ कार्पासं पुष्पसंदर्भे स्यान्नोचेद्वल्कलस्य वा ॥५२॥ पुष्पजातिविशेषेण भवेत्पुण्यं ततोऽधिकं ॥ अर्कस्य पुष्पमेकं तु शिवाय विनिवेदयेत् ॥५३ ॥ तपःशीलगुणोपेते सुपात्रे वेदपारगे ॥ दश दत्वा सुवर्णानि यत्फलं तदवाप्नुयात् ॥५४॥ अर्कपुष्पसहस्रेभ्यः करवीरं विशिष्यते ॥ करवीरसहस्रेभ्यो विल्वपत्रं विशिष्यते ॥ ५५ ॥ विल्वपत्रसहस्रेभ्यः पद्ममेकं विशिष्यते ॥ पद्मपत्रसहस्रेभ्यः पुंडरीकं विशिष्यते ॥५६॥ पुंडरीकसहस्रेभ्यः शतपत्रं विशिष्यते ॥ शतपत्रसहस्रेभ्यः सहस्रारं विशिष्यते ॥ सहस्रारसहस्रेभ्यो बकपुष्पं विशिष्यते ॥ ५७ ॥ बकपुष्पसहस्रेभ्यः एकं धत्तूरपुष्पकम् ॥ धत्तूरकसहस्रेभ्यो बृहत्पुष्पं विशिष्यते ॥५८॥ बृहत्पुष्पसहस्रेभ्यः श्वेतमंदारकं शुभम् ॥ मंदारकसहस्रेभ्यो द्रोणपुष्पं विशिष्यते ॥५९॥ द्रोणपुष्पसहस्रेभ्यो ह्यपामार्गं विशिष्यते ॥६०॥ अपामार्गसह-

---

अशा योग्य फुलांनीं शिवपूजन करावें. (५१) मोकळीं फुलें व पानें असतील तीं मंत्रानें शिवार्पण करावीत. व कांहींच्या माळा करून शोभेकरितां पूजाकालीं समर्पण कराव्यात. (५२) फुलांची माळ करण्याकरितां पट्ट, देवांग, किंवा चीन ह्या नांवाच्या रेशमी वस्त्रांचा दोरा घ्यावा. तो न मिळेल तर कापसाचा व तोहि नसल्यास वल्कलाचा दोर घ्यावा. (५३) पुष्पाच्या जातीप्रमाणें पूजकास कमीजास्त पुण्याचा लाभ होतो. ह्मणून अर्कपुष्प निदान एक तरी शिवार्पण करावें. (५४) तप, शील ( वर्तन ) गुण यांनीं युक्त अशा सुपात्र व विद्वान मनुष्यास दहा सुवर्णाचीं नाणीं दिलीं असतां जें पुण्य तेंच पुण्य एक अर्कपत्र शिवार्पण केल्यानें मिळतें. (५५) हजारो अर्क फुलांपेक्षां कण्हेरीचें फूल विशेष आहे. हजारो कण्हेरीच्या फुलांपेक्षां विल्वपत्र अधिक आहे. (५६) हजारो वेलांच्या पानांपेक्षां एक कमल श्रेष्ठ आहे. पद्मपुष्पांपेक्षां पांढरें कमल श्रेष्ठ आहे. (५७) हजारो पांढऱ्या कमलांपेक्षां शतपत्र विशेष आहे. हजारो शतपत्रांपेक्षां सहस्रपत्र (कमल) विशेष आहे. हजारो सहस्रपत्रकमलांपेक्षां बकपुष्प विशेष आहे. (५८) हजारो बकपुष्पांपेक्षां धोतऱ्याचें फूल विशेष आहे. हजारो धोतऱ्याच्या फुलांपेक्षां बृहतपुष्प विशेष आहे. (५९) एक हजार बृहतीपुष्पांपेक्षां श्वेतमंदारपुष्प श्रेष्ठ आहे. हजारो मंदारपुष्पांपेक्षां द्रोणपुष्प श्रेष्ठ आहे. (६०) हजारो द्रोणपुष्पांपेक्षां अपामार्गपुष्प अधिक श्रेष्ठ आहे.

स्रेभ्यः कुशपत्रं विशिष्यते ॥ कुशपत्रं सहस्रेभ्यः शमीपत्रं विशिष्यते ॥६१॥ शमीपत्रसहस्रेभ्यो व्याघातं तु विशिष्यते ॥ व्याघातानां सहस्रेभ्यः शंखपुष्पं विशिष्यते ॥६२॥ शंखपुष्पसहस्रेभ्यो व्याघ्रपुष्पं विशिष्यते ॥ व्याघ्रपुष्पसहस्रेभ्यः सदाभद्री विशिष्यते ॥ ६३ ॥ सदाभद्रीसहस्रेभ्यः कृष्णनिर्गुंडिका परा ॥ कृष्णनिर्गुंडिकायाश्च बृहत्पुष्पं विशिष्यते ॥६४॥ बृहत्पुष्पसहस्रेभ्यः श्वेतार्कं तु विशिष्यते ॥ श्वेतार्कानां सहस्रेभ्यो बृहद्द्रोणं विशिष्यते ॥ ६५ ॥ बृहद्द्रोणसहस्रेभ्यः सदानीलं विशिष्यते ॥ सदानीलसहस्रेभ्यः स्वर्णपुष्पं विशिष्यते ॥ सर्वपुष्पसहस्रेभ्यो भक्तिरेका विशिष्यते ॥६६॥ नीलोत्पलसहस्रेण यो मालां संप्रयच्छति ॥ शिवाय विधिवद्भक्त्या तस्य पुण्यफलं शृणु ॥६७॥ कल्पकोटिसहस्राणि कल्पकोटिशतानि च ॥ वसेच्छिवपुरे श्रीमान् शिवतुल्यपराक्रमः ॥ ६८ ॥ करवीरसमा ज्ञेया जातिर्विजयपाटला ॥ नागचंपकपुन्नागधत्तूरकुसुमं स्मृतं ॥ ६९ ॥ श्वेतमंदारकुसुमं सितपद्मसमं भवेत् ॥ कनकानि कदंबानि रात्रौ देयानि शंकरे ॥७०॥ दिवा शेषाणि

---

(६१) हजारो अपामार्गपुष्पांपेक्षां कुशपत्र विशेष आहे हजारो कुशपत्रांपेक्षां शमीपत्र विशेष आहे. (६२) हजारो शमीपत्रांपेक्षां व्याघातपुष्प श्रेष्ठ आहे. हजारो व्याघातपुष्पांपेक्षां शंखपुष्प अधिक श्रेष्ठ आहे. (६३) हजारो शंखपुष्पांपेक्षां व्याघ्रपुष्प श्रेष्ठ आहे. हजारो व्याघ्रपुष्पांपेक्षां सदाभद्रीपुष्प श्रेष्ठ आहे. (६४) सदाभद्रीच्या हजारो पुष्पांपेक्षां कृष्णनिर्गुंडिका श्रेष्ठ आहे. कृष्णनिर्गुंडिकेपेक्षां बृहत्पुष्प अधिक उत्तम आहे. (६५) हजारो बृहत्पुष्पांपेक्षां पांढरे रुईचें पुष्प श्रेष्ठ आहे. हजारो पांढऱ्या रुईच्या फुलांपेक्षां बृहद्द्रोणपुष्प उत्तम होय. (६६) हजारो बृहद्द्रोणपुष्पांपेक्षां सदानीलपुष्प विशेष आहे. हजारो सदानीलपुष्पांपेक्षां स्वर्णपुष्प अधिक श्रेष्ठ आहे, सर्व पुष्पांपेक्षां भक्तीच केवळ श्रेष्ठ आहे. (६७) हजार नीलकमलांची माळ भक्तिपुरस्कर जो विधिवत् शिवाला अर्पण करितो त्याचें पुण्यफल सांगतों ऐक. (६८) जो वरील प्रकारची माळा शिवार्पण करितो तो पुरुष हजारो कोटि कल्पपर्यंत शिवाप्रमाणें पराक्रमी व श्रीमान होऊन शिवपुरांत राहतो. (६९) जातिपुष्प व विजयपाटलपुष्प हीं कण्हेरीच्या फुलासमान जाणावीं. नागचांफा, पुन्नाग, धत्तूर हीं फुलें सम जाणावींत. (७०) पांढऱ्या मंदाराचें फूल पांढऱ्या कमलाप्रमाणें जाणावें. कदंबाचीं सुवर्णपुष्पें रात्रौ शंकरास अर्पण करावींत. (७१) बाकीचीं

पुष्पाणि दिवारात्रौ तु मल्लिका ॥ प्रहरं तिष्ठते जाती करवीरमहर्निशं ॥७१॥ बिल्वपत्रैरखंडैश्च सकृल्लिंगं प्रपूजयेत् ॥ सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोके महीयते ॥ ७२ ॥ पुष्पाणामप्यलाभे तु पत्राण्यपि निवेदयेत् ॥ पत्राणामप्यलाभे तु फलान्यपि निवेदयेत् ॥७३॥ फलानामप्यलाभे तु तृणगुल्मौषधैरपि ॥ औषधीनामलाभे तु भक्त्या भवति पूजितः ॥ ७४ ॥ केतकी जाति मुक्तं च कुंदयूधिकदंबकाः ॥ शिरीषसर्जबंधूककुसुमानि विवर्जयेत् ॥ ७५ ॥ अंकोलपत्रकुसुमकरंजेंद्रतरूद्भवं ॥ वैभीतकानि पत्राणि कुसुमानि विवर्जयेत् ॥ ७६ ॥ गंधहीनमपि ग्राह्यं पवित्रं यत्कुशादिवत् ॥ गंधवंत्यपवित्राणि यानि तानि विवर्जयेत् ॥ सदुग्धकंटकैः पत्रैर्जलजैरपि नार्चयेत् ॥ ७७ ॥ अत्रोक्तपत्रपुष्पाणि छित्वा तैर्न शिवं यजेत् ॥ कीटकैरपि विद्धानि जीर्णपर्युषितानि च ॥७८॥ स्वयंपतितपुष्पाणि त्यजेदुपहतानि च ॥ मुकुलैर्नार्चयेद्देवमपक्वं न निवेदयेत् ॥७९॥ फलं कुंचितविद्धं च यत्तत्पक्वमपि त्यजेत् ॥ अज्ञानाज्ज्ञानतो वापि न विरुद्धकुसुमैर्यजेत् ॥८०॥ आत्मार्थं वा परार्थं वा तत्सर्वं

---

फुलें दिवसा शिवार्पण करावींत परंतु मल्लिकापुष्पानें दोन्ही वेळां ( रात्रंदिवस ) पूजा करावी. जाईचें फूल एक प्रहरपर्यंत राहतें, कण्हेरीचें पुष्प रात्रंदिवस राहतें. (७२) अखंड बिल्वपत्रांनीं एकवार लिंगपूजन करावें ह्मणजे तो पूजक सर्व पापांपासून मुक्त होऊन शिवलोकीं महत्व पावतो. (७३) पुष्पें न मिळालीं तर पत्री शिवार्पण करावी. पत्री न मिळाली तर फळें अर्पण करावींत. (७४) तींहि न मिळालीं तर गवत वगैरे वनस्पति अर्पण करावी. व वनस्पतीहि जर मिळाली नाहीं तर भक्तीनेंच शिवपूजन होतें. (७५) केतकी, जातिमुक्त, कुंद, यूधि, कदंब, शिरीष, सर्ज, व बंधूक हीं फुलें शिवपूजेस वर्ज्य होत. (७६) अंकोलपत्र किंवा कुसुम, करंजाचीं व इंद्रवृक्षांचीं फुलें व वैभीतकपत्रें व फुलें शिवपूजेस निषिद्ध आहेत. (७७) कुश इत्यादिप्रमाणें पवित्र असून वासरहित असलें तरी तें फूल स्वीकारावें परंतु सुगंधी असून अपवित्र असलेलीं फुलें वर्ज्य करावींत. दूध ( रस ) गळत असलेली किंवा कांटे असलेली पत्री किंवा अशीं कमळें देखील शिवार्पण करूं नयेत. (७८) आतांपर्यंत सांगितलेलीं फुलें किंवा पत्री हीं फाडून त्यांनीं शिवपूजन करूं नये. किड्यांनीं खाल्लेलीं जुनीं व शिळीं (७९) गळून पडलेलीं, पायदळ झालेलीं फुलें व कळ्या किंवा न फुललेलीं फुलें यांनीं शिवपूजन करूं नये. (८०-८१) फळ पिकलेलें असून जर ताठरलेलें ( वांकडें ) किंवा फुटलेलें असेल

नाशमाप्नुयात् ॥ मल्लिकोत्पलपद्मैश्च जातिपुन्नागचंपकैः ॥ ८१ ॥ अशोकश्वेतमंदारकर्णिकारवकैरपि ॥ करवीरार्कमंदारशमीनागरकेसरैः ॥८२॥ कुशापामार्गकुसुमैः कदंबद्रोणकैरपि ॥ पुष्पैरन्यैर्यथालाभं यो नरः पूजयेच्छिवं ॥ ८३॥ स यत्फलमवाप्नोति तदेकाग्रमनाः शृणु ॥ सूर्यकोटिप्रतीकाशैर्विमानैः सर्वकामिकैः ॥८४॥ पुष्पमालापरिक्षिप्तैर्गीतवादित्रनादितैः ॥ तंत्रीमधुरवाद्यैश्च स्वच्छंदगमनालसैः ॥८५॥ रुद्रकन्यासमाकीर्णैर्देवदानवदुर्लभैः ॥ दोधूयमानैरमरैः स्तूयमानः सुरासुरैः ॥ गच्छेच्छिवपुरं दिव्यं यत्र वा रुचिरं भवेत् ॥ ८६ ॥ लैंगे॥ गवां कोटिप्रदानेन विधिवत्तेन यत्फलम् ॥ लिंगे न्यस्तैकपुष्पस्य सहस्रांशं न पूरयेत् ॥८७॥ यो दद्यात्कांचनं मेरुं सस्यपूर्णां वसुंधरां ॥ लिंगे न्यस्तैकपुष्पस्य सहस्रांशं न पूरयेत् ॥ ८८ ॥ मातृविप्रसतीमित्रभ्रातृ

---

तर तें शिवार्पण करूं नये. जो पूजक आपल्या करितां किंवा दुसऱ्या करितां ज्ञानानें किंवा अज्ञानानें निषिद्धपुष्प शिवार्पण करितो त्याचा नाश होतो. मोगरी, कमळें, जाई, उंडलीचीं फुलें नागचांपा (८२) अशोकपुष्पें, पांढरा मंदार, कर्णिकापुष्पें वकपुष्पें, कण्हेरीचीं फुलें, रुईचीं फुलें, मंदारकुसुमें, शमी पत्रें, नागकेशर (८३) कुशपुष्पें, अपामार्गपुष्पें, कळंबाचीं फुलें द्रोणफुलें तसेंच दुसऱ्या फुलांनीं वेळेस मिळतील त्यांनीं जो शिवपूजन करितो (८४) त्यास जें फल मिळतें तें सांगतों. एकाग्रमनानें श्रवण कर. कोटि सूर्यांप्रमाणें चमकणारीं, सर्व इष्ट पुरविणारीं (८५) पुष्पमालांनीं अलंकृत केलेलीं, गायनवादनयुक्त, मधुर वाद्यांसहित, यथेच्छ मंदमंद गमन करणारीं, (८६) रुद्रांच्या मुलींनीं वेढिलेलीं, सुरासुरांसहि न मिळणारीं, देवांकडून हलविलीं जाणारीं, अशीं विमानें असतात त्यांतून तो पूजक देव व असुर यांनीं केलेला स्तुतिपाठ श्रवण करीत शिवपुरास जातो व तेथें तो आनंद पावतो. (८७) लिंगपुराणांत सांगितलें आहे कीं—शास्त्रोक्त रीतीनें एक कोट गोप्रदान केल्याचें जें पुण्य तें शिवलिंगावर एक पुष्प अर्पण केलें असतां लाभणाऱ्या पुण्याच्या हजारांशा एवढेंहि होणार नाहीं. (८८) जर कोणी सुवर्णाचा मेरुपर्वत करून किंवा धान्याच्या पिकानें भरलेली पृथ्वी हीं दान केलीं तर त्या दानाचें पुण्य शिवलिंगावर एक पुष्प अर्पण केलें असतां प्राप्त होणाऱ्या पुण्याच्या हजाराव्या हिश्याची बरोबरी करूं शकणार नाहीं. (८९) आई, भार्या, विप्र, मित्र भाऊ गाय यांस ठार मारल्यानें लागणारें पातक शिवलिंगास पुष्पपूजा केल्यानें

गोवधसंभवम् ॥ पातकं विलयं याति पुष्पपूजाफलेन वै ॥ ८९ ॥ जलं वा पुष्पमेकं वा लिंगस्योपरि निक्षिपेत् ॥ अमंत्रं वा समंत्रं वा कुलकोटिं समुद्धरेत् ॥९०॥ किंचिज्जलं वा चुलकोदकं वा देवेंद्रलक्ष्मीं ददते ददाति ॥ आदानदाने जगदेकबंधो मुग्धो भवान् सर्वसुरेषु देव ॥९१॥ तृटिमात्रं तु यो दद्याद्देवलिंगस्य मूर्धनि ॥ इंद्रस्यार्धासने तावद्यावदिंद्राश्चतुर्दश ॥९२॥ यः कुर्याच्च शिवाराममाशु बिल्वादिशोभितम् ॥ यावत्तत्पत्रकुसुमं बीजपूर्णफलानि च ॥९३॥ तावद्वर्षसहस्राणि शिवलोके महीयते ॥ ॐ ॥ देवार्थमेकपात्रं तु पुष्पादिद्रव्यसंचयं॥ सौवर्णं राजतं ताम्रमिति पात्रं त्रिधा स्मृतं ॥९४॥ सार्धप्रस्थमितं पात्रमर्घ्याद्यखिलकर्मसु ॥ अर्घ्यादीनां त्रिपात्राणां सामान्यक्षालपात्रयोः ॥९५॥ शंखस्वर्णादिपात्राणां स्पृष्टदोषो न विद्यते ॥ दारुमृत्पात्रयोरस्ति स्पृष्टिदोषोऽत्यजातिभिः ॥९६ ॥ देवलात्रेयिकोच्छिष्टजनाशौचजनैरपि ॥ अस्पृश्या दारुमृद्भांडाःस्पृष्टाश्चेदपि तान् त्यजेत् ॥ ९७ ॥ कांस्यपात्रमपि द्रौममलाभे मृण्मयं तु वा ॥ अर्घ्यादीनां न योग्यानि भि-

---

नष्ट होते. (९०) शिवलिंगावर पाणी किंवा एक फूल घातलें असतां मग तें समंत्रक असो वा अमंत्रक असो, त्यानें कोटि कुलांचा उद्धार होतो. (९१) शिवलिंगावर यत्किंचित किंवा ओंजळभर पाणी घातलें असतां त्यांत इंद्रैश्वर्य लाभतें. दान करण्यास किंवा घेण्यास, हे सर्व देवाधिदेवा शंकरा तूंच समर्थ आहेस. (९२) शिवलिंगाच्या मस्तकावर जो बिंदुमात्र जल घालितो त्यास चौदा इंद्र असततोंपर्यंत इंद्राचें अर्धे आसन मिळतें. (९३) जो मनुष्य शंकराचा बाग बिल्ववृक्ष लावून सुशोभित करितो तो तेथील बिल्ववृक्षांच्या पान, बीज, फल यांच्या संख्येच्या मानानें (९४) हजारो वर्षेपर्यंत शिवलोकांत महत्व पावतो. पुष्पें वगैरे पूजाद्रव्य ठेवण्याचें देवाचें भांडें सोन्याचें, रुप्याचें, किंवा तांब्याचें असें तीन प्रकारचें असतें. (९५) अर्धप्रस्थ प्रमाणाचें पात्र अर्घ्य वगैरे कर्मांस असावें; अर्घ्यवगैरे तीन पात्रांना एक सांडपाण्याचें भांडें असावें. (९६) शंख, सोनें, रुपें वगैरेंच्या भांड्यांना स्पर्शदोष नाहीं; लांकूड, माती यांच्या भांड्यास अंत्य जातीचा स्पर्श झाला असतां स्पर्शदोष आहे. (९७) देवल, अत्रेयिक, उच्छिष्ट ह्या अस्पर्श लोकांनीं लांकडाच्या किंवा मातीच्या भांड्यांस स्पर्श करूं नये व त्यांचा स्पर्श झाल्यास तीं टाकून द्यावींत. (९८) कांशाचें किंवा लांकडाचें पात्र न मिळाल्यास मातीचें

ऽपात्राणि जातुचित् ॥९८॥ अभिन्नानि विशुद्धानि पात्राण्येवं भवंति हि ॥ ताम्रस्फटिकशंखेषु सुवर्णकलधौतयोः ॥ न विद्यते भिन्नदोषो द्रव्येष्वन्येषु विद्यते ॥९९॥ शंखः शुद्धो भवेत्तत्र तुषसंघर्षणेन च ॥ आम्लेन ताम्रकं भूत्या कांस्यं चूर्णेन पित्तलं ॥१००॥ पलालेनाथ व्रीहीणां पात्रे पित्तललोहके ॥ संघर्षयेद्विशुध्यर्थं कांतिप्रसरणाय च ॥ १०१ ॥ चत्वार्येतानि पात्राणि वारिणा क्षालयेत्ततः ॥ हैमं रौप्यं विशुद्धं स्यात्केवलं क्षालनाज्जलैः ॥१०२॥ पात्रं गोकर्णवत्कुर्यात् यथोक्तं च विधानतः ॥ तेषामलाभे पात्राणां नालिकेरस्य पात्रकं ॥ १०३ ॥ सुवर्णं रजतं ताम्रं कांस्यं लोहं च पित्तलं ॥ चरार्चनार्थं कुर्वीत पीठमेतैश्चतुर्मुख ॥१०४॥ खदिरो मधुकोऽश्वत्थः प्लक्षः सुरमहीरुहः ॥ उदुंबरः पीतसारो न्यग्रोधोऽथ विकंकतः ॥ १०५ ॥ जंबूकदंबबकुलबिल्वपुन्नागचंपकाः ॥ पालाशः पाटली चूतः कर्णिकारश्च कांचनः ॥१०६॥ एते द्रुमाः प्रशस्ताः स्युः पीठकर्मणि वा विधे ॥ सर्वेषामेव वृक्षाणां प्रशस्तो रक्तचंदनः ॥१०७॥ तेन पीठं कृतं श्रेष्ठं चरलिंगसमर्चने ॥ चतुरस्रं च-

---

पात्र देखील घ्यावें. परंतु अर्घ्यदान करण्यास फुटकीं भांडीं कधींही घेऊं नयेत. (९९) पात्रें नेहमीं धड व पवित्र असावींत. तांब्याचें, स्फटिकाचें, शंखाचें, सोन्याचें किंवा चांदीचें भांडें फुटकें असलें तरी दोष नाहीं. हा भिन्न दोष अन्य द्रव्यास लागूं आहे. (१००) शंख, साळीच्या कोंड्यानें घासला असतां शुद्ध होतो आंबटानें तांबें शुद्ध होतें. कांशाचें व पितळेचें भांडें हीं राखेनें व चूर्णानें अनुक्रमें शुद्ध होतात. (१०१) साळीच्या कोंड्यानें पितळेचें व लोखंडाचें भांडें शुद्ध व चकचकीत होण्याकरितां घासावें. (१०२) हीं चारीं भांडीं नंतर पाण्यानें धुवावींत. सोन्या रुप्याचीं भांडीं नुसत्या पाण्याच्या क्षालनानेंच शुद्ध होतात. (१०३) पात्र गोकर्णाप्रमाणें शास्त्रोक्त रीतीनें करावें. हीं न मिळालीं तर नारळाचें बेलें घ्यावें. (१०४) हे ब्रह्मदेवा, सोनें, रुपें, तांबें, कांसें, लोखंड, पितळ ह्या धातूंच्या भांड्यांचा उपयोग चरलिंगाच्या पूजेंत करावा व ह्या धातूंचें पीठ ( आसन ) हि करावें. (१०५) खैर, ज्येष्ठमध, पिंपळ, पिंपरी, पारिजात, उंबर, पीतसार ( असणा ), वड, विकंकत ( वेहळी, हळुमाणिका ), (१०६) जांबूळ, कळंब, बकुळ, बेल, पुन्नाग ( उंडी ), चांपा, पळस, मोरवा ( पाटली ), आंबा, पांगारा, कांचन, (१०७) हीं झाडें हे ब्रह्मदेवा पीठ करण्यास प्रशस्त होत. या सर्वांत रक्तचंदन प्रशस्त होय. (१०८) चरलिंगाची पूजा करण्याकरितां रक्तचन्दनाचें चौ-

तुःपादं पूर्ववत्प्रोक्तविस्तरं ॥ १०८ ॥ उपर्यधः समाकारं यत्तद्भद्रासनं स्मृतं ॥ पूर्वोक्तविस्तरायामं वृत्तं डमरुगाकृतिः ॥१०९॥ परितः पद्मवत्कल्प्यं यत्तत्पद्मासनं स्मृतं ॥ विष्टेषु पीठं यच्छ्रेष्ठं कारयित्वेक्षणप्रियं ॥ चरलिंगस्य पूजार्थं तद्गृण्हीयात्पितामह ॥११०॥ ॐ धूपः ॥ कालागरुर्गंधसारो गुग्गुलुश्च सितागरुः ॥ लाक्षा बिल्वफलं सर्पिर्मधुसर्जरसः शशी ॥ साधनानि दशैतानि धूपस्य चतुरानन ॥ १११ ॥ चंदनागुरुकोष्ठानि नखः सर्जः कचोरकः ॥ एते गुडेन युक्ताश्च धूपो भवति चोत्तमः ॥ ११२ ॥ शर्करा नखगंधाश्च जटामांसी सुगंधिनः ॥ एते क्षौद्रेण युक्ताश्चेत् धूपो भवति चोत्तमः ॥११३॥ वृ० ॥ अगरुतगरुकोष्ठं शैलपुष्पं सिताश्च उभयसुखकरास्ते चंदनैलाः सलाक्षाः ॥ त्वचनखखदिराः स्युर्गंधसाराख्यमेव प्रचुरजलकचौरो जातियुग्धूपराजः ॥११४॥ कृष्णागरुसकर्पूरं धूपं दद्यान्महेश्वरे ॥ नैरंतर्येण यो मासं तस्य पुण्यफलं शृणु ॥ ११५ ॥ कल्पकोटिसहस्राणि कल्पकोटिशतानि च ॥ भुंक्ते शिवपुरे भोगान् तस्यां ते स महीपतिः ॥११६॥ गुग्गुलं घृतसं-

---

कोनी, चारखुरांचें व पूर्वोक्त विस्ताराचें पीठ ( चौरंग ) करावें. (१०९) तें खालीं वर सारख्या आकाराचें असावें त्यास भद्रासन असें ह्मणतात. तेंच पीठ पूर्वोक्त लांबी रुंदीचें असून डमरूप्रमाणें (११०) वाटोळें व कमलाकार असलें ह्मणजे त्यास पद्मासन असें ह्मणतात. हे ब्रह्मदेवा आसनांत उत्तम व सुंदर आसन करून चरलिंगाच्या पूजेस तें घ्यावें. (१११) आतां धूपाचें वर्णन करितात. रक्तचन्दन, मैलागिरीचंदन, गुग्गुळ, पांढरा चंदन, लाख, बेलफळ, तूप, मध, राळ, कापूर, हीं दहा द्रव्यें हे ब्रह्मदेवा धूपाचीं साधनें आहेत. (११२) चंदन, अगरू, कोष्ठ. नख ( नखला ), राळ, कचोरा हीं सर्व गुळांत मिसळलीं असतां उत्तम धूप तयार होतो. (११३) साखर व नखला, जटामांसी हीं सुगंधीं द्रव्यें मधांत मिसळलीं असतां उत्तम धूप होतो. (११४) अगर, तगर, कोष्ठ, शैलज ( शिलाजित ), साखर, अभया ( वेखंड ), चंदन, वेलची, लाक्षा, त्वच, नख, वाळा, जटामांसी, कापूर, कचोरा, ह्यांमध्यें जाई, मिसळली असतां श्रेष्ठ धूप तयार होतो (११५) कापुरासहित कृष्णागुरुधूप महादेवापुढें जो महिनाभर अक्षय जाळील त्याचें पुण्यफल सांगतों ऐक. (११६) तो एक हजार कोटि कल्पपर्यंत शिवपुरांत भोग भोगतो व नंतर राजपद पावतो. (११७) तूप घातलेला गुग्गुळ साक्षात

युक्तं साक्षाद्गृण्हाति शंकरः ॥ मासार्धमात्रदानेन शिवलोके महीयते ॥११७॥ कृष्णपक्षचतुर्दश्यां यः साक्षाद्गुग्गुलं दहेत् ॥ अपराधसहस्रैकमिहामुत्र कृतं क्षमेत् ॥११८॥ प्रियश्च गुग्गुलुर्नित्यमाज्ययुक्तो विशेषतः ॥ द्विसहस्रफलानां तु महिषाक्षश्च गुग्गुलः ॥११९॥ दग्ध्वा गव्याज्यमिश्रं तु शिवसाम्यः प्रजापते ॥ देवदारूनमेरू च सर्जश्रीवासकुंदुरु ॥१२०॥ श्रीफलं चाज्यसंमिश्रं दग्ध्वाऽऽप्नोति परां श्रियं ॥ येभ्यः सौगंधिकं धूपं षट्सहस्रगुणोत्तरं ॥१२१॥ अगुरुं दशसाहस्रं द्विगुणं चासितागुरुं ॥ हेम्ना रौप्येण ताम्रेण रीत्या लोहेन वापि च ॥१२२॥ धूपप्रदीपपात्रे द्वे कारयेत्सह लक्षणैः ॥ धूपपात्रस्य दैर्घ्यं तु सार्धाष्टांगुलकं स्मृतं ॥१२३॥ पात्रं डमरुवत्कार्यं सपिधानं सनालकं ॥ पात्रं पादमुखव्याससमानं चतुरंगुलं ॥१२४॥ अंगुलं तु द्वयोस्तुंगं तन्मध्ये ग्रीवमंगुलम् ॥ एवं डमरुकाकारं ग्रीवानालं प्रकल्पयेत् ॥१२५॥ नालस्य परितः सम्यक् मणिभिर्भूषयेत्सुधीः ॥ ऋजु वा कुटिलं वापि यथाशोभं

---

शंकर ग्रहण करितो व असा गुग्गुळ अर्धा महिना जो शंकरास अर्पण करितो तो शिवलोकांत महत्व पावतो. (११८) कृष्णपक्षाच्या चतुर्दशीस जो साक्षात गुग्गुळ जाळतो त्यानें केलेले एक हजार अपराध क्षम्य होतात. (११९) शंकरास गुग्गुळ नेहमीं प्रिय असतो, त्यांत तूप घातलें असतां तर विशेष प्रिय होतो. महिषाक्ष गुग्गुळ जाळिला असतां दोन हजारपट फल मिळतें. (१२०) गाईचें तूप घालून गुग्गुळ जाळला असतां जाळणारा शिवसाम्य पावतो. देवदार, नमेरु, राळ, श्रीवास, कुंदुरू, (१२१) बेलफळ, तूप हीं एकत्र करून जाळिलीं असतां जाळणाऱ्यास थोर संपत्ति लाभते. वरील प्रकारच्या धूपांपेक्षां सुगंधयुक्त धूप सहा हजारपट अधिक श्रेष्ठ आहे. (१२२–१२३) याहून अगरु दहा हजारपट अधिक आहे. पांढरा अगरु त्याहून दुप्पट आहे. धूपपात्र, दीपपात्र हीं दोन पात्रें सोन्याचीं किंवा रुप्याचीं, तांब्याचीं, पितळेचीं किंवा लोखंडाचीं सलक्षण केलेलीं असावींत. धूपपात्र साडेआठ अंगुलें लांब असावें. (१२४) तें डमरूप्रमाणें वाटोळें असून त्यास झांकण व दांडाही असावा. तें पात्र बुडाशीं व तोंडाशीं चार अंगुलें समान घेराचें असावें. (१२५) दोन्हींची उंची दोन अंगुलें असावी व त्यास एक अंगुल मान असावी. डमरूप्रमाणें असें वाटोळें असून त्यास मान व दांडा हीं असावींत. (१२६) बुद्धिमानानें दांड्याच्या सभोंवार जडाव काम केलेलें असावें. तो दांडा वांकडा किंवा सरळ असला तरी शोभायमान असावा.

तु कारयेत् ॥१२६॥ व्यासौन्नत्ये पिधानस्य पात्रवत्परिकल्पयेत्॥ पादां-गुलं तदूर्ध्वं तु शेषं च शिखरं घनं ॥ १२७ ॥ पात्रपादं पिधानं च सर्वं चषकवत्स्मृतं ॥ घनं तस्य समस्तस्य यवमात्रं प्रकीर्तितं ॥ १२८ ॥ पि-धाने धूपनिर्गत्यै रंध्राणि विदधीत षट् ॥ लक्षणं धूपपात्रस्य समाख्या-तं चतुर्मुख ॥१२९॥ सार्धं तु त्र्यंगुलं व्यासं पात्रस्य द्व्यंगुलं मतं ॥ त-स्यांघ्रिविस्तरोत्सेधं तद्वदेकांगुलांगुलं ॥१३०॥ पिधानशिखरं नालं घनं रंध्राणि पूर्ववत् ॥ एवं च कारयेन्बुध्या धूपपात्रं तदुत्तमं ॥ पात्रस्यैवं-विधस्यास्य त्वलाभे मृण्मयं तु वा ॥१३१॥ ॐ दीपः ॥ कर्पूरो घृतवर्ति-श्च द्वितयं दीपसाधनं ॥ उत्तमं कपिलासर्पिर्मध्यमं शुभ्रगोघृतं ॥ अ-न्यगोसर्पिरधममिति त्रिविधमीरितं ॥ १३२ ॥ घृतदीपप्रदानेन शि-वाय शतयोजनम् ॥ भूम्यंतं लभते मर्त्यो विमानं सूर्यसुप्रभं ॥१३३॥ यः कुर्यात्कार्तिके मासे शोभनां दीपमालिकां ॥ कृष्णपक्षे चतुर्दश्याममा-वास्यादिनेऽपि वा॥१३४॥ सूर्यायुतप्रतीकाशस्तेजसा भासयन् दिशः॥

---

(१२७) झांकणाची लांबी रुंदी व उंची हीं पात्राच्या मानानेंच असावींत. त्या-वर एकचतुर्थांश अंगुल जाड शिखर असावें. (१२८) धूपपात्राचें बूड व झांकण हीं सर्व पंचपात्रीप्रमाणें असावींत. त्या सर्व पात्रांची जाडी यवमात्र असावी. (१२९) झांकणाला धूपाचा धूर जाण्याकरितां सहा भोकें असावींत. हे ब्रह्मदेवा धूपपात्राचें सर्व लक्षण सांगितलें (१३०) साडेतीन अंगुळें व्यासाचा (घेराचा) व दोन अंगुळें उंचीचा उत्सेध असावा. त्याचप्रमाणें पायाची उंची एक अंगुल असावी. (१३१) झांकणाचे शिखराला दांडा जाड असावा. व त्या झांकणास पूर्वीप्रमाणें भोकें असावींत. ह्याप्रमाणें बुद्धिपूर्वक धूपपात्र तयार करावें. तेंच धूपपात्र उत्तम होय. अशा प्रकारचें धूपपात्र न मिळाल्यास मातीचें पात्र घ्यावें. (१३२) आतां दीपवर्णन करितों. कापूर तुपाची वात असे दुसरें दिव्याचें साधन आहे. कपिला गाईच्या तुपाचा दिवा उत्तम, पांढऱ्या गाईच्या तुपाचा दिवा मध्यम, व इतर गायींच्या तुपाचा दिवा अधम होय. ह्याप्रमाणें दिव्याचे तीन प्रकार सांगितलें आहेत. (१३३) शिवाला तुपाच्या दिव्याचें दान केलें असतां शंभर योजन भू-मिपर्यंत त्या मनुष्याला सूर्यासारखें तेजस्वी विमान मिळतें. (१३४) जो कार्तिक महिन्यांत सुंदर दीपमाला लावितो किंवा कृष्णपक्षांत चतुर्दशीस किंवा अमावा-स्येसही जो दीपमाळ लावतो. (१३५) तो दशसहस्र सूर्यांच्या तेजास मागें टाक-णाऱ्या तेजानें दहा दिशा प्रकाशित करतो व तो मनुष्य विमानांत बसतो व स-

स मानवो विमानस्थः कुलमुधृत्य सर्वतः ॥ १३५ ॥ *यावत्प्रदीपपात्रं च घृतेनापूर्य बोधितं ॥ तावद्युगसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥१३६॥ दीपवृक्षं समुत्थाप्य सर्वस्यायतने शुभं ॥ पूर्वस्माद्विगुणं पुण्यं लभ्यते नात्र संशयः ॥ कार्पासवर्तिं कृत्वा च गव्याज्येन प्रदीपयेत् ॥ १३७ ॥ उन्नतं दीपपात्रस्य समस्तं स्यात्षडंगुलं ॥ सार्धांगुलोन्नतं पीठं नालं सार्धांगुलद्वयं ॥१३८॥ शिखरं द्यंगुलं प्रोक्तं चोन्नतं स्यात्षडंगुलं ॥ तत्पादपीठविस्तारं चोदितं चतुरंगुलं ॥ १३९ ॥ स्निग्धं मणिमयं चापि द्यंगुलं तस्य नालकं ॥ पात्रं पंचांगुलं व्यासं तद्घनं यवमात्रकं ॥१४०॥ पात्रांतः परितो दीपस्थानान्यष्टौ प्रकल्पयेत् ॥ शिखरेऽपि तथैवैकं दीपस्थानं प्रकल्पयेत् ॥१४१॥ दीपपंचकपात्रं स्यादिदमन्यदिहोदितम् ॥ चतुरंगुलमुत्सेधं नालं सार्धांगुलं स्मृतं ॥ १४२ ॥ दंडस्यार्धे गले पात्रं पादं तद्यासमंगुलं ॥ कलधौतादिभिः कुर्याद्यथा वित्तानुसारतः ॥ अलाभे व्रीहिपिष्टस्य पंचार्तिक्यं प्रकल्पयेत् ॥ एवं यथावत्कथितं दीप-

---

र्वंत्र कुलाचा उद्धार करितो. (१३६) व जों वेळपर्यंत तुपानें भरून दिवा उजळविला जातो तितकीं सहस्र युगें रुद्रलोकांत तो महत्व पावतो. (१३७) शुभकारक शंकराच्या मंदिरांत दीपवृक्ष ( दिव्याचें झाड ) लावलें असतां पूर्वीच्या दुप्पट पुण्य लागतें यांत संशय नाहीं. कापसाची वात करून गायीच्या तुपानें लावावी.(१३८) सर्व दीपपात्र सहा अंगुळें उंच असावें, दीड अंगुल बैठक उंच असावी व दांडा अडीच अंगुलें उंच असावा. (१३९) शिखर दोन अंगुलें उंच असावें. ह्याप्रमाणें सर्व पात्र सहा अंगुलें उंच असावें त्या पात्राची बैठक चार अंगुलें विस्ताराची असावी. (१४०) व त्याचा नाल मणिमय व सुंदर असून दोन अंगुलें असावा. दीपपात्राचा व्यास पांच अंगुलें असावा व तें यवमात्र जाड असावें.(१४१) त्या पात्रांस सभोंवार आठ दिवे लावण्याचीं तोंडें असावीत; तसेंच शिखरावर एक दिवा लावण्याचें स्थान असावें. (१४२) पंचारती ह्मणून एक दुसरें दीपपात्र सांगितलें आहे. त्याचा उत्सेध ( उंची ) चार अंगुलें असावा; दांडा दीड अंगुळ असावा. (१४३) दांड्याच्या अर्ध्यांवर गळा असावा व पादाचा व्यास एक अंगुळ असावा. हीं पात्रें आपल्या शक्तीप्रमाणें सोन्यारुप्याचीं वगैरे करावींत. तशीं न मिळाल्यास तांदुळाच्या पिठाचीं पात्रें करून दिवे दाखवावेत. ह्याप्रमाणें दीप-

---

* यावत्प्रदीपपात्रेण दत्ता दीपाः शिवाय वै ॥ पाठान्तरम् ॥

पात्रस्य लक्षणं ।।१४३।। ॐ ॥ घंटा ॥ अथ घंटालक्षणं ॥ दंडाग्रे स्थित-शूला च धत्तूरकुसुमोपमा ॥ या सौराष्ट्री कांस्यमयी घंटा च क्वणसंयुता ॥१४४॥ आयामं घंटिकायास्तु प्रोक्तमंगुलपंचकं ॥ तद्वन्मुष्टिप्रमाणं स्यात्कटकद्वयसंपुटं॥१४५॥ तदूर्ध्वं त्र्यंगुलयुतं विदधीत त्रिशूलकं॥ तस्या वदनविस्तारं षडंगुलमिति स्मृतं॥१४६॥ घंटायाः सकलं दैर्घ्यमंगुलानां त्रयोदश ॥ एवं नेत्रप्रियां घंटामस्मिन् मानेन कारयेत् ॥१४७॥ अथ काहला ॥ काहला पटहः शंखो भेरी च जयघंटिका ॥ एते पंच महाशब्दा मंगलध्वनयः स्मृताः ॥ १४८ ॥ सुवर्णेन च रौप्येण तारेणापि विनिर्मितां ॥ ईषदुन्मिलितेनाथ धत्तूरेण समां शुभां॥१४९॥ सद्व्यंगुलं चतुस्तालमायतं काहलस्य तु ॥ चतुरंगुलविस्तारं स्यात्तदाननवर्तुलम् ॥१५०॥ त्र्यंगुलं दंडमानं स्यादनुस्थूलं तथोदितः ॥ तथैव विस्तरं तस्य यथाशोभं तु कारयेत् ॥१५१॥ अन्यत्सर्वं यथापूर्वं विस्तरं काहलस्य तु।। एवं लक्षणमाख्यातं विस्तारायामपूर्वकं ॥१५२॥ ॐ ॥ पटहः ॥ आसनः खदिरः श्रेष्ठश्चापि वा रक्तचंदनः ॥ त्रयोऽमी प-

---

पात्राचें लक्षण यथावत् सांगितलें. (१४४) आतां घंटेचें लक्षण सांगतात. दांडा, अग्र व शूल यांसह घंटा धोतऱ्याच्या फुलाप्रमाणें असावी. ती सौराष्ट्र कांश्याची व नादयुक्त असावी (१४५) घंटेची लांबी पांच अंगुळें सांगितलीं आहे. मुष्टिप्रमाणाचें दोन कटकांसह संपुट असावें. (१४६) त्याच्यावर तीन अंगुळें त्रिशूलक असावा. घाटेच्या तोंडाचा विस्तार सहा अंगुळें असावा. (१४७) घंटेची सगळी लांबी तेरा अंगुळें असावी. ह्या मानानें घंटा सुंदर करावी. (१४८) आतां काहळेचें लक्षण सांगतातः—काहला, नगारा, शंख, भेरी व जयघंटा हीं सर्व पांच मोठा ध्वनि करणारीं वाद्यें आहेत. व यांचें ध्वनि मंगल आहेत असें मानितात. (१४९) घंटा सोन्याची किंवा रुप्याची किंवा तांब्याची करितात ती किंचित् फुललेल्या धोतऱ्याच्या फुलाप्रमाणें सुंदर असावी. (१५०) चार टीच दोन बोटें परिमित काहला असावी असें सांगतात. त्याच्या तोंडाचा चार बोटें वर्तुलाकृति विस्तार करावा असें ह्मटलें आहे. (१५१) त्याच्या दांडीचें मान तीन बोटें असून त्याची जाडीहि तितक्याच बेताची असावी; त्याचप्रमाणें त्याचा विस्तार करून शोभेल अशी काहला ( कर्णा ) करावी. (१५२) बाकी सर्व पूर्वीप्रमाणें करावें. ह्याप्रमाणें लांबीरुंदीपूर्वक काहलेचें लक्षण सांगितलें. (१५३) आतां पटहाचें लक्षण सांगतों. आसन, खैर, रक्तचंदन हीं तीन झाडें नगाऱ्यास योग्य असें वाद्यवेत्त्यांनीं सांगि-

टहस्योक्तास्तरवो वाद्यवेदिभिः॥१५३॥ पंचतालं समाख्यातमायतं पटहस्य तु ॥ द्वितालं मध्यमं स्थूलं तालमात्रं मुखद्वयं ॥१५४॥ चर्मणा च समाच्छाद्य मुखयुग्मं यथा दृढं ॥ कोणे विन्यस्य पूजायाः काले संताडयेच्च वै ॥१५५॥ शंखः ॥ गोक्षीरधवलस्निग्धो दीर्घनालो बृहत्तनुः ॥ वृत्तो यो दक्षिणावर्तः सोऽब्धिजः शंखसंज्ञकः ॥ १५६ ॥ पूर्वोक्तलक्षणोपेतो वामावर्तस्तथाब्धिजः ॥ शंखोऽयं सोऽतिसुलभः पूर्वोक्तोऽतीव दुर्लभः ॥१५७॥ शंखस्य नाहं यावत्स्यात्तावत्स्यादायतं स्मृतं ॥ तस्यार्धं नाशिका यस्य स शंखः श्रेष्ठ उच्यते ॥ १५८ ॥ तदर्धनासिको योऽसौ शंखो भवति मध्यमः ॥ शंखोऽयमितरो लब्धः स कनिष्ठः प्रकीर्तितः ॥ १५९ ॥ भिन्नः क्रिमिहतो रक्तः सरंध्रः कश्मलच्छविः ॥ ऱ्हस्वनालः स शंखो यो न योग्यो नादकर्मणि॥१६०॥ ॐ ॥ अथ दुंदुभिः ॥ दुंदुभिर्द्विविधः प्रोक्तः स्थिरजंगमभेदतः ॥ कोणन्यस्तः स्थिरः प्रोक्तः स लघुश्च चरः स्मृतः ॥१६१ ॥ खदिरः पीतसारश्च शिरीषो रक्तचंदनः ॥ मधूकोऽरिष्टकश्चेति षड्वृक्षा दुंदुभेः स्मृताः॥१६२॥

---

तलें आहे. (१५४) पटह ( मृदंग ) पांच ताल ( टीच ) लांबीचा असावा. मध्य दोन ताल असावा व दोन्हीं तोंडें एक ताल मात्र असावीं (१५५) दोन्हीं तोंडें चामड्यानें बळकट मढवावींत व तो कोनांत ठेवून पूजाकालीं वाजवावा. (१५६) आतां शंखाविषयीं वर्णन करितात. गायीच्या दुधाप्रमाणें पांढरा, चकचकीत व लांब नालाचा, स्थूल, वाटोळा, उजव्या मोडीचा अशा समुद्रांतून उत्पन्न झालेल्या पदार्थाला शंख असें ह्मणतात. (१५७) पूर्वोक्त लक्षणांनींयुक्त व डाव्या मोडीचा समुद्रांतून काढलेला शंख पुष्कळ सुलभ आहे व मागें सांगितलेला उजव्या मोडीचा शंख अतिशय दुर्लभ होय. (१५८) शंखाचें नाह ( रुंदी ) जेवढा असेल तितकेंच दैर्घ्य (लांबी) असावें. त्याच्या लांबीच्या अर्ध्यानें ज्याचें नाक आहे तो शंख उत्तम होय. (१५९) त्याच्या अर्ध्यानें ज्याचें नाक आहे तो शंख मध्यम होय. याशिवाय इतर जो शंख तो कनिष्ठ असें मानितात. (१६०) फुटलेला, किड्यांनीं तोडलेला, तांबडा, भोंकें पडलेला, आंखूड नालाचा, जो शंख तो वाजविण्यास योग्य नाहीं. (१६१) आतां दुंदुभीचें लक्षण सांगतात.–दुंदुभि दोन प्रकारचा असतो. स्थावर व जंगम; कोनांत ठेवून वाजवावयाचा त्यास स्थावर असें ह्मणतात व जो वाहून नेतात त्यास जंगम असें ह्मणतात. (१६२) खैर, पीतसार, शिरीष, रक्तचंदन, मधुक ( मोहाचें झाड ) अरिष्टक ( निंबाचें झाड ) हे सहा

आयामं सप्ततालं स्यात् पंचतालं तु विस्तरं ॥ मुखं त्रितालविस्तारं मुखस्य घनमंगुलं ॥ अन्यत्सर्वं यथापूर्वं कारयेद्दुंदुभिं शुभं ॥ १६३ ॥ सवृत्तं लोहपिट्टेन मुखमध्यं च वेष्टयेत् ॥ मुखस्य परितः सप्त न्यसेत् कीलानयोमयान् ॥१६४॥ मुखं च चर्मणाच्छाद्य तत्त्वक् सूत्रेण वेष्टयेत् ॥ यथाकथं समाख्यातं लक्षणं स्थिरदुंदुभेः ॥१६५॥ ईदृग्दंडविनिर्घोषः शंभोः प्रीतिकरः सदा ॥ षट्तालमथवा यामं तालाष्टांशत्रियांशकैः ॥१६६॥ चतुस्तालं तु विस्तारं मुखं सार्धद्वितालकं ॥ *बिलं घनं यथापूर्वं वृत्तं वा चतुरानन ॥१६७॥ एतदेवं विधं प्रोक्तं लक्षणं स्थिरदुंदुभेः ॥ आसने निर्मिते स्थाप्य गोपुरे सारदारुभिः ॥१६८॥ विमानस्याथवा स्थाने दक्षिणे वा सुरोत्तम ॥ चतुःपादचतुःशृंगमध्यं प्रोक्तं तथासनं ॥१६९॥ भूमिश्चतुष्पदां स्थानं शृंगमध्यं तु दुंदुभेः ॥ चतुस्तालप्रमाणोच्चं +तन्नाहं तालपंचकं ॥१७०॥ वदनद्वयविस्तारं समानं द्वादशांगुलम् ॥ सुवर्तुलं समंताच्च घनमर्धांगुलं स्मृतम् ॥ १७१ ॥

---

वृक्ष दुंदुभि करण्यास योग्य होत. (१६३) त्या दुंदुभीची लांबी सातताल व विस्तार पांचताल असावा तोंड तीन ताल विस्ताराचें असावें व तोंडाची जाडी एक अंगुल असावी. बाकी सर्व पूर्वीप्रमाणें करून शुभकारक दुंदुभि करवावा.(१६४) बाहेरून लोखंडाच्या पट्टीनें वेष्टित असून तोंडालाहि वेष्टन असावें. तोंडाभोंवतीं लोखंडाचे सात खिळे असावेत. (१६५) तोंड चामड्यानें मढवून तें चामडें दोरीनें वेढिलेलें असावें. हें सर्व स्थिर दुंदुभीचें लक्षण सांगितलें (१६६) अशा प्रकारचा दुंदुभीचा दांड्यानें वाजवून केलेला घोष शंकरास नित्य प्रिय होतो. ह्याप्रमाणें स्थिर दुंदुभीचें लक्षण सांगितलें, सहा ताल विस्तार करावा किंवा तालाच्या अष्टमांशाचा किंवा एक तृतीयांशाचा करावा. (१६७) मुखचार ताल परिमित करून अडीच ताल प्रमाणाचें बीळ करावें. जाडी पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावी, वर्तुलहि तसेंच असावें. हे ब्रह्मदेवा (१६८) स्थिर दुंदुभीच्या लक्षणाचा हा एक प्रकार सांगितला. मजबूत लांकडाचें आसन करून त्यावर दुंदुभी ठेवून गोपुरावर (माडीवर) (१६९) विमानांत उजव्या बाजूला त्याची स्थापना करावी चार पायांचें चार शिंगांचें आसन करावें असें सांगितलें आहे. (१७०) तें आसन (घडवंची) नगारा ठेवण्याचें स्थान होय. चार तालप्रमाण उंची करून त्याचा परिघ पांच ताल प्रमाण करावा. (१७१) दोन्ही तोंडांचा विस्तार सरळ बारा बोटांचा

---

* यथा पूर्वं च विधिना कुर्याद्वै चतुरानन ॥ + तन्नालं

अस्य स्थानं स्थलं नान्यदंगं दौंदुभिकस्य तु ॥ धृत्वा दौंदुभिकः स्वांगे वादयेद्दुंदुभिं तथा॥१७२॥ एवं यथावत्कथितं लक्षणं चरदुंदुभेः ॥ स्थूलोन्नताभ्यां सदृशी महावृक्षविनिर्मिता ॥ त्वग्बद्धोभयपार्श्वासौ भेरी स्याद्दुंदुभिध्वनिः ॥ १७३ ॥ चारुसौराष्ट्रककृता चंद्रमंडलवदृढा ॥ द्वितालविस्तारायामा जयघंटाव्हया स्मृता ॥ १७४ ॥ द्वौ शंखौ काहले द्वे च चतस्रो जयघंटिकाः॥एकैकः पटहो भेरी संख्यैषामेवमीरिता॥१७५॥ केचिदेतान्महाशब्दान् ब्रुवते पंच सूरयः ॥ गीतातोद्याकांस्यतालशंखकाहलनिस्वनान् ॥१७६॥ अत्रोक्तसंख्याधिकृता वाद्यानामुत्तमोत्तमा ॥ स्यादलाभे यथा लब्धसंख्या वा विभवप्रदा ॥ १७७ ॥ स्वाहार्चनेश्वरस्थाने सामान्ये स्थावरेऽपि च ॥ स्नाने धूपे प्रदीपे च नैवेद्योषः प्रबोधयोः ॥१७८॥ घंटापंचमहाशब्दान् प्रयुंजीतोत्सवेषु च ॥ स्नानकाले त्रिसंध्यायां यः कुर्याद्भेरिवादनं ॥१७९॥ नाट्यं वा मुखवाद्यं वा तस्य पु-

---

करावा. वर्तुल करून त्याची जाडी चोहोंकडे अर्ध्या बोटाची असावी. (१७२) दुंदुभी वाजविणाराचें अंगच ह्याचें स्थान होय, दुसरें कोणतेंहि नाहीं वाजविणारानें आपल्या अंगावर घेऊन हा दुंदुभी वाजवावा. (१७३) ह्याप्रमाणें चरदुंदुभीचें यथावत् लक्षण सांगितलें. भेरी ( नौबद ) महावृक्षाची केलेली असावी व ती जितकी उंच तितकीच स्थूल असावी दोन्ही बाजूला चामड्यानें बांधलेली असावी तिला दुंदुभीच्या ध्वनीप्रमाणें गंभीर नाद असावा. (१७४) जयघंटा सौराष्ट्र धातूची केलेली असावी, चंद्रमंडलाप्रमाणें मनोहर असावी. विस्तारानें दोन ताल असावी. (१७५) दोन शंख, दोन काहला, व चार जयघंटा, एक पटह, एक भेरी ह्याप्रमाणें ह्यांची संख्या सांगितली आहे. (१७६) कांहीं विद्वान् लोक ह्या वर सांगितलेल्या वाद्यांस पंचमहाशब्द असें ह्मणतात. व कोणी गायन, आतोद्य ( तंतुवाद्य ), कांशाचे टाळ, शंख, काहला यांस पंचमहाशब्द असेंहि ह्मणतात. (१७७) ही येथें सांगितलेली वाद्यांची संख्या उत्तमोत्तम आहे. हीं सर्व वाद्यें न मिळाल्यास मिळेल तेवढी संख्या विभवदायक आहे. (१७८) स्वाहार्चनकालीं, ईश्वर देवालयांत व सामान्य देवळांत तसेंच त्यांच्या स्नानाचेवेळीं, धूपाचे वेळीं, आरतीच्या वेळीं व नैवेद्याचे वेळीं व उषःकालीं तसेंच उत्सवप्रसंगीं (१७९) घंटादि पंचमहाशब्दांचा उपयोग करावा. स्नानकालीं व तसेंच सकाळीं, दुपारीं, व सायंकाळीं जो भेरी वाजवील (१८०) किंवा नटन करील किंवा मुखवाद्य वाजवील त्याचें पुण्यफल सांगतों ऐक. जितके दिवस जो नर्तन किंवा वादन करितो

ण्यफलं शृणु ॥ यावंत्यहानि कुरुते * यस्तु नृत्यादिवादनं ॥ तावद्युगसहस्राणि रुद्रलोके महीयते ॥१८०॥ नैवेद्यं ॥ ॐ अथ नैवेद्यं ॥ नीवारतंडुलाः श्रेष्ठास्तथैव व्रीहितंडुलाः ॥ होमोक्तधान्यजातीयास्तंडुला मध्यमाः स्मृताः ॥१८१॥ म्लानान् भिन्नान् कणान् रक्तान् दुर्गंधान् कठिणाशनान् ॥ पाचितव्रीहिकांश्चैतान् तंडुलान् सप्त वर्जयेत् ॥१८२॥ अभिन्ना धवलाः स्निग्धा विशुद्धा नूतनाः शुभाः ॥ तंडुलाःस्युरमी श्रेष्ठा नैवेद्यपरिकल्पने ॥ १८३ ॥ व्रीहीणां द्विशतं पंचविंशत्याशक्तिरिष्यते ॥ तलं प्रकुंचः प्रसृतिः कुडुवश्च ततोऽजलिः ॥१८४॥ प्रस्थः पात्रस्त्वाढकश्च शिवो द्रोणश्च खारिका ॥ आख्या भवेयुरेतेषां द्विगुणेन पृथक् पृथक् ॥१८५॥ श्रेष्ठाः खारिद्वयमिता मध्यमाः खारिसंयुताः॥ शिवप्रमाणस्त्वधमो नैवेद्यपरिकल्पने ॥ नैवेद्यकरणे चोक्ताः श्रेष्ठाश्चाढकतंडुलाः ॥१८६॥ केन निष्पीड्य निष्पीड्य षोडश क्षालयेद्बुधः ॥ सार्धाढकप्रमा तोयं तंडुलानां प्रकीर्तितम् ॥ १८७ ॥ विस्फुलिंगकृताः काष्ठाः सकेशाः

तितकीं युगसहस्रपर्यंत रुद्रलोकांत तो महत्व पावतो. (१८१) आतां नैवेद्याविषयीं वर्णन करितात. नीवाराचे तांदूळ तसेंच साळींचे तांदूळ उत्तम मानिले आहेत. होमाला सांगितलेल्या धान्याच्या जातींचे तांदूळ मध्यम असें मानितात. (१८२) निस्तेज, मोडके, कुटके, तांबडे, वाईट, वासाचे, कठीणभाताचे, शिजविलेल्या भाताचे असे सात प्रकारचे तांदूळ नैवेद्यास वर्ज करावेत. (१८३) न मोडके, पांढरे, तेजस्वी शुद्ध, नवीन, शुभ असे तांदूळ नैवेद्याचा स्वयंपाक करण्यास श्रेष्ठ मानिले आहेत. (१८४) दोनशे पंचवीस तांदुळांच्या कणाला शक्ति असें ह्मणतात. दोन शक्तींचा एक तल, दोन तलांचा एक प्रकुंच, दोन प्रकुंचांचा एक प्रसृति, दोन प्रसृतींचा एक कुडव, दोन कुडव ह्मणजे एक अंजलि. (१८५) दोन अंजलींचा एक प्रस्थ, दोन प्रस्थांचा एक आढक, दोन आढकांचा एक शिव. व दोन शिवांची एक द्रोण. दोन द्रोणांची एक खारी. असें मानकोष्टक आहे. (१८६) नैवेद्याचा स्वयंपाक करण्यास दोन खारी तांदूळ उत्तम, खारीभर तांदूळ ते मध्यम, व शिवप्रमाण तांदूळ ते अधम असें मानितात. नैवेद्य करण्यास आढकप्रमाण तांदूळ उत्तम असें मानिलें आहे. (१८७) ते तांदूळ सोळा वेळ पाण्यानें धुवावेत व त्यांत दीड आढक पाणी घालावें. (१८८) ठिणग्या उडणारीं, केशयुक्त, व किडकीं लांकडें वर्ज करून दुसरीं लांकडें स्वयंपाक करावयास शुद्ध

* स्तुति.

प्राणिसंयुताः ॥ एतान्विनेतरैः काष्ठैः पचने दीपयेच्छुचिः ॥१८८॥ केवलान्नमिति प्रोक्तमिदमन्नं सुपाचितं ॥ परमान्नं हरिद्रान्नं दध्यन्नं कृसरोदनं ॥१८९॥ गुडोदनं च मुद्गान्नमित्यन्नं षड्विधं स्मृतं ॥ *तंडुलार्धं मुद्गभिन्नं वारिणा सह संपचेत् ॥१९०॥ ईषद्धरिद्रया युक्तं मरीचीजाजिसंयुतं ॥ एतदुक्तं हरिद्रान्नं सुपक्वं पाचितं तथा ॥ १९१ ॥ मधुराम्लेन गोदध्ना प्रत्यग्रान्नं विमिश्रितं ॥ लवणार्द्रकसंमिश्रमेतद्दध्योदनं स्मृतम् ॥१९२॥ तंडुलार्धं मुद्गभिन्नं वारिणा सह संपचेत् ॥ पक्वे मरीचचूर्णेन तिलचूर्णं विनिक्षिपेत् ॥१९३॥ इदं कृसरनामान्नमित्याख्यातं सुरेश्वर॥ पूर्वोक्तपायसे युंजाद्दुग्धार्धं गुडखंडकं ॥ १९४ ॥ तदर्धमाज्यं मोचायाः फलमेतद्गुडोदनं ॥ तंडुलस्य त्रिभागेन मुद्गखंडेन मिश्रितं ॥१९५॥ पक्वं यदेतद्मुद्गान्नमाख्यातं च चतुर्मुख ॥ विना शुद्धान्नमन्येषां प्रदद्याल्लवणं बुधः ॥१९६॥ क्लिन्नाहारं तुषाहारं तंडुलाहारिभिः सदा ॥ पुराणाहारभांडं च प्रयत्नेन विवर्जयेत् ॥ १९७ ॥ विशुद्धभांडसंशुद्धं प्रयतं स्निग्धमुज्वलं ॥ अशनं यत्त दुत्कृष्टं नैवेद्यपरिकल्पने ॥ १९८॥ चत्वारि

---

मनुष्यानें घ्यावीं. (१८९)नुसत्या तांदुळांच्या शिजविलेल्या भाताला केवलान्न किंवा शुद्धान्न असें ह्मणतात. परमान्न, हरिद्रान्न, दध्यन्न कृसरान्न (१९०) गुडोदन, मुद्रान्न असे अन्नाचे सहा प्रकार आहेत. अर्धे तांदूळ व अर्धी मुगाची डाळ मिसळून पाण्यांत शिजविलें असतां (१९१) व त्यांत किंचित् हळद, मिरीं, जायफळ घातलें असतां त्यास हरिद्रान्न ( खिचडी ) असें ह्मणतात. (१९२) भात शिजवून त्यांत गाईचें मधुर दहीं, मीठ, आलें घालून कालविला असतां त्यास दध्योदन ( दहिंभात ) असें ह्मणतात. (१९३) अर्धे तांदूळ, अर्धी मुगाची डाळ घालून पाण्यांत शिजवून तयार झाल्यावर त्यांत मिरपूड, व तिळकूट घातलें असतां (१९४) त्यास हे देवाधिदेवा कृसरान्न असें ह्मणतात. पूर्वोक्त पायसांत त्याच्या अर्ध्यानें गुळाचे खडे घालावेत. (१९५) व त्याच्या अर्ध्यानें तूप घालावें व जायफळ घालावें ह्याला गुडोदन असें ह्मणतात. तांदुळाच्या तिसऱ्या हिश्यानें मुगाची डाळ मिसळावी. (१९६) व तें मिश्रण शिजविलें असतां त्यास हे ब्रह्मदेवा मुद्रान्न असें ह्मणतात. शुद्धान्न खेरीज करून सर्व अन्नांत मीठ घालावें. (१९७) भात खाणाऱ्यांनीं क्लिन्न ( क्लिष्ट ) अन्न, तुस असलेलें अन्न, पर्युषित अन्न हीं प्रयत्नपूर्वक वर्ज करावींत. (१९८) नैवेद्याला स्वच्छ व उजळ भांडें घ्यावें व त्यांत केलेला स्वच्छ भात तो नैवेद्याला उत्तम असें मानितात. (१९९) वरणाला चार

---

*भिन्नमुद्गं

शिविधान्यानि गृण्हीयात्सूपकर्मणि ॥ मुद्गाढकीकलायाख्या माषाश्चा-न्यानि वर्जयेत् ॥ १९९ ॥ तत्रापि निस्त्वचः श्रेष्ठाः सत्वचो मध्यमाः स्मृताः ॥ प्राक्तनान् क्रिमिसंयुक्तान् म्लानान् हीनान् परित्यजेत् ॥२००॥ पनसः कदली चूतो लिकुचो नारिकेलकः ॥ नारिंगो मातुलुंगश्च फला-न्येषां वराणि च ॥ २०१ ॥ सूरणः सूक्ष्मकंदश्च पिंडालः श्रृंगिबेरकः ॥ चत्वारोऽमी प्रशस्ताश्च कंदाः स्युः पक्वकर्मणि ॥२०२॥ कूष्मांडः कारवल्ली च पटोली वृहती वला ॥ अलावूः सूक्ष्मवृहती तथा कोशा-तकीद्वयं ॥२०३॥ उर्वारुश्चेत्यमी तेषां फलानि प्रवराणि च ॥ स्वादून्य-प्यविरुद्धानि फलान्यन्यानि वा वुधाः ॥२०४॥ मरीची जीरका सर्पिर्ल-वणाम्लकसर्षपैः ॥ उपदंशान्यथायोग्यं पचेदपि च हिंगुना ॥२०५॥पत्रो-पदंशा ये सर्वे तान्विविच्य वि सर्जयेत् ॥ अत्र प्रोक्तान्नपानानां व्यंजनाना-मभावतः॥दरिद्रश्चेत्स्वभोज्यं यत्तद्गृहीत्वा निवेदयेत्॥२०६॥उत्तमं कपि-लासर्पिर्मध्यमं शुभ्रगोघृतं ॥ अन्यगोसर्पिरधममिति त्रिविधमीरितं ॥७॥ सद्यः पक्वं सुगंधाढ्यं विशुद्धं नयनप्रियं ॥ शुद्धभांडस्थितं श्रेष्ठं शुद्धं

---

प्रकारच्या डाळी घ्याव्यात.मुगाची, आढक (रानतुरी),कलाय(सेंगदाणे) व उडदाची-वाकीच्या डाळी वर्ज कराव्या (२००) त्यांत साल नसलेली उत्तम, सालीची मध्यम व जुनी, किडकी, निस्तेज, हल्की अशी डाळ ती अधम होय ती वर्ज करावी. (२०१) फणस, केळें, आंबा, निकुच (सन्त्रें), नारळ, नारिंग, महाळुंग, हीं फळें-प्रशस्त होत. (२०२) सुरण, सूक्ष्मकंद, पिंडाल, शृंगिवेरक हे चार कांदे स्वयंपा-कास उत्तम होत. (२०३) कूष्मांड, कालें, पडवळ, वेलवांगी, वला, रामभोपळा सूक्ष्मवृहती, कोशातकी ( दोडकी ) (२०४) उर्वारु ( वाळूक ) यांचीं फळें व पेरें यांची भाजी करणें योग्य. परंतु दुसरीं फळें गोड व अविरुद्ध नसलीं तर घ्यावीं असें विद्वानांचें ह्मणणें आहे. (२०५) मिरीं, जिरें, मोहरी, तूप, यांच्यांत आंबट, व मीठ घालून व हिंग लावून तोंडीलावणीं करावीं. (२०६) पालेभाजांच्या च-टण्या ( तोंडीं लावणी ) सर्व शोधनपूर्वक वर्ज कराव्यात. येथें सांगितलेले अन्नपान पदार्थ व तोंडी लावण्याचे पदार्थ न मिळाले किंवा यजमान दरिद्री असेल तर त्यानें स्वतः खावयाच्या पदार्थांचा नैवेद्य करावा. (२०७) कपिला गाईचें तूप उत्तम, पांढऱ्या गाईचें तूप मध्यम, व इतर गाईचें तूप अधम असे तुपाचे तीन प्रकार सांगितले आहेत. (२०८) नवीन कढविलेलें, सुवासिक, शुद्ध छांदार, व

सर्पिः शुभं स्मृतं ॥ २०८ ॥ सकेशकल्कपुलकं सदुर्गंधं पुरातनं ॥ *अस्पृश्यैः प्राणिभिः स्पृष्टं दुर्भांडस्थं घृतं त्यजेत् ॥२०९॥ एवं ज्ञात्वा दधिक्षीरं गृण्हीयात्स्नानकर्मणि ॥ नैवेद्यस्यापि भक्तेन परीक्ष्य च पुनः पुनः ॥ २१० ॥ + श्रेष्ठं स्यादक्षकाष्ठांशं घृतं मध्यं तदर्धकं ॥ कनिष्ठं च तदर्धं स्याद्यथालब्धमलाभतः ॥२११॥ चंडालः पतितो रोगी पापीयान् देवलोंऽत्यजः ॥ गणिकासूतिकोदक्यौ व्रतभ्रष्टश्च कुक्कुरः ॥ २१२ ॥ †विट्शूकरः खरः काकः षंढो वाभक्ष्यभक्षकः ॥ स्वाध्यायविक्रयीत्येतेऽस्पृश्याश्चान्यत्र निंदिताः ॥२१३॥ श्रीशालितंडुलप्रस्थं कुर्यादन्नं सुसंस्मृतं ॥ शिवाय च चरुं दद्याच्चतुर्दश्यां विशेषतः ॥ २१४ ॥ हरिद्रं कृसरं शुक्लं पायसं पावनं तथा ॥ गुडखंडैश्च संमिश्रं गवामाज्यं सुकल्पितं॥२१५॥ यावंतस्तंडुलास्तस्मिन्नैवेद्ये परिसंख्यया ॥ तावद्वर्षसहस्राणि शिवलोके महीयते ॥ २१६ ॥ गुडखंडकृतानां च भक्ष्याणां च निवेदनात् ॥ घृतेन पाचितानां स्यात्तत्तत्कोटिगुणं फलं ॥ २१७ ॥ तांबूलिकायाः प-

---

शुद्ध भांड्यांत घातलेलें स्वच्छ तूप शुभकारक असें मानिलें आहे. (२०९) घाणेरडें, जुनें केश मिसळलेलें प्राण्यांनीं शिवलेलें व वाईट भांड्यांत ठेविलेलें तूप घेऊं नये. (२१०) ह्याचप्रमाणें विचार करून स्नानाला दहीं व दूध घ्यावें व नैवेद्याला तर वारंवार तपासून भक्तानें वरील पदार्थ घ्यावेत. (२११) अक्षकाचा आठवा हिस्सा तूप घेणें उत्तम त्याच्या अर्धें तें मध्यम व त्याच्या अर्धें तें कनिष्ठ असें समजावें. परंतु मुळींच न मिळालें तर मिळेल तेवढेंच घ्यावें. (२१२) चांडाल, पतित ( भ्रष्ट ) रोगी, पापी, देवल, अंत्यज, वेश्या, सुतकी स्त्री, उदकी, व्रतभ्रष्ट मनुष्य, कुत्रा, (२१३) विट, डुक्कर, गाढव, कावळा, नपुंसक अभक्ष्य भक्षण करणारा, द्रव्य घेऊन वेद शिकविणारा, हे सर्व अस्पर्श असून निंदित आहेत. (२१४) एक प्रस्थ साळीच्या तांदुळाचा उत्तम भात करून तो चरु शंकरास अर्पण करावा. विशेषतः चतुर्दशीचे दिवशीं अर्पण करावा. (२१५) हरिद्र, कृसर, शुक्ल, गुळाचे तुकडे व गाईचें तूप घालून केलेलें पायस पवित्र होय. (२१६) अशा नैवेद्यांत जितके तांदूळ असतील तितकीं वर्षें तो नैवेद्यार्पण करणारा शिवलोकांत महत्व पावतो. (२१७) गुळाचे तुकडे घालून तयार केलेल्या भक्ष्य पदार्थांच्या नैवेद्यापेक्षां तूप घालून शिजविलेल्या पदार्थांच्या नैवेद्याचें फल कोटिपट आहे. (२१८) विड्याचीं पानें घेऊन त्यांत सुपारी मोत्यांचा चुना, कापूर हे प-

---

* अयोग्यपाणिना + श्रेष्ठं स्यात्कर्षकाष्ठं वै † ओतुः सर्पः खरः काकः षंढो वाभक्ष्यभक्षकः स्वाध्यायविक्रयीत्येते चास्पृश्या वै विनिंदिताः ॥

त्राणि क्रमुकस्य फलानि च ॥ मुक्ताक्षाररसकर्पूरं तांबूलमिति कीर्तितं ॥२१८॥ पंचसौगंधिकोपेतं यस्तांबूलं निवेदयेत् ॥ शिवाय गुरवे चैव तस्य पुण्यफलं शृणु ॥ २१९ ॥ सुगंधदेहस्तेजस्वी सर्वावयवसुंदरः ॥ युगकोटिं महाभोगैः शिवलोके महीयते ॥ २२० ॥ पट्टदेवांगचीनानि *वितानान्युत्तमानि वै ॥ कार्पासं धवलं वस्त्रं मध्ये कमलभूषितं ॥ एतन्मौक्तिकमालाढ्यं वितानमपि वा भवेत् ॥२२१॥ मयूरपक्षदंडैश्च वल्कलैरतिपांडुरैः ॥ सौवर्णैराजतैर्दंडै रत्न ×जालविभूषितैः ॥ २२२ ॥ हस्तमात्रप्रमाणैश्च निर्मितान्नेत्रवल्लभान् ॥ चामरांश्च शिवायैव द्वंद्वशः प्रतियोजयेत् ॥ २२३ ॥ चमरीवालकैश्चैव तथा कुर्वीत पांडुरैः ॥ +चामरं द्वितयं स्वर्णरत्नदंडसमायुतं ॥२२४॥ वृत्तं द्वितालविस्तारं पूर्वोक्तांशुकनिर्मितं ॥ पूर्वोक्तदंडे संप्रोतं चतुस्तालायते शुभे ॥२२५॥ तालवृंतमितिख्यातं चित्रैरत्नैर्विभूषितं ॥ एतदप्यर्पयेद्युग्मं सद्भक्त्याथ विचक्षणः ॥ २२६ ॥ द्रव्याण्येवं समालोक्य सदोषाणि परित्यजेत् ॥ निर्दोषाणि च सौम्यानि विगृण्हीयाद्यथाविधि ॥२२७॥ दारुमृत्पात्रपा-

---

दार्थ घातले असतां त्यास तांबूल असें ह्मणतात. (२१९) पांच सुगंधित पदार्थ घालून जो शिवाला व गुरूला तांबूल अर्पण करितो त्याचें पुण्यफल सांगतों ऐक. (२२०) तो सुगंधदेही, तेजस्वी, व सर्वावयवांनीं सुंदर होऊन कोटि युगपर्यंत महान् भोग भोगून शिवलोकांत महत्व पावतो. (२२१) स्वच्छ पांढऱ्या कापसाच्या वस्त्रावर मध्यें कमल काढलेलें व मोत्याच्या माळांनीं भूषित केलेलें वस्त्र छतास योग्य होय. (२२२) मोरांच्या पिसांच्या दांड्यांचे केलेले वल्कलाप्रमाणें पांढरे सोन्याचे किंवा रुप्याचे दांडे घातलेले, व रत्नें बसविलेले (२२३) हातभर लांबीचे, सुंदर असे दोन मोरचेल शिवावर ढाळण्याकरितां करावेत. (२२४) सुवर्ण रत्नें बसविलेल्या दांड्याच्या चमरीच्या पांढऱ्या शुभ्र केसांच्या दोन चवऱ्या असाव्यात. (२२५) दोन ताल विस्ताराचा पूर्वोक्त वस्त्राचा केलेला, पूर्वोक्त दांड्यांत बसविलेला चार ताल लांबीचा (२२६) जो शुभ पंखा त्यास तालवृंत असें ह्मणतात. त्यावर चमत्कारिक रत्नें बसविलेलीं असावींत. अशा प्रकारचे दोन पंखे विद्वानानें भक्तिपूर्वक शिवाला अर्पण करावेत. (२२७) ह्याप्रमाणें द्रव्यें पाहून जीं दूषित असतील त्यांचा त्याग करावा. जीं निर्दोष व चांगलीं असतील तीं शास्त्रपूर्वक ग्रहण करावींत. (२२८) लांकडाचें, मातीचें, पळसाच्या पानांचें, रुप्याचें,

---

* विचित्राण्युत्तमानि वै × किंकिणीजालभूषितैः + चामरं द्विविधं प्रोक्तं

लाशरौप्यकांचनपात्रकैः ॥ एवं स्नानादिनैवेद्यबलिधूपादिभिः क्रमात् ॥२२८॥ पात्रांतरविशेषेण पुण्यं स्यादुत्तरोत्तरं ॥ हेमपात्रप्रदानेन य-त्पुण्यं वेदपारगे ॥२२९॥ रौप्यपात्रप्रदानेन तस्माच्छतगुणं तु वै ॥ एवं देवार्थमानीतैर्द्रव्यैश्च कुसुमादिभिः ॥२३०॥ नार्चयेदितरं देवं यदि सा-र्चा कृता वृथा ॥ सर्वदेवार्थमित्येतत्पुष्पादिद्रव्यसंचयं ॥२३१॥ यः कु-र्वीत महाद्रव्यैस्तदलाभे यजेच्छिवं ॥ शिवार्चनविशिष्टानि योग्यान्य-न्यामरार्चने ॥ अन्यामरार्चाशेषाणि न द्रव्याणि शिवार्चने ॥ २३२ ॥ देववाट्युद्भवं पुष्पमन्यद्वार्चनसाधनं ॥ बलादादाय चौर्याद्वा न प्रयुं-जीत वै बुधः ॥ २३३ ॥ यत्र नैवेद्यनिर्माल्यसंकीर्णकलशादिभिः ॥ स्नानं तु क्रियते भक्त्या न तद्गृण्हाति शंकरः॥२३४॥ देवकार्ये गुरोः कार्ये गणकार्ये तु योगिनां ॥ खननोत्पाटनं खंडं कृत्वा पापैर्न लिप्यते ॥ २३५ ॥ वृक्षाः पुष्पांगपत्राद्यैरुपयुक्ताः शिवार्चने ॥ शैवगाश्चैव ग-च्छंति रुद्रलोकं न संशयः ॥ २३६ ॥ पूजितं पूज्यमानं वा यः पश्येद्भ-

---

किंवा सोन्याचें—हीं पात्रें क्रमशः स्नान, नैवेद्य, बळि, धूप, इत्यादि शिवोपचारांस योग्य होत. (२२९) पात्रांतरविशेषानें उत्तरोत्तर विशेष पुण्य मिळतें. वेदवेत्त्या ब्राह्मणाला सोन्याचें पात्र दिल्याचें जें पुण्य (२३०) तें रुप्याच्या पात्रदानापेक्षां शंभरपट अधिक आहे. ह्याप्रमाणें देवाकरितां कुसुमादि आणिलेल्या द्रव्यांनीं (२३१) इतर देवतांचें पूजन करूं नये. जर पूजन केलें तर तें वृथा होय. (२३२) सर्व देवांकरितां पुष्पादि द्रव्यें आणिलीं असतां त्या महाद्रव्यांनीं त्या देवांची पूजा क-रावी त्यांच्या अभावीं शंकराचें पूजन करावें. शिवार्चन करण्यास आणिलेल्या वि-शेष द्रव्यांनीं इतर देवांचें पूजन करावें परंतु इतर देवतांचें पूजन करून राहिले-ल्या द्रव्यांनीं शिवार्चन करूं नये. (२३३) देवाच्या बागेंतील फूल किंवा दुसरें पूजाद्रव्य बळजोरीनें आणून किंवा चोरून आणून शहाण्यानें त्याचा उपयोग करूं नये. (२३४) निवेदन केलेल्या निर्माल्यानें युक्त अशा कलशानें शंकरास भक्तीनें स्नान घातलें असतांहि तें शंकर स्वीकार करीत नाहीं. (२३५) देवकार्याकरितां, गुरुकार्याकरितां, गणकार्याकरितां किंवा योग्याकरितां केलेल्या खननानें, उत्पाट-नानें किंवा कांपल्यानें तें कर्म करणारा तो मनुष्य पापी होत नाहीं. (२३६) ज्या वृक्षांचीं पुष्पें, पानें वगैरे जिनसांचा शिवार्चनांत उपयोग झाला ते वृक्ष शैव हो-ऊन रुद्रलोकाला जातात यांत संशय नाहीं. (२३७) पूजिलेल्या किंवा पूजा होत

क्तितः शिवं ॥ श्रुत्वा तु मोदते भक्त्या स च यागफलं लभेत् ॥२३७॥ अशठाः सर्वभृत्याश्च देवकार्यवियोजिताः ॥ प्रयांति स्वामिना सार्धं श्रीमच्छिवपुरं महत् ॥२३८॥ भुक्त्वा तु विपुलान् भोगान् भृत्यवर्गसमन्वितः ॥ कालात्पुनरिहायातः पृथिव्यामेकराड्भवेत् ॥२३९॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वा विभवान्वितः ॥ विभवानुमतद्रव्यैः पूजयेदन्यथा वृथा ॥२४०॥ अस्मिन्नर्थे वायवीयसंहितायां ॥ आढ्यो वाथ दरिद्रो वा स्वकां शक्तिमवंचयन् ॥ द्रव्यैर्न्यायार्जितैरेव भक्त्या देवं समर्चयेत् ॥ २४१ ॥ भक्त्या वित्तानुसारेण शिवमुद्दिश्य यत्कृतं ॥ अल्पे महति वा साम्यं फलमाढ्यदरिद्रयोः ॥२४२॥ भक्त्या प्रचोदितः कुर्यादल्पवित्तोऽपि मानवः ॥ महाविभवसारोऽपि न कुर्याद्भक्तिवर्जितः ॥२४३॥ सर्वस्वमपि यो दद्याच्छिवे भक्तिविवर्जितः ॥ स तेन फलभाग्नस्याद्भक्तिरेवात्र कारणं ॥२४४॥ यद्यदिष्टं समुत्कृष्टं न्यायप्राप्तं च यद्भवेत् ॥ शिवाय तन्निवेद्यं स्याद्भक्त्यानंतफलार्थिभिः ॥२४५॥ अथ न्यायार्जितैश्चापि भक्त्या चेच्छिवमर्चयेत् ॥ न तस्य प्रत्यवायोऽस्ति भा-

---

असलेल्या शिवास जो भक्तीनें पाहतो किंवा ऐकतो किंवा ज्यास आनंद होतो त्यास यज्ञ केल्याचें फल मिळतें. (२३८) यजमानाबरोबर शिवकार्यी योजिलेले सर्व भाविक भृत्यजन स्वामीबरोबर प्रख्यात मोठ्या शिवपुरास जातात. (२३९) आपल्या चाकरवर्गासह तेथें विपुल भोग भोगून कांहीं कालानें पुनः इहलोकीं येऊन पृथ्वीवर चक्रवर्ती राजा होतो. (२४०) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, किंवा शूद्र हा वैभवशाली असेल तर त्यानें आपल्या ऐश्वर्याच्या मानानें शिवपूजन करावें, नाहींतर तें अर्चन व्यर्थ होय. (२४१) ह्याच अर्थी वायवीयसंहितेंत सांगितलें आहे कीं मनुष्य श्रीमान् असो किंवा दरिद्री असो त्यानें आपल्या शक्त्यनुरूप व न्यायानें संपादिलेल्या द्रव्यानें भक्तिपुरःसर शिवार्चन करावें. (२४२) भक्तीनें व ऐपतीप्रमाणें शिवाला उद्देशून जें केलें जातें त्यांत लहानमोठ्यांत साम्य असून गरीब व श्रीमंत या उभयतांस फल सारखेंच आहे. (२४३) गरीब असला तरी मनुष्यानें भक्तिपूर्वक कर्म करावें व श्रीमंत असला तरी भक्तिवर्जित कर्म करूं नये.(२४४) भक्तिविना जर कोणीं आपलें सर्वस्व शिवार्पण केलें तरी त्यानें त्यास फल मिळणार नाहीं. कारण फलप्राप्तीस भक्तिच मुख्य कारण आहे. (२४५) अनंत फलाची इच्छा करणाऱ्यानें जें इष्ट, उत्कृष्ट व न्यायानें संपादिलेलें असेल तें भक्तिपूर्वक शिवाला निवेदन करावें. (२४६) जें न्यायानें मिळविलें असेल तें कांहींहि असलें

ववश्यो यतः प्रभुः ॥२४६॥ न्यायार्जितैरपि द्रव्यैरभक्त्या पूजयेद्यदि ॥ न तत्फलमवाप्नोति भक्तिरेवात्र कारणं॥२४७॥ शिवमुद्दिश्य यद्दानं सर्वकारणकारणं ॥ तदनंतफलं दातुर्भवतीति किमद्भुतं ॥२४८॥ सर्वेषामपि पात्राणामतिपात्रो महेश्वरः ॥ शिवे दत्तं हुतं जप्तं भक्त्या च विनिवेदितं ॥२४९॥ सर्वं तदक्षयं प्राहुरागमार्थविशारदाः ॥ एकमत्यंतफलदं तद्भवेन्नात्र संशयः ॥२५०॥ इति शैवरत्नाकरे पंचमोऽध्यायः ॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ॥

---

तरी भक्तिपूर्वक शिवार्पण करावें. (२४७) कारण शिव हा भक्तिवश्य आहे. न्यायसंपादित द्रव्य असूनहि जर तें भक्तिविना अर्पण केलें तर अर्पण करणारास फलप्राप्ति होत नाहीं, कारण फलप्राप्तीस भक्तिच कारण आहे. (२४८) शिवाला उद्देशून केलेलें दान हें सर्व कारणांचें कारण आहे ह्मणून तें दात्यास अनंत फल देणारें आहे यांत आश्चर्य तें कोणतें ? (२४९) दान देण्यास सर्व पात्र वस्तूंमध्यें महेश्वर दान घेण्यास अत्यंत पात्र आहे. शिवाला अर्पण केलेलें, हवन केलेलें, शिवाकारणें जप केलेलें व भक्तीनें निवेदन केलेलें (२५०) हें सर्व अविनाशक फल देणारें आहे असें आगमार्थ जाणणाऱ्यांचें मत आहे. हें एकच अत्यंत फल देणारें आहे यांत संशय नाहीं असा अभिप्राय आहे. ह्याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रंथांतील पांचवा अध्याय पुरा झाला.



## ॥ अथ षष्ठोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ उपचारः ॥ उपचारानथो वक्ष्ये पुराणश्रुतिसंमतान् ॥ स्कंदे ॥ उपचारास्त्रयः प्रोक्ताः पंचाष्टौ दश षोडश ॥ चतुर्विंशच्च द्वात्रिंशदुपचारा गुहोदिताः ॥१॥ स्नानं पूजा च नैवेद्यमुपचारास्त्रयः क्रमात् ॥ प्रदक्षिणनमस्कारः पंचैते संप्रकीर्तिताः ॥२॥ पार्थिवाद्यैश्च सद्यादिपंचमंत्रैः समर्चनं ॥ पंचोपचारमित्युक्तं ब्रह्मणा परमेष्ठिना ॥३॥ संगीतनृत्यवाद्यैस्तैरुपचाराष्टकं मुने ॥ अर्घ्यं पाद्यमाचमनं मधुपर्काचमानकं ॥४॥ गंधादयो निवेद्यांता उपचारा दश क्रमात् ॥ आवाहनासने पाद्यमर्घ्यमाचमनीयकं ॥५॥ स्नानमाचमने वस्त्रं तथाचामोपवीतके ॥ आचामो गंधपुष्पे च धूपदीपनिवेदनं ॥६॥ प्रदक्षिणनमस्कारावात्मन्यारोपणं ततः ॥ उपचाराः षोडशोक्ताःस्कंदेन च महात्मना ॥७॥ आवाहनासने पाद्यमर्घ्यमाचमनीयकं ॥ स्नानं वस्त्रं चोपवीतमक्षतं गंधपुष्पकं ॥८॥ धूपं दीपं च नैवेद्यं फलं तांबूलकं स्तुतिः ॥ प्रदक्षिणनमस्कारशय्यासंगीतवाद्यकं ॥ ९ ॥ नृत्यं चात्मारोपणं च चतुर्विंशोपचारकाः॥ आवाहनासने पाद्यमर्घ्यमाचमनीयकं ॥ १० ॥ स्नानं

---

(१) यानंतर पुराण व वेद यांस मान्य असे उपचार सांगतों. स्कांदपुराणामध्यें–तीन, पांच, आठ, दहा, सोळा, चोवीस किंवा बत्तीस उपचार गुहानें सांगितले आहेत. (२) स्नान, पूजा, नैवेद्य, हे अनुक्रमें तीन उपचार होत. यांत प्रदक्षिणा व नमस्कार हे दोन मिळविले असतां पूर्वोक्त पांच उपचार होतात. (३) पार्थिवादि व सद्योजातादि पंचमंत्रांनीं केलेलें पूजन पंचोपचार होत असें परमेष्ठी ब्रह्मदेवानें ह्मटलें आहे. (४) हे ऋषे, पूर्वोक्त पंचोपचारांत गायन, नर्तन, वाजविणें हे तीन उपचार मिळविले असतां आठ उपचार होतात; अर्घ्य, पाद्य, आचमन, मधुपर्क, पंचामृत, (५) गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, हे दहा उपचार होत; आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, (६) स्नान, पुनराचमन, वस्त्र, उपवीत, आचमन, गंध, पुष्प, धूप, दीप, (७) प्रदक्षिणा, नमस्कार, आत्मनिवेदन, हे थोर मनाच्या स्कंदानें सांगितलेले सोळा उपचार होत. (८) आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, उपवीत, अक्षता, गंध, पुष्प, (९) धूप, दीप, नैवेद्य, फल, तांबूल, स्तुति, प्रदक्षिणा, नमस्कार, शय्या, गायन, वादन, (१०) नाच, व आत्मनिवेदन हे चोवीस उपचार होत; आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, (११) स्नान, वस्त्र, उपवीत, अलंकार, अनुलेपन, तिलाक्षता, पुष्प,

वस्त्रं चोपवीतं भूषणं चानुलेपनं ॥ तिलाक्षतापुष्पधूपदीपनैवेद्यकानि च ॥११॥ मुखवासननीराजदर्पणं च फलानि च ॥ तांबूलप्रदक्षिणौ च नमस्कारस्तुतिस्ततः ॥ १२ ॥ पुराणपठनं छत्रं व्यजनं चामरं तथा॥ शय्यासंगीतनृत्यं च वाद्यानि च तथैव च ॥१३॥ आत्मन्यारोपणं चेति द्वात्रिंशदुपचारकाः ॥ आवाहनं तु यो दद्यात्स च ऋतुफलं लभेत्॥१४॥ आसनं रुचिरं दत्वा शक्रत्वं च समाप्नुयात् ॥ पाद्येन पातकं हन्याद-र्घ्येणाप्नोत्यनर्घ्यतां ॥ १५ ॥ ततश्चाचमनं दत्वा सुचित्तस्सुखितां व्रजे-त् ॥ स्नानं व्याधिभयं हन्याद्वस्त्रेणायुष्यवर्धनं ॥ १६ ॥ उपवीतं तु यो दद्याद्ब्रह्मवेतृत्वमेव च ॥ भूषणानि च यो दद्याद्गाणपत्यमवाप्नुयात् ॥१७॥ नानापुष्पप्रदानेन स्वर्गे राज्यमवाप्नुयात् ॥ धूपो दहति पापानि दीपो मृत्युविनाशनः ॥१८॥ सर्वमानं तु नैवेद्यं दत्वा तृप्तिरतो भवेत् ॥ मुखवासनदानेन कीर्तिमान् भवति ध्रुवं ॥१९॥ नीराजनेन शुद्धात्मा द-र्पणेन प्रकाशवान् ॥ फलदः पुत्रवान्मर्त्यस्तांबूलात्स्वर्गमाप्नुयात् ॥२०॥

---

धूप, दीप, नैवेद्य, (१२) मुखवासन, नीराजन, दर्पण, फळें, तांबूल, प्रदक्षिणा, नमस्कार, स्तुति, (१३) पुराणवाचन, छत्र, व्यजन (पंखा), चामर (चौरी), शय्या, गायन, नाच, वादन, (१४) व आत्मारोपण, असे हे बत्तीस उपचार होत. जो कोणी देवास आवाहन समर्पण करितो तो यज्ञाचें फल मिळवितो. (१५) सुं-दर आसन अर्पण केलें असतां इंद्रपद प्राप्त होतें, व पाद्यार्पणानें पातकांचा नाश होतो व अर्घ्यदानानें अनर्घ्यता प्राप्त होते. (१६) नंतर आचमन दिलें असतां मनाचें उत्कृष्ट समाधान लाभतें ( ह्मणजे मन संतुष्ट होतें ). देवास स्नान घातलें असतां व्याधीचें भय नाहींसें होतें व वस्त्रार्पण केलें असतां आयुष्य वाढतें. (१७) जो कोणी देवास यज्ञोपवीत अर्पण करितो त्यास ब्रह्मज्ञान प्राप्त होतें व जो कोणी अलंकार अर्पण करितो त्यास गणांचें आधिपत्य मिळतें. (१८) भिन्नभिन्न जातींचीं फुलें देवास अर्पण केलीं असतां अर्पण करणारास स्वर्गांत राज्य मिळतें; देवापुढें धूप जाळिला असतां पापांचा नाश होतो व दीप लाविला असतां मृत्यूंचा नाश होतो. (१९) नैवेद्य अर्पण केला असतां सर्व प्रकारची तृप्ति होते व मुखवासनाच्या अर्पणानें मनुष्य निश्चयानें कीर्तिमान् होतो. (२०) देवास नीराजन दिलें असतां मनुष्य शुद्धात्मा होतो व दर्पण दान केलें असतां मनुष्य प्रकाशित होतो, तसेंच त्यानें फल दान केलें असतां तो पुत्रवान् होतो व तांबूल अर्पण केलें असतां त्यास

प्रदक्षिणं तु यः कुर्यात् पापं हंति पदे पदे ॥ दंडप्रणामं यः कुर्याद्देव मुद्दिश्य सन्निधौ ॥ २१ ॥ वर्षाणि वसते स्वर्गे देहांते रेणुसंख्यया ॥ स्तोत्रेण दिव्यदेहोऽपि वाग्मी भवति कीर्तनात् ॥२२॥ पुराणपठनेनैव सर्वपापक्षयो भवेत् ॥ छत्रं दत्वा महेशाय नंदीश्वरसमो भवेत् ॥२३॥ ततः क्रमात्क्षितिं प्राप्य सार्वभौमो नृपो भवेत् ॥ तालवृंतेन संवीज्य वायुलोके महीयते ॥ २४ ॥ मायूरचामरं दत्वा मायूरगणराड् भवेत् ॥ दत्वा वै चामरं देवं *वीज्यते सः शिवे पुरे ॥ २५ ॥ युगकोटिशतं भुक्त्वा चांते राज्यमवाप्नुयात् ॥ संगीतनृत्यं यः कुर्यात्सर्वयज्ञफलं लभेत् ॥२६॥ मृदुशय्याप्रदानेन चाक्षतं पदमाप्नुयात् ॥ सुखश्रवणतां गच्छेद्वाद्येन शिवसंनिधौ ॥ २७ ॥ हृत्पंकजे शिवं स्थाप्य शिवत्वं प्राप्नुयाद्ध्रुवं ॥ एवं संक्षिप्य कथितमुपचारमनुत्तमं ॥ अन्यानप्युपचारांश्च मूलेनैव तु दापयेत् ॥२८॥ इति श्रीशैवरत्नाकरे षष्ठोऽध्यायः ॥

---

स्वर्गप्राप्ति होते. (२१) जो कोणी देवास प्रदक्षिणा घालतो त्याचीं पावलोपावलीं पापें नाश होतात व देवासमोर देवास उद्देशून जो कोणी साष्टांग नमस्कार घालितो तो (२२) त्याचे अंगास लागलेल्या वाळूच्या कणांची जी संख्या असेल तितकीं वर्षें स्वर्गलोकामध्यें राहतो. देवाचें स्तोत्र केलें असतां मनुष्य दिव्यदेही होतो व देवाच्या गुणांचें कीर्तन केलें असतां मनुष्य वक्ता होतो. (२३) देवापुढें पुराण वाचिलें असतां सर्व पापांचा क्षय होतो; महादेवास छत्र अर्पण केलें असतां अर्पण करणारा नंदीश्वराप्रमाणें होतो ( ह्मणजे नंदीश्वराचे पदवीस चढतो ) (२४) नंतर क्रमानें पुनः पृथ्वीवर येऊन तो चक्रवर्तिराजा होतो; शंकरास पंख्यानें वारा घातला असतां मनुष्य वायुलोकामध्यें श्रेष्ठत्व पावतो. (२५) मयूरपिच्छाचीं चामरें अर्पण केलीं असतां मयूरगणाचा राजा होतो. व शिवपुरामध्यें त्यास त्या चामरांनीं वारा घातला जातो. (२६) याप्रमाणें शंभर कोट युगें तेथें उपभोग घेऊन अंतीं त्यास राज्यपद मिळतें. संगीत नाच जो कोणी शंकरापुढें करितो त्यास सर्व यज्ञांचें फल मिळतें. (२७) मृदु शय्या देवास अर्पण केली असतां अक्षयपद प्राप्त होतें. शंकरासमोर वादन केलें असतां सुखश्रवणता प्राप्त होते. (२८) हृत्कमलामध्यें शंकराचें ध्यान केलें असतां ध्यान करणारास निश्चित शिवस्वरूप प्राप्त होतें. याप्रमाणें उत्तम उपचार संक्षेपानें येथें सांगितले आहेत. दुसरे उपचार मूलमंत्रानें अर्पण करावेत. याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रंथांतील सहावा अध्याय समाप्त झाला.

---

* राजते

## ॥ अथ सप्तमोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ पिंडोत्पत्तिः ॥ अथ पिंडोत्पत्तिक्रमं वक्ष्यामि॥ संसारदीपिके शास्त्रे ॥ शांतं शुद्धस्वभावं च सर्वदानंदविग्रहं ॥ भैरवं विश्वभरणं भगवंतमुमापतिं ॥१॥ देवदेवं जगन्नाथं योगिनीचक्रनायकं ॥ प्रणम्य शिरसा देवी पृच्छतीशं विमुक्तये ॥२॥

देव्युवाच ॥ दुस्तरं देवदेवेश संसारांभोनिधिं प्रभो ॥ सुखोपायेन पशवस्तरंति च यथा वद ॥ ३ ॥

ईश्वरः ॥ साधु साधु महाभागे शोभनं *कथितं त्वया ॥ अधुना संप्रवक्ष्यामि +देहस्थं लक्षणं यथा ॥ ४ ॥ कुलज्ञानं सुरश्रेष्ठ निश्चितं कथयामि ते ॥ गुह्यात्परतरं गुह्यं कुलरत्नं यथा प्रिये ॥ ५ ॥ न ध्याने लक्ष्ययोगे न च हृदि कमले धारणे नैकहंसे नाकाशे वायुतत्त्वे क्षितिरनलजले द्वादशांते न घोषे ॥ श्रुत्यंते बिंदुनादे न च करणलये नादिमध्यावसाने एभिःस्थानैर्विमुक्तं सकलतनुमयं सर्वगं तन्नमामि ॥६॥ कुलस्य ज्ञानमात्रेण सर्वज्ञत्वं प्रजायते ॥ चैतन्यं बीजरूपं च शुक्लं रक्तं तथा जलं ॥७॥ एकीभूतं यदा काले तदा काले प्ररोहति ॥ कललं

---

(१) आतां पिंडोत्पत्तिक्रम सांगतों. संसारदीपिकशास्त्रामध्यें सांगितलें आहे कीं, शांत, शुद्धस्वभाव, नित्य आनंदस्वरूप, विश्वव्यापी, षड्गुणैश्वर्यसंपन्न, (२) सर्व देवाधीश, जगाचा स्वामी, योगिनीचक्रामध्यें श्रेष्ठ, अशा शंकरास साष्टांग नमस्कार घालून मोक्षप्राप्तीकरितां (३) देवी शिवास प्रश्न करित्ये–

देवी बोलली–हे देवाधिदेवा, हे प्रभो हे प्राणी जेणेकरून दुस्तर भवसागर सुखानें तरून जातील असा कांहीं उपाय सांगा. (४–५)

ईश्वर बोलले–हे महाभागे पार्वति फार उत्कृष्ट प्रश्न केलास; आतां तुला मोठमोठ्या देवांनीं निश्चित केलेलें कुलज्ञान सांगता; तें देहाचे ठिकाणीं पाहावें; हे प्रिये तें कुलरत्न फारच गुप्त आहे. ( ६ ) जो ध्यानाचें ठिकाणीं नाहीं जो लक्ष्याचे ठिकाणीं नाहीं; जो हृत्कमल, धारणा, हंसमंत्र, आकाश वायुतत्व, पृथ्वी, अग्नि, जल, द्वादशांतचक्र, घोष, वेदान्त, बिंदु, नाद, इंद्रियसमूह, आदि, मध्य, अंत याठिकाणीं नसून सर्व शरीरांमध्यें असतो अशा सर्वव्यापी ईश्वरास मी नमन करितों. (७) कुलज्ञान झालें असतां सर्व जाणतेपणा उपजतो; बीजरूपी चैतन्य, शुक्र, रक्त, जल, (८) हीं जेव्हां एकत्र होतात तेव्हां पिंडोत्पत्तीस आरंभ होतो; एका रात्रींत त्याचें कलल होतें; पांच रात्रींत त्याचें बुद्बुद होतें;

---

* पृच्छयते  + लक्षणंत्विदं

त्वेकरात्रेण पंचरात्रेण बुद्बुदं ॥८॥ शोणितं दशरात्रेण मांसपेशी त्रिपंचके ॥ पुनर्मांसं च विंशाहे गर्भस्थो वर्धते क्रमात् ॥९॥ पंचविंशति संपूर्णफलं पंचांकुरायते ॥ मासेनैकेन संपूर्णं पंचतत्वानि धारयेत् ॥१०॥ मासद्वयेन संपूर्णमांसं मेदः प्रजायते ॥ मज्जास्थीनि त्रिभिर्मासैः केशा गुह्यं चतुर्थके ॥११॥ कर्णाक्षिनासिकास्यादिरंध्रादिर्मासपंचके ॥ कंधरा चोदरं षष्ठे गुदपादं च सप्तमे॥ सर्वांगसंधिसंपूर्णो मासैः स्यादष्टभिः प्रिये ॥१२॥ मासे तु नवमे प्राप्ते गर्भस्थः स्मरति स्वयं ॥ मृतश्चाहं पुनर्जातो जातश्चाहं मृतः पुनः ॥ १३ ॥ नानायोनिसहस्रेषु मया दृष्टमनेकशः॥ चिकित्सा जायते तस्य गर्भवासं परित्यजेत् ॥१४॥ रक्ताधिक्ये भवेन्नारी शुक्राधिक्ये नरः स्मृतः ॥ नपुंसकः समे द्रव्ये त्रिविधः पिंडसंभवः ॥१५॥ शक्तित्रयविशालांगं षट्कौशिकसमाश्रितं ॥ बृहद्भूतमयोपेतं श्रोत्रेंद्रियसमन्वितं ॥१६॥ पंचकर्मेंद्रियैर्युक्तं दशनाडि-

---

(९) दहा रात्रींत शोणित होतें व पंधरा रात्रींत मांसपेशी होतें. नंतर वीस दिवसांत मांस होतें. याप्रमाणें गर्भस्थ जीव वाढत असतो. (१०) पंचवीस दिवसांनीं तें फल पूर्ण होऊन त्यास पांच अंकूर फुटतात; एका महिन्यानें तो गर्भ संपूर्ण पंचतत्वांचें धारण करितो. (११) दोन महिन्यांनीं मांस, मेद हीं पूर्ण उत्पन्न होतात; तीन महिन्यांनीं मज्जा, अस्थि हीं उत्पन्न होतात व चौथे महिन्यांत केश, गुह्य हीं उत्पन्न होतात. (१२) पांचवे महिन्यांत कान, नाक तोंड इत्यादि रंध्रें उत्पन्न होतात; सहाव्या महिन्यांत मान, पोट हीं निर्माण होतात व गुद व पाद हीं सातव्या महिन्यांत उत्पन्न होतात व हे प्रिये तो गर्भ सर्व अवयवांनीं पूर्ण असा आठ महिन्यांनीं होतो(१३)नववा महिना लागतांच गर्भस्थ जीवास अशी स्मृति उत्पन्न होते कीं, मी एकवार मरण पावून पुनः जन्मास आलों आहें व पुनरपि मरणार आहें. (१४) भिन्नभिन्न हजारो योनींमधून मीं अनेक अनुभव घेतले आहेत आतां आपण गर्भवास सोडावा असा त्याचे ठिकाणीं विचार उत्पन्न होतो. (१५) रक्ताचें प्रमाण जास्त झालें असतां स्त्री होते व शुक्र जास्त झालें असतां पुरुष जन्मतो व सर्व द्रव्यें समान झालीं असतां तृतीयप्रकृति प्राणी जन्मतो. याप्रकारें तीन प्रकारची पिंडोत्पत्ति आहे. (१६) शक्तित्रयानें ज्याची अंगें विशाल आहेत; ज्याला सहा कोश आहेत; जो पंचभूतांनीं युक्त आहे; ज्यास ज्ञानेंद्रियें आहेत, (१७) व ज्यास पंचकर्मेंद्रियें व दहा नाडी आहेत व जो दशवायूंनीं युक्त आहे असा हा

भिरूर्जितं ॥ दशानिलगुणोपेतं यो जानाति स योगवित् ॥१७॥ मज्जा-स्थिशुक्रधातुश्च रक्तमांसस्त्वचस्तथा ॥ षट्कौशिकामिदं पिंडं तस्यांते पांचभौक्तिकं ॥१८॥ पंचभूतमयोपेतं बुद्धींद्रियसमन्वितं ॥ क्षितिर्वाय्व-ग्निरानिलस्तथाकाश इति क्रमात् ॥१९॥ स्थूलभूता इमे पंच सवाह्या-भ्यंतरास्थिताः ॥ अस्थिमांसस्त्वचोनाडी रोमाणि इति पंचकं ॥२०॥ क्षितेः पंच गुणा एते समासात्परिकीर्तिताः ॥ लाला मूत्रं तथा स्वेदः शुक्रं शोणितमेव च॥२१॥ अपां पंच गुणा एते समासात्कथिता मया॥ क्षुधा तृष्णा तथा निद्राप्यालस्यं कांतिरेव च ॥ २२ ॥ तेजः पंच गुणाः प्रोक्ता ज्ञातव्या हि विशेषतः ॥ धावनं वलनं चैव समाकुंचप्रसारणं २३॥ निरोधः पंचमः प्रोक्तो वायोः पंच गुणाः स्मृताः॥ रागद्वेषौ तथा लज्जा भयं मोहस्तथैव च॥२४॥ व्योम्नः पंच गुणा ह्येते समासात्परि-कीर्तिताः ॥ श्रोत्रं त्वक् चक्षुषी जिव्हा घ्राणं बुद्धींद्रियाणि च ॥ २५॥ वाक्पाणिपादपायू च गुह्यं कर्मेंद्रियाणि च ॥ ईडा च पिंगला चैव सुषुम्ना च तृतीयका ॥ २६ ॥ गांधारी हस्तिजिव्हा च पूषा चैव पय-स्विनी ॥ अलंवुषा कुहुश्चैव शंकिनी दशमी स्मृताः ॥ २७ ॥ पिंडमध्ये तथा ह्येताः प्रधाना दश नाडयः ॥ कुलपिंडं समाख्यातं विभवं कथ-

---

पिंड जो जाणतो तो योगी होय. (१८)मज्जा, अस्थि, शुक्रधातु, रक्त, मांस व त्वचा मिळून सहा कोशांनीं युक्त पिंड आहे व यांचे आंत पंचभौतिक कोश आहे. (१९) अशा प्रकारें ह्या पिंड पंचभूतें, बुद्धि व इतर इंद्रियें यांनीं युक्त असा आहे. पृथ्वी, उदक, अग्नि, वायु, व आकाश हीं क्रमशः पंचभूतें होत (२०—२१) हीं पंचस्थू-लभूतें अंतर्बाह्य आहेत; अस्थि, मांस, त्वचा, नाडी, रोम असे हे पृथ्वीचे पांच गुण ह्मणून संक्षेपानें सांगितले आहेत; लाळ, मूत्र, घाम, शुक्र, रक्त (२२) असे हे जलाचे पांच गुण संक्षेपानें म्या सांगितले आहेत; भूक, तहान, निद्रा, आलस्य व कांति हे (२३) तेजाचे पांच गुण सांगितले आहेत असें विशेषतः जाणावें; पळणें गुंडाळणें आकुंचन पावणें; प्रसरण पावणें; (२४) अवरोध पावणें हे वायूचे पांच गुण होत; राग, द्वेष, लज्जा, भय, मोह (२५) हे आकाशाचे पंचगुण संक्षेपानें सांगितले आहेत; कान, त्वचा, डोळे, जीभ, नाक हीं बुद्धींद्रियें (२६) वाणी, हस्त, पाय, पायू, गुह्य हीं कर्मेंद्रियें व ईडा पिंगला सुषुम्ना (२७) गांधारी, हस्ति-जिव्हा, पूषा, पयस्विनी, अलंबुषा, कुहू व शंकिनी ह्या दहा नाड्या होत; (२८) पिंडामध्यें ह्या दहा नाड्या प्रधान होत याप्रमाणें कुलपिंडाचें व्याख्यान झालें. आतां

यामि ते ॥२८॥ ब्रह्मांडे ये गुणाः संति ते शरीरे व्यवस्थिताः ॥ पाताlभूधरालोकास्तथान्ये द्वीपसागराः ॥२९॥ आदित्यादिग्रहाः सर्वे पिंडमध्ये व्यवस्थिताः ॥ पादाधस्त्वतलं विद्यात्पादोर्ध्वे वितलं तथा ॥३०॥ जानुभ्यां सुतलं ज्ञेयं वितलं संधिबंधने ॥ तलातलमथोर्वोस्तु गुह्यस्थाने रसातलं॥३१॥ पातालं कटिसंधौ तु पादादौ लक्षयेद्बुधः॥ भूलोको नाभिमध्ये तु भुवर्लोको हृदि स्थितः ॥३२॥ स्वर्लोकः कंठदेशे तु महर्लोकस्तु तालुके ॥ जनर्लोकस्तदूर्ध्वं तु तपोलोको ललाटके ॥३३॥ सत्यलोकः शिरःस्थाने भुवनानि चतुर्दश ॥ त्रिकोणे संस्थितो मेरुरधः कोणे तु मंदरः ॥३४॥ कैलासो दक्षिणे कोणे वामकोणे हिमालयः ॥ निषधश्चोर्ध्वभागे च दक्षिणे गंधमादनः ॥३५॥ विंध्यस्तु रोमरेखायां सप्तैते कुलपर्वताः ॥ अस्थिस्थाने स्थितो जांबुर्मज्जस्थः प्लक्षसंज्ञकः ॥३६॥ कुशद्वीपः स्थितो मांसे क्रौंचद्वीपः शिरासु च॥ त्वचायां शाल्मली द्वीपो गोमेधो रोमसंचये ॥३७॥ नखस्थं पुष्करं विद्यात्सागरास्तदनन्तरं ॥ क्षारोदश्च तथा मूत्रे क्षीरे क्षीरोदसागरः

---

त्याचें वैभव सांगतों. (२९) ब्रह्मांडामध्यें जे गुण आहेत ते सर्व या शरीरामध्यें व्यवस्थित राहिले आहेत; पाताललोक, भूधरलोक त्याचप्रमाणें दुसरे द्वीपसागर(३०) आदित्यादि सर्व ग्रह या पिंडामध्यें व्यवस्थित राहिले आहेत. पायाचे खालचे अंगास अतल असें ह्मणावें व पायाचे ऊर्ध्व भागास वितल असें (३१) गुडघ्यांस सुतल असें, सांध्यांस वितल असें अनुक्रमें समजावें; मांड्यांस तलातल व गुह्यस्थानास रसातल (३२) कमरेच्या संधिभागाला पाताल आहे असें सूज्ञानें जाणावें; नाभिमध्यभागीं भूलोक; हृदयामध्यें भुवर्लोक; (३३) कंठाचे ठिकाणीं स्वर्लोक; तालुप्रदेशांत महर्लोक; त्यावर जनर्लोक; ललाटभागीं तपोलोक; (३४) शिरस्थानांत सत्यलोक ह्याप्रमाणें चवदा भुवनें आहेत. त्रिकोणभागीं मेरुपर्वत असून अधोभागीं मंदरपर्वत आहे. (३५) दक्षिण कोणामध्यें कैलासपर्वत असून वामकोणामध्यें हिमालय आहे; ऊर्ध्वभागीं निषध असून दक्षिणभागीं गंधमादनपर्वत आहे. (३६) केसांच्या रांगेमध्यें विंध्यपर्वत आहे याप्रमाणें हे सात कुलपर्वत होत. हाडांमध्यें जांबुद्वीपाचें वास्तव्य असून मज्जेमध्यें प्लक्षसंज्ञक द्वीप आहे. (३७) मांसांत कुशद्वीप असून क्रौंचद्वीप शिरांमध्यें आहे; त्वचेचे ठिकाणीं शाल्मलीद्वीप असून रोमसमूहामध्यें गोमेधनामक द्वीप आहे. (३८) नखांत पुष्करद्वीप आहे असें जाणावें. यानंतर सागरविवेचन करितात तें असें:—मूत्रांत क्षारसमुद्र असून दुधांत दु-

॥३८॥ दध्यर्णवस्तथा श्लेष्मे मज्जायां सर्पिरर्णवः ॥ रसोदधिर्वसांते च शोणिते च सुरोदधिः ॥३९॥ स्वादूदो लंबिकास्थाने गर्भस्थाः सप्तसागराः ॥ नादचक्रे स्थितः सूर्यो बिंदुचक्रे च चंद्रमाः ॥४०॥ लोचनाभ्यां कुजो ज्ञेयो हृदये च बुधः स्मृतः ॥ गुह्यस्थाने गुरुं विद्याच्चक्रे शुक्रः समाश्रितः ॥४१॥ नाभिस्थाने स्थितो मंदो मुखांते राहुराश्रितः ॥ नादस्थाने स्थितो केतुरश्विन्याद्यास्त्रयस्त्रयः ॥४२॥ विभवश्च समाख्यात आपादतलमस्तकं ॥ हृदिस्थाने स्थितो ब्रह्मा कण्ठे विष्णुः समाश्रितः ॥४३॥ भ्रूमध्ये संस्थितो रुद्रस्तस्योर्ध्वे ईश्वरः स्मृतः॥ सदाशिवो ललाटांते पंचैते भूतनायकाः ॥४४॥ इति संसारदीपिके पिंडोत्पत्तिनिर्णयः ॥

शैलादिः ॥ ब्रह्माद्याः स्थावरांताश्च देवदेवस्य धीमतः ॥ पशवः परिकीर्त्यंते संसारवशवर्तिनः ॥४५॥ तेषां पतित्वाद्देवेशो रुद्रः पशुपतिः स्मृतः ॥ अनादिनिधनो दाता भगवान् विभुरव्ययः ॥४६॥ मायापा-

---

घसागर आहे. (३९) श्लेष्मामध्यें दधिसागर असून मज्येमध्यें सर्पिसागर (मधाचा सागर) आहे. चर्बीमध्यें रसोदधि (उंसाच्या रसाचा सागर) असून रक्तामध्यें सुरोदधि (दारूचा सागर) आहे. (४०) लंबिकेचे ठिकाणीं स्वादुसागर आहे; असे गर्भाचे ठिकाणीं सात समुद्र सांगितले आहेत. नादचक्राचे ठिकाणीं सूर्य असून बिंदुचक्राचे ठिकाणीं चंद्रमा आहे. (४१) दोन डोळ्यांचे ठिकाणीं मंगळ असून हृदयांत बुध आहे असें जाणावें; गुह्यस्थानीं गुरु आहे असें जाणावें व चक्रभागीं शुक्राचा आश्रय आहे. (४२) नाभिभागीं शनैश्चर असून मुखांत राहूचें स्थान आहे व नादभागीं केतु असून अश्विनी आदीकरून तीन तीन आहेत. (४३) याप्रमाणें पायापासून मस्तकापर्यंत सर्व वैभव सांगितलें. हृदयस्थानीं ब्रह्मा असून कंठांत विष्णूचें आश्रयस्थान आहे. (४४) भ्रूभागीं रुद्र असून त्यावर ईश्वर आहे व ललाटांतीं सदाशिव आहे हे पांच भूतमात्रांचे स्वामी होत. याप्रमाणें संसारदीपिकानामक शास्त्रांतील पिंडोत्पत्तिनिर्णय समाप्त झाला.

नंदीश्वर सांगतात–(४५) ब्रह्मदेवापासून तों सर्व चराचर वस्तूंपर्यंत सर्व प्राणिमात्रांना त्या देवाधिदेव शंकराचे संसारांत निमग्न झालेले पशू आहेत असें ह्मटलें आहे. (४६) तो शंकर या जीवमात्राचा स्वामी असल्यामुळें त्यास पशुपति असें ह्मणतात तो आदिअंतरहित असून षड्गुणैश्वर्यसंपन्न व अविनाशी आहे. (४७) तो सदाशिव जीवांना आपल्या मायापाशानें बद्ध करितो. ज्ञानयोगानें त्याची सेवा

शेन बध्नाति पशूंस्तान् परमेश्वरः ॥ स एव मोचकस्तेषां ज्ञानयोगेन सेवितः ॥४७॥ अविद्यापाशबध्दानां नान्यो मोचक इष्यते ॥ तमृते परमात्मानं शंकरं परमेश्वरं ॥४८॥ ब्रह्मादिस्तंवपर्यंतं पशून् बध्वा महेश्वरः ॥ त्रिभिर्गुणमयैः पाशैः कार्यं कारयति स्वकम् ॥४९॥ ध्रुवेण भक्तियोगेन पशुभिः समुपासितः ॥ मोचयत्येव तान् सद्यः शंकरः परमेश्वरः ॥५०॥ धर्माधर्ममयैः पाशैर्बध्दानां देहिनामयम् ॥ मोचकः शिव एवैको भगवान् परमेश्वरः ॥५१॥ चतुर्विंशतितत्वानि ह्युपकर्मगुणा इति ॥ विषया इति कथ्यंते पाशा जीवस्य वंधनाः ॥५२॥ ते भक्ताः शिवभक्त्यैव मुच्यन्ते सर्वदेहिनः ॥ पंचक्लेशमयैः पाशैः पशून् वध्नाति शंकरः ॥५३॥ स एव मोचकस्तेषां भक्त्या सम्यगुपासितः ॥ क्षुधातृषा भयं द्वेषो रागमोहान्यचिंतनम् ॥५४॥ जरारुजौ च मृत्युश्च खेदः शोको मदो रतिः ॥ विस्मयं जननं निद्रालस्यमष्टादश ध्रुवं॥५५॥ शुभानामशुभानां च कर्मणां वापि संचयं ॥ करोति भस्मसाद्भक्तिर्दहत्यग्निरिवेंधनम् ॥५६॥ संचितं जन्मलक्षेण पापं नृणां निरन्तरम् ॥ करोति

---

केली असतां तोच मुक्त करणारा आहे. (४८) अविद्यापाशानें ह्मणजे मायापाशानें वद्ध झालेल्या जीवांना त्या परमात्म्या परमेश्वर शंकरावांचून दुसरा कोणीही मुक्तता करणारा इष्ट दिसत नाहीं. (४९) ब्रह्मादि स्तंवपर्यंत सर्व प्राण्यानां त्रिगुणात्मक पाशांनीं वद्ध करून तो परमेश्वर शंकर आपलें कार्य करवितो (५०) स्थिर भक्तियोगानें त्याची सेवा केली असतां तो परमेश्वर शंकर त्या सेवकांची तात्काल मुक्तता करितो. (५१) पुण्यापुण्यरूपी पाशांनीं वद्ध झालेल्या प्राण्यांना या देवाधिदेव षड्गुणैश्वर्यसंपन्न शंकरावांचून दुसरा कोणीही तारक नाहीं. (५२) उपाकर्मगुण अर्थी चोवीस आदितत्वें व इंद्रियाविषय हे जीवांचे पाश होत. (५३) शंकराच्या भक्तीनेंच सर्व भक्तांचा उद्धार होतो; तो शंकर पांच दुःखदायक पाशांनीं प्राण्यांना वद्ध करितो. (५४) भक्तिभावानें त्याची योग्य सेवा केली असतां तोच जीवांचा उद्धार करितो; भूक, तहान, भय, द्वेष, प्रीति, मोह, (५५) वार्धक्य, रोग, मृत्यु, दुःख, शोक, मद, संभोग, आश्चर्य, जनन, निद्रा, आळस, हीं अठरा (५६) त्याचप्रमाणें शुभाशुभकर्में यांची शंकराचे भक्तीनें अग्नींत टाकिलेल्या लांकडाप्रमाणें जळून राख होते. (५७) इतकेंच नव्हे परंतु मनुष्यांचें लक्ष जन्मींचें सांठलेलें पाप असलें तरी तें शंकराचे प्रसादानें भक्ति जाळून भस्म क-

भस्मसाद्भक्तिस्तस्य शंभोरनुग्रहात् ॥५७॥ भक्तिः शिवे यदि भवेन्न *कस्मान्मुक्तिरन्यया ॥ भवार्णवं तरत्येव प्रसादाच्छूलिनो मुने ॥५८॥ तीर्थयात्रा बहुविधा यज्ञाश्च विविधाः कृताः ॥ यैस्तु जन्मसहस्रेषु तेषां भक्तिर्भवेच्छिवे ॥५९॥ लैंगे ॥ चांद्रायणसहस्रं च प्राजापत्यं शतं तथा ॥ मासोपवासाश्चान्ये च भवभक्त्या मुनीश्वराः ॥६०॥

भक्तिस्थलं॥ भक्तिरष्टविधा ह्येषा सर्वशास्त्रेषु दृश्यते ॥ तामहं कथयिष्यामि भवपाशविनाशिनीं ॥६१॥ मद्भक्तजनवात्सल्यं पूजायाश्चानुमोदनं॥ स्वयमभ्यर्चनं भक्त्या ममार्थे चांगचेष्टनं॥६२॥ मत्कथाश्रवणे भक्तिः स्वरनेत्रांगविक्रिया॥ ममानुस्मरणे नित्यं यच्च मामुपजीवति॥६३॥ प्रसादादेव सा भक्तिः प्रसादो भक्तिसंभवः ॥ यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांकुरं ॥६४॥ वीरभद्रीये ॥ कामं भक्तिरतौ कुर्यात्क्रोधं चाधर्मकर्माणि ॥ लोभं शिवार्चने कुर्यान्मोहं भक्तजनेषु च ॥६५॥ मात्सर्यं

---

रून टाकित्ये. (५८) हे ऋषिवर्या शंकराचे ठिकाणीं भक्ति दृढ झाली असतां प्राणी त्याच्या प्रसादानें हा भवसागर कां बरें तरून जाणार नाहीं. (५९) अनेक प्रकारच्या तीर्थयात्रा, व नानातऱ्हेचे यज्ञ हीं अनेक जन्मांमध्यें ज्यांनीं केलीं आहेत त्यांची शिवाचे ठिकाणीं भक्ति जडत्ये. लिंगपुराणांत सांगतात (६०) मुनिश्रेष्ठहो, हजारों चांद्रायणव्रतें तसेंच शेंकडों प्राजापत्यव्रतें व मासोपवासव्रतें हीं शंकरभक्तीची बरोबरी करूं शकत नाहींत.

भक्तिस्थल सांगतातः—(६१) भक्ति आठ प्रकारची आहे असें सर्व शास्त्रांत सांगितलें आहे. अशी ती भवबंधनांतून सोडविणारी भक्ति मी तुला सांगतों. ( ६२ ) माझे भक्तांचे ठिकाणीं ममत्व, त्यांस माझी पूजा करूं देणें, आपण स्वतः पूजा करणें, माझेकरितां अंगविक्षेपन करणें, (६३) माझी कथा ऐकण्याविषयीं प्रेम बाळगणें; माझेकरितांच स्वर, नेत्र वगैरे सर्व अंगव्यापार करणें, सर्वकाळ माझें स्मरण करणें, फार काय सांगावें सर्व जीवनच माझेकरितां आहे असें मानणें यास भक्ति असें ह्मणतात. (६४) प्रसादापासून भक्ति व भक्तीपासूनच परमेश्वरप्रसाद उत्पन्न होतो अशी परंपरा आहे; ज्याप्रमाणें बीजापासून वृक्षोत्पत्ति होते व वृक्षापासून बीज होतें (६५) वीरभद्रीयांत सांगितलें आहे कीं, भक्तिप्रेमाविषयीं इच्छा असावी; पापकर्माविषयीं क्रोध असावा; शिवपूजेविषयीं लोभ असावा; व भक्तजनांविषयीं मोह बाळगावा; (६६) इंद्रियांचे ठिकाणीं मा-

---

* कस्मान्मुक्तिरीरिता ॥

करणेष्वेव मदं मायापराभवे ॥ व्यसनं शिवतत्वे च लिंगस्यैव निरीक्षणं ॥६६॥ इत्येतत्सात्विकं प्रोक्तं भक्तिरूपं प्रदर्शितं ॥ सकलं निष्कलं चैव द्विविधं सज्जनं स्मृतम् ॥ कालकूटसमं देवि सज्जनं शुद्धशैवकं ॥६७॥ ॐ ॥ नमः शिवाय सोमाय षट्त्रिंशत्तत्वरूपिणे ॥ अग्निष्टोमात्मने भस्मज्योतिषे शांततेजसे ॥६८॥ सर्वाण्यपि च शास्त्राणि पुराणानि विशेषतः ॥ श्रुतिस्मृतीतिहासादीनन्यानालोच्य कृत्स्नशः ॥६९॥ भस्मतत्वस्य विस्तारं विधानं च सुविस्तरं ॥माहात्म्यविस्तरं कार्त्स्न्यात्तत्तच्छास्त्रोक्तमार्गतः ॥७०॥ तत्तच्छ्लोकोक्तैरन्यैश्च सारमादाय संग्रहात् ॥ विभूतिमहिमाकल्परत्नसारसमुच्चयं ॥७१॥ काश्यामलब्धपंचत्वमतप्ततपनं तथा ॥ अपवर्गपदं नेतुं क्रियते भूतिपद्धतिः॥७२॥ जाबालोपनिषदि ॥ सद्योजातात्पृथिवी तस्या निवृत्तिः ॥ तस्याः कपिलवर्णा नंदा तस्या गोमयेन विभूतिर्जाता ॥ ॐ ॥७३॥ वामदेवादुदकं तस्मात्प्रतिष्ठा तस्याः कृष्णवर्णा भद्रा तस्या गोमयेन भसितं जातं॥७४॥

---

त्सर्य व मायेच्या नाशाविषयीं मद असावा. याप्रमाणें कामक्रोधादि षड्रिपूंची योजना असावी. शिवतत्व जाणण्याविषयीं नाद असून नेहमीं लिंगाचेंच अवलोकन करीत असावें. (६७) याप्रमाणें दाखविलेल्या भक्तिस्वरूपास सात्विकभक्ति असें ह्मणतात. सज्जन शुद्ध शैवमत सकल व निष्कल असें दोन प्रकारचें आहे. हे पार्वति सज्जनशुद्ध शैवमताचरण कालकूटाप्रमाणें भयंकर आहे. (६८)शुभदायक, उमासहित, छत्तीस तत्वस्वरूपी अग्निष्टोमात्मक व शांतस्वरूप, अशा भस्मज्योतिस्वरूप शंकराला नमस्कार असो.(६९) सर्व शास्त्रें विशेषतः पुराणें तसेंच वेद, स्मृति, इतिहास वगैरेचें सर्वशः अवलोकन करून (७०) भस्मतत्वाचा विस्तार व त्याचें विधान तसेंच निरनिराळ्या शास्त्रानें सांगितलेला सर्व माहात्म्यविस्तार सांगतों. (७१) त्याचप्रमाणें निरनिराळ्या श्लोकांचें संक्षेपानें सार काढून विभूतिमहिमाकल्पांतील रत्नाचा सारसमुच्चय सांगतों. (७२) ज्यास काशीमध्यें मृत्यु आला नाहीं अगर ज्याला पंचाग्निसाधन झालें नाहीं त्यास मोक्षप्राप्ति होण्यास विभूतिपद्धतीच साधन आहे. (७३) जाबालोपनिषदामध्यें सांगितलें आहे कीं, सद्योजातनामें शंकराचे मुखांतून पृथ्वी उत्पन्न झाली व पृथ्वीपासून निवृत्ति नामें कला उत्पन्न झाली, तीपासून कपिला ( पिंगट ) वर्णाची नंदा नामें गाय उत्पन्न झाली. तिच्या शेणापासून विभूति उत्पन्न झाली. (७४) ॐ वामदेव नामक मुखांतून जल उत्पन्न झालें. त्यापासून प्रतिष्ठानामें कला उत्पन्न झाली, तिच्यापासून काळ्या रंगाची भद्रानामें एक गाय

अघोराद्वन्हिस्तस्माद्विद्या तस्या रक्तवर्णा सुरभिस्तस्या गोमयेन भस्म जातं ॥७५॥ तत्पुरुषाद्वायुस्तस्माच्छांतिस्तस्याः श्वेतवर्णा सुशीला तस्या गोमयेन क्षारं जातं ॥ ७६ ॥ ईशानादाकाशस्तस्माच्छांत्यतीता तस्याश्चित्रवर्णा सुमनास्तस्या गोमयेन रक्षा जाता ॥७७॥ ऐश्वर्यैकारणाद्भूतिः ॥ भासनाद्भसितं सर्वाघभर्त्सनाद्भस्म आपदां क्षारणात्क्षारं ॥ भूतप्रेतपिशाचब्रह्मराक्षसापस्मारभवभीतिभ्योऽभिरक्षणाद्रक्षेति ॥७८॥ अस्मिन्नर्थे क्रियासारे ॥ विभूतिर्भसितं भस्म क्षारं रक्षेति भस्मनः ॥ भवंति पंच नामानि हेतुभिः पंचभिर्भृशं ॥ ७९ ॥ ऐश्वर्यकारणाद्भूतिर्भस्म सर्वाघभर्त्सनात् ॥ भासनाद्भसितं भस्म क्षारणात्क्षारमापदां॥८०॥ भूतप्रेतपिशाचेभ्यः संग्रहेभ्योऽभिरक्षणात् ॥ रक्षा स्यात्क्रूरसर्पेभ्यो व्याघ्रादिभ्यश्च सर्वदा ॥८१॥ अथ विरजाहोमं वक्ष्ये ॥ अथ स्वगृह्यप्रकारे

---

झाली तिच्या शेणापासून भसित निर्माण झालें; (७५) अघोरनामक मुखांतून अग्नि उत्पन्न झाला त्यापासून विद्यानामक कला तिच्यापासून तांबड्यारंगाची सुरभीनामें गाय उत्पन्न झाली व तिच्या शेणापासून भस्त निर्माण झालें. (७६) तत्पुरुषनामक मुखांतून वायु उत्पन्न झाला त्यापासून शांतिकला उत्पन्न झाली व तिच्यापासून पांढऱ्या रंगाची सुशीला नांवाची गाय झाली; तिच्या शेणापासून क्षारनामक विभूति उत्पन्न झाली; (७७) तसेंच शंकराच्या ईशाननामें मुखांतून आकाश उत्पन्न झालें; त्यापासून शांत्यतीता नांवाची कला उत्पन्न झाली त्यापासून सुमनानामक चित्ररंगाची गाय झाली व तिच्यापासून रक्षा उत्पन्न झाली. (७८) ऐश्वर्य देणारें असल्यामुळें भूति असें नाम प्राप्त झालें. भासन ह्मणजे कांतीमुळें भसित असें ह्मटलें गेलें आहे; व सर्व पाप नाश करितें ह्मणून भस्म असें ह्मणतात. व सर्व आपदांचें निरसन करितें ह्मणून त्यास क्षार असें ह्मटलें आहे व भूत, प्रेत, पिशाच, ब्रह्मराक्षस, अपस्मार, वगैरे भयांपासून रक्षण करितें ह्मणून त्यास रक्षा असें ह्मटलें आहे (७९) याचअर्थी क्रियासारांत असें सांगितलें आहे, कीं विभूति, भसित, भस्म, क्षार, रक्षा अशीं भस्माचीं पांच नामें आहेत. त्या पांचांस अशीं नांवें पडण्यास पांच कारणें आहेत. (८०) ऐश्वर्यदायक असल्यामुळें त्यास भूति;सर्व पापनाशनामुळें भस्म; कांतीमुळें भसित; सर्व संकटें दूर करणारें ह्मणून क्षार (८१) व भूतपिशाचादि बाधेपासून तसेंच क्रूर व हिंस्रपशूंपासून रक्षण होतें ह्मणून रक्षा अशीं भस्मास नांवें मिळालीं आहेत. (८२) यानंतर विरजा होमाचें विधान सांगतों; स्वगृह्यसूत्र प्रका-

णाग्निप्रतिष्ठापनं कृत्वा तन्मध्ये ॥८२॥ अग्नौ ज्वालावृतं रुद्रं वन्हिमंडलमध्यगं ॥ ध्यायेत्कलादशयुतं शक्तिस्वस्तिकधारिणं ॥८३॥ इति रुद्राग्निं संचित्य रुद्राग्नौ विभूतिं संपादयामीति संकल्प्य ॥ दक्षिणाप्रांचमृजुं दीर्घं ॅसततं दक्षिणं परिधिसंधिमन्वपहृत्येंद्राय स्वाहेति प्रांचमुदंचमृजुमाघारावाघार्याज्यभागौ जुहोत्यग्नये स्वाहेत्युत्तरार्धपूर्वार्धे सोमाय स्वाहेति दक्षिणार्धपूर्वार्धे समं पूर्वेण यथोपदेशं प्रधानाहुतिं हुत्वा समिधमिध्मसंनहनं च अग्नौ प्रहृत्य जयाभ्यातानां राष्ट्रभृतं प्राजापत्यां ॥ व्याहृतिभिर्हुतास्विष्टकृतमित्युपजुहोति ॥ यथास्य कर्मण इति ततः ॥ परिषिच्य प्रणीतास्वप्यानीयप्रदिशं व्यात्सित्य शिरसि मार्जयित्वा प्रत्यंजलौ शेषं निनीय रुद्रं विसृजेत् ॥ अथानंतरं॥ अग्निमाधाय विधिवत्स्वगृह्योक्तप्रकारतः ॥ ८४ ॥ नित्यनैमित्तिकेत्वादौ काम्यव्रतविशेषतः ॥ शैवानां वैदिकानां वा सर्वशाखाविदां समं ॥ सर्वेषामाश्रमाणां च विरजाहोम उच्यते ॐ ॥८५॥ आगमेषु पुराणेषु यत्र यत्र च कुत्रचित् ॥ विरजाहोमस्य विधेर्मंत्रोद्धारणकं तु यः ॥८६॥ तद्यथा ॥ ॐ प्राणापानव्यानोदानसमाना मे शुध्यंतां ज्योतिरहम् ॥

---

रानें अग्नि सिद्ध करून (८३) त्यामध्यें अग्निज्वालांनीं वेष्टित व अग्नि मध्यभागीं असलेला व दहा कला, शाक्ति, व स्वस्तिक हस्त यांनीं युक्त अशा रुद्राचें ध्यान करावें. (८४) असें रुद्राग्नीचें ध्यान केल्यावर रुद्राग्नींतून विभूति ( भस्म ) संपादन करितों असा संकल्प करावा. नन्तर "दक्षिणाप्रांच०" ह्या मंत्रानें इंद्रदेवतेला हवन करावें; "प्रांचमुदंच" ह्या मंत्रानें अग्निदेवतेला हवन करावें; "उत्तरार्धपूर्वार्धं" या मंत्रानें सोमदेवतेला हवन करावें; "दक्षिणार्ध" या मंत्रानें मुख्य आहुति देऊन नंतर समिध् व इध्मसंनहन अग्नीमध्यें टाकून " जयाभ्यातानां " इत्यादि मंत्रानें पुनः आहुति द्यावी. स्थंडिलाभोंवतीं परिषेचन करून प्रणीतेमध्यें पाणी घेऊन प्रतिदिशेस टाकावें व आपल्या डोक्यावर मार्जन करावें. नन्तर रुद्राचें विसर्जन करावें. नन्तर स्वगृह्यसूत्रामध्यें सांगितल्याप्रमाणें विधिवत् अग्नीचें आधान करावें. (८५) नित्यनैमित्तिककर्मांमध्यें विशेषतः काम्यकर्मांमध्यें शैवांना किंवा वैदिकांना सर्व शाखा जाणणाऱ्यांना सर्व आश्रमींना विरजा होम सांगितला आहे. (८६) सर्व आगमांमधून, पुराणांमधून विरजाहोमाच्या विधीचे जे मंत्र सांगितले आहेत (८७) ते असे–ॐ प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे वायु माझी शुद्धि करोत; मी तेजस् आहें; "विरजा" इत्यादि मंत्रानें स्वाहाकार करून "अग्नय

विरजा विपाप्मा भूयासं स्वाहा सर्वत्र अग्नय इदं न मम॥ वाङ्मनश्च-क्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणरेतोबुध्याकूतिसंकल्पा मे शुध्यंतां ज्योतिरहं वि-रजा विपाप्मा भूयासं स्वाहा ॥ त्वक्चर्ममांसरुधिरमेदोमज्जास्नाय्व-स्थीनि मे शुध्यंताम्॥ ज्योतिरहम् ॥ शिरःपाणिपादपार्श्वपृष्ठोरूदर जघनशिश्नोपस्थापायवो मे शुध्यंतां ज्योतिरहम् ॥ उत्तिष्ठपुरुषाहरि-तलोहितपिंगलाक्ष देहि देहि तापयिता मे शुध्यंतां ज्योतिः ॥ पृथि-व्यप्तेजोवाय्वाकाशा मे शुध्यंतां ज्योतिः शब्दस्पर्शरूपरसगंधामेशुध्य न्ताम्ज्योतिः ॥ मनोबुद्धिरहंकारश्चित्तं विज्ञानं मे शुध्यंतां ज्योतिः ॥ अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयानंदमयात्मानो मे शुध्यंतां ज्यो-तिः ॥ विविट्यै स्वाहा ॥ इत्येतद्द्वादशमंत्रा विरजाहेतवः ॥ ८७ ॥ हुत्वाज्येन समिद्भिश्च चरुणा च यथाविधि ॥ श्रौतपाशुपतादीनां सांख्यवेदांतवादिनाम् ॥ ८८ ॥ पंचविंशतितत्वौघशुद्धज्ञानामयं मतः ॥ दीक्षितानां च शैवानां षट्त्रिंशत्तत्ववेदिनाम् ॥ अप्ये-वमेव किं त्वत्र मंत्रैः खलु विशिष्यते ॥ ८९ ॥ तद्यथा ॥ त्रैगुण्यप्र

---

इदं न मम" असें सर्वत्र ह्मणावें; वाक्, मन, चक्षु, श्रोत्र, जिव्हा, घ्राण, रेतस् (शुक्र) बुद्धि, आकूति ( इच्छा ) संकल्प हीं माझी शुद्धि करोत; मी तेजस् आहें; "वि-रजा" इत्यादि मंत्रानें स्वाहाकार करून त्वक्, मांस, रुधिर, मेद, मज्जा, स्नायु, अस्थि हीं माझें शोधन करोत मी तैजस् आहे. शिर, पाणि, पाद, पार्श्व, पृष्ठ, उ-दर, जघन, शिश्न, उपस्थ, पायु, हीं माझी शुद्धि करोत; मी तैजस् आहें. हिरव्या, तांबड्या, पिंवळ्या, रंगाच्या पुरुषा ऊठ तापयुक्त माझे अवयव माझी शुद्धि करो-त; मी ज्योति आहें. पृथ्वी, अप्, तेज, वायु, आकाश हीं माझी शुद्धि करोत; मी तेजस् आहें. शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध हीं माझी शुद्धि करोत, मी तैजस् आहें. मन, बुद्धि, अहंकार, चित्त, विज्ञान हीं माझी शुद्धि करोत; मी ज्योति आहें अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय हे पांच कोश माझी शुद्धि करोत; मी तैजस आहें. विविटीच्या नांवें स्वाहाकार करावा; याप्रमाणें हे बारा मंत्र विरजाहोमाचे हेतु आहेत. (८८) तूप, समिधा, व चरु यांनीं यथाप्रकार ह-वन करावें. श्रौत, पाशुपत, सांख्य, वेदांतवादी (८९) अशा पंचवीस तत्वें मान-णाऱ्यांना हा होम संमत आहे. तसाच तो छत्तीस तत्वें जाणणाऱ्या दीक्षितशैवां-नांही मान्य आहे परंतु त्यांचे मंत्र मात्र निराळे आहेत. (९०) ते असे—त्रैगुण्यप्र-

कृतिपुरुषरागविद्याकलानियतिकालमायाशुद्धविद्यामहेश्वरसदाशिव-शक्तिशिवापरशिवेच्छा मे शुध्यंतां ज्योतिः ॥ नमः शिवायै स्वाहा ॥ पश्चादों स्वाहेति वा सर्वमंत्राः प्रणवाद्यस्ततो होमावसानेषु तत्प्रणवादिवौषडंतं मूलेन पूर्णाहुतिर्देया ॥ पूर्णाहुतिमुत्तमां जुहोति सर्वं वै पूर्णाहुतिः ॥ सर्वमेवाप्नोति ॥ अथेयं पूर्णाहुतिः ॥९०॥ अस्यामेव प्रतिष्ठति ॥ विकटांगामुन्मत्तां महाशनां खलामलसामशिवचिन्हांकितां ॥ पुनर्धेनुं कृशांगां वत्सहीनां वंध्यामंगहीनामशांतमदुग्धदोहिनीं निरिंद्रियां जग्धतृणां केशचेलास्थिभक्षिणीं संधिनीं नवप्रसूतां रोगान्वितां विहाय ॥९१॥ अप्रशस्तभूम्यादिपतितक्लिन्नदुर्गंधपर्युषितेत्यादि गोमयं विहाय ॥ प्रशस्तगोमयमादाय आहरेत्॥९२॥अस्मिन्नर्थे स्कांदे॥ सवत्साया ह्यरोगाया निर्दोषायास्तथैव च ॥ अनिर्दशायाः शुद्धाया गोः सुगोमयमाहरेत् ॥९३॥ खसंस्थं गोमयं ग्राह्यं स्थाने वा पतितं शुभे ॥ अध ऊर्ध्वं परित्यज्य पंचगव्येन मर्दयेत् ॥९४॥ क्रियासारे॥ गोमयग्रहणे श्रेष्ठा कपिला धवलाथवा ॥ अलाभे स्यात्तदन्या गौर्योग्याचेद्दोषवर्जिता ॥९५॥ उत्तमं कपिलाभस्म लब्धगोभस्म वा भवेत् ॥

---

कृति पुरुष, राग, विद्या, कला, नियति, काल, माया, शुद्धविद्या, महेश्वर, सदाशिव, शक्ति, शिवापराशिवेच्छा हीं माझी शुद्धि करोत, मी तैजस आहें. नमः शिवायै या मंत्रानें स्वाहाकार करावा. नन्तर ॐ स्वाहा असें किंवा सर्व प्रणवपूर्वक मंत्रांनीं हवन करावें. होमाचे शेवटीं प्रणवपूर्वक मूलमंत्र उच्चारून अंतीं बौषट् उच्चार करून मूल, मंत्रानें आहुति द्यावी. “ पूर्णाहुतिमु. ” इत्यादि मंत्रानें पूर्णाहुति द्यावी. ही पूर्णाहुति सर्व प्राप्त करिते, ही पूर्णाहुति आहे. (९१) कुरूप, उन्मत्त, खादाड, दुष्ट-सुस्त, अशुभ चिन्हांची तसेंच रोड, वांझ, अवत्स, विकल, क्रूर, दूध न देणारी, इंद्रियहीन, गवत भक्षण न केलेली, केश, वस्त्र, अस्थि हीं खाणारी, फळकर, नुकतीच व्यालेली, रोगी अशी गाय टाकून; (९२) दूषित जागेंत पडलेलें, दुर्गंध, शिळें शेण टाकून द्यावें व शुद्धशेण घेऊन यावें. याचअर्थी स्कांदपुराणांत सांगितलें आहे कीं, (९३) सवत्स, निरोगी, निर्दोष तसेंच तरुण व शुद्ध गाईचें चांगलें शेण आणावें. (९४) अधर धरलेलें अगर शुभस्थानीं पडलेलें शेण घेऊन खालचें वरचें टाकून देऊन पंचगव्यानें कालवावें. क्रियासारग्रंथांत सांगितलें आहे कीं, (९५) शेण घ्यावयाचें तर पांढऱ्या गाईचें घेणें उत्तम; तें न मिळेल तर निर्दोष अशा दुसऱ्या गाईचें घ्यावें. (९६) कपिला गाईचे शेणाचें भस्म उत्तम;

अस्य जीवधनक्षारं यत्र क्वापि स्थितं च यत् ॥९६॥ संस्काररहितं यत्तन्नहि धार्यं कदाचन ॥ सद्येन गोमयं ग्राह्यं तद्वामेनाभिमंत्रयेत् ॥९७॥ शुचिभूमावघोरेण दहेत्तच्च शिवाग्निना ॥ ताम्रकुंभे क्षिपेच्छुद्धे भस्म तत्पुरुषेण तु ॥ सिकतांगारपाषाणानीशानेन विशोधयेत् ॥९८॥ अथ कालोत्तरे ॥ ॐकारमूलमासाद्य शिवाग्नेर्भूतिमुत्तमाम् ॥ ॐकारप्रणवः सूक्ष्मो विद्यानां बीजमुत्तमम् ॥९९॥ तस्मादशेषतत्त्वानि प्रणवेन विशोधयेत् ॥ यथा षडक्षरो मंत्रः सर्वसाधारणः स्मृतः ॥ तस्मात्तेनैव संग्राह्य भस्मनिर्वाणमुच्यते ॥१००॥ स्कांदे ॥ अथ संक्षेपतः स्कंद आरण्यं गोमयं पुनः ॥ पंचगव्यसमायुक्तं विधिनैव विनिर्दहेत् ॥१०१॥ संहृत्य हृदि मंत्रेण नवभांडे निधापयेत् ॥ अत्र मंत्रं जपेन्मंत्री सर्वविघ्नविनाशनम् ॥१०२॥ जाबालोपनिषदि ॥ त्रैवर्णिकानामग्निहोत्राग्निजम् ॥ गृहस्थानां विरजानलजं विवाहाग्निजमौपासनाग्निजं वा ब्रह्मचारिणां समिदग्निजं शूद्राणां श्रोत्रियागारपचनाग्निजम् ॥ अन्येषां

---

तें न मिळेल तर मिळेल त्या गाईचे शेणाचें घ्यावें. कोठेंही असलेलें भस्म याला जीवघनवर्धक आहे. (९७) जें संस्काररहित आहे तें कधींही घेऊं नये. "सद्य" या मंत्रानें शेण घ्यावें व तें "वाम" ह्या मंत्रानें अभिमंत्रित करावें. (९८) नन्तर तें अघोरमंत्रानें शुद्ध जागेंत शिवाग्नीनें जाळावें व तत्पुरुष या मंत्रानें तांब्याच्या शुद्ध घड्यांत टाकावें. तें भस्म ईशानमंत्रानें शोधून त्यांतील वाळू, कोळसे, दगड काढून टाकावेत. कालोत्तरांत असें ह्मटलें आहे कीं, (९९) ॐकारपूर्वक शिवाग्नींतून घेतलेलें भस्म उत्तम होय. सूक्ष्म ॐकारप्रणवविद्यांचें उत्तम बीज होय. (१००) ह्मणून सर्व तत्वें प्रणवमंत्रानें शुद्ध करावींत. ज्याअर्थीं षडक्षरीमंत्र सर्वसाधारण मानला आहे त्याअर्थीं त्यानेंच घेतलेलें भस्म उत्तम समजतात. स्कांदपुराणांत सांगितलें आहे कीं, (१०१) हे स्कंदा, अरण्यांतील गोमय ( शेण ) घेऊन त्यांत पंचगव्य मिसळून संस्कारपूर्वक जाळावें. (१०२) व तें गोळा करून मनांत मंत्रोच्चार करीत तें नवीन भांड्यांत घालावें नन्तर मंत्र्यानें सर्व विघ्नांचा नाश करणारा मन्त्रजप करावा. जाबालोपनिषदामध्यें सांगितलें आहे कीं, (१०३) त्रैवर्णिकांनीं ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांनीं ) अग्निहोत्रांतील भस्म घ्यावें; गृहस्थांनीं विरजाहोमाचें भस्म, विवाहाग्नींतील अथवा औपासनाग्नींतील घ्यावें; ब्रह्मचाऱ्यांनीं समिदाग्नींतील घ्यावें व शूद्रांनीं अग्निहोत्र्याच्या घरांतील स्वयंपाकाच्या चुलींतील भस्म घ्यावें. बाकीच्या सर्वांनीं वणव्यांतील भस्म घ्यावें. यतींनीं सर्वत्र भस्म स्वी-

दावानलसमुद्भवम् ॥ यतीनां सर्वत्र स्थितम् ॥ अतिवर्णाश्रमिणां श्मशानगतं सर्वेषां देवालये स्थितमिति ॥१०३॥ श्रीमहालैंगे ॥ शिवाग्निहोत्रिजा भूतिः शिवालयमतल्लिका ॥ मंत्रसंस्कारदग्धा वा दत्ता वा शिवयोगिभिः ॥१०४॥ क्रियासारे ॥ शूद्रहस्तास्थितं भस्म द्विजातिर्नैव धारयेत् ॥ तथैवांत्यजहस्तस्थं शूद्रैर्धार्यं न जातुचित् ॥१०५॥ चंदनं कुंकुमं चैव मृगनाभिमुखान् परान् ॥ गंधान् स्वल्पफलान् हित्वा भस्मस्नानपरो भवेत् ॥१०६॥ स्कंदागस्त्यसंवादे ॥ रक्षार्थं मंगलार्थं च पवित्रार्थं च सत्तम ॥ लिंगार्थं चापि भक्तानामुत्तमं भस्म दत्तवान् ॥१०७॥ तस्माद्भस्मसमं श्रेयो न भूतं न भविष्यति ॥ धनवद्भस्म संगृह्य भस्मस्नानं समाचरेत् ॥१०८॥

## ॥ अथ विभूतिस्नानविधिः ॥

प्रक्षाल्य पादौ हस्तौ चाचम्य त्रिः प्राणायामं कृत्वा ॥ आग्नेयविधिस्नानमहं करिष्ये ॥ इति संकल्प्य विभूतिं गृहीत्वा अग्निरिति भस्म वायुरिति भस्म जलमिति भस्म ॥ व्योमेति भस्म॥सर्वं हवा इदं भस्ममन एतानि चक्षूंषि भस्म ॥ अग्निरष्मिजन्मना जातवेदामृतं मे चक्षुरमृतं ममासन् ॥ अर्कस्थिताभूतरजसो विविमानोजस्रोघ्रमोंहविरस्म-

---

कार करावा. अतिवर्णाश्रमींनीं श्मशानांतील भस्म घ्यावें. देवालयांतील भस्म सर्वांनींच घ्यावें; श्रीमहालिंगपुराणांत सांगितलें आहे कीं, (१०४) शिवाग्निहोत्र्याकडील भस्म घ्यावें किंवा शिवालयांतील शुद्धभस्म घ्यावें अथवा मन्त्र व संस्कार यांनीं भाजून तयार झालेलें भस्म अथवा शिवयोग्यांनीं दिलेलें भस्म घ्यावें. क्रियासारांत सांगितलें आहे कीं, (१०५) शूद्राचे हातीं असलेलें भस्म द्विजातींनीं कधींही धारण करूं नये. त्याचप्रमाणें अंत्यजाचे हातीं असलेलें भस्म शूद्रांनीं कधींहि घेऊं नये. (१०६) चंदन, कुंकु, कस्तुरी यासारखीं सुवासिकद्रव्यें अल्प फलदायक असल्यामुळें तीं टाकून मनुष्यानें भस्मलेप करीत जावें. स्कंद व अगस्त्य यांचे संवादांत सांगितलें आहे कीं, (१०७) रक्षण व्हावें, मंगल व्हावें, शुद्धि व्हावी तसेच लिंगाकरितां, हे नरश्रेष्ठा, भक्तांना उत्तम भस्म दिलें आहे. (१०८) ह्याकरितां भस्मासारखें कल्याणकारक पूर्वीं झालें नाहीं व पुढें होणार नाहीं. धनाप्रमाणें भस्माचा संग्रह करावा व भस्मस्नान करीत जावें. (१०९) यानंतर —

भस्मस्नानाचा प्रकार सांगतों. हातपाय धुवून, आचमन करावें व प्राणायामत्रय करून भस्मस्नान विधीनें मी स्नान करितों असा संकल्प करून भस्म घ्यावें व "अग्नि-

नाम इत्यनेन मंत्रेण समृज्यांगानि संस्पृशेत् ॥१०९॥ पुनराचम्य पुनर्विभूतिं गृहीत्वा वामहस्ततले निधायाग्निष्टोमात्मकं कृत्वा मूलमंत्रेणैकादशवारमभिमंत्र्य शिरसि ॥ ॐ यं ईशानाय नमः ॥ ललाटे ॥ ॐ वां तत्पुरुषाय नमः ॥ हृदि ॥ ॐ शिं अघोराय नमः ॥ नाभ्यां ॥ ॐ मं वामदेवाय नमः ॥ पादयोः ॥ ॐ नं सद्योजाताय नमः ॥ सविभूतिन्यासं कृत्वा पश्चात् ॥ त्रियायुषं जमदग्नेः कश्यपस्य त्रियायुषम् ॥ अगस्त्यस्य त्रियायुषम् ॥ यद्देवानां त्रियायुषम् ॥ तन्मे अस्तु त्रियायुषम् ॥ ईशानादिपंचमंत्रैरपि ॥ त्रियंबकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनं॥ उर्वारुकमिव बंधनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ॥ अनेन मंत्रेणापि मस्तकललाटादिसर्वसंधिषु त्रिपुंड्रधारणं कृत्वा पुनरपि हस्तौ प्रक्षाल्याचमेत् ॥११०॥ अथ कालोत्तरे॥भस्ममुष्टिं समादाय संहितामंत्रमंत्रितम्॥ मस्तकात्पादपर्यंतं भस्मस्नानं समाचरेत् ॥१११॥ हृन्मंत्रेण तु कर्तव्यं विधिस्नानं समाचरेत् ॥ ईशाने पंचधा भस्म विकिरेन्मूर्ध्नि यत्नतः॥ ॥११२॥ मुखे चतुस्तत्पुरुषेणाघोरेणैवाष्टधा हृदि ॥ वामेन गुह्यदेशे तु त्रिदशस्थानभेदतः ॥११३॥ अष्टावंतेन सद्येन पादावुध्दूल्य यत्नतः॥

---

रिति" पासून "हविरस्मनाम" पर्यंत मंत्रांनें भस्मावर मार्जन करून तें सर्व अंगांना चोपडावें. (११०) पुनः आचमन करून व पुनः विभूति ग्रहण करून डाव्या हाताच्या तळहातावर तें ठेवून नन्तर त्यास अग्निष्टोमस्वरूप करून मूलमंत्रानें अकरा वेळां अभिमंत्रण करून डोक्यास लावावें; "ॐ यं ईशानाय नमः" या मंत्रानें ललाटास लावावें. "ॐ वां तत्पुरुषाय नमः" या मन्त्रानें हृदयाला लावावें; "ॐ शिंअघोराय नमः" या मन्त्रानें नाभीस लावावें; "ॐ मं वामदेवाय नमः" या मन्त्रानें पायांस लावावें; "ॐ नं सद्योजाताय नमः" या मन्त्रानें विभूतिसहित न्यास करून नन्तर "त्रियायुष" इत्यादि पंचमंत्रांनीं; तसेंच " ईशानादि " पांच मंत्रांनीं; त्याचप्रमाणें "त्रियंबकं" या मन्त्रानें मस्तक, ललाट इत्यादि सर्व सन्धींवर त्रिपुंड्र धारण करून पुनः हात धुवून आचमन करावें; कालोत्तरपुराणांत सांगितलें आहे कीं, (१११) मूठभर भस्म घेऊन तें वेदमंत्रांनीं मन्त्रित करावें व डोक्यापासून पायापर्यंत लावावें यास स्नान ह्मटलें आहे. (११२) हृन्मन्त्रानें करावयाचें विधिस्नान करावें व ईशानमन्त्रानें पांच वेळां प्रयत्नपूर्वक डोक्यावर भस्म फेंकावें. (११३) तत्पुरुषमंत्रानें चार वेळ तोंडावर व अघोरमंत्रानें आठवेळां हृदयावर टाकावें; वाममंत्रानें गुह्यप्रदेशीं त्रिदशस्थानभेदानें टाकावें. (११४) शेव-

सर्वांगोध्धूलनं कार्यं सद्योजातेन तत्वतः ॥ ११४ ॥ द्विजस्यो ध्दूलनं कार्यं राजन्यस्य यथाविधि ॥ मुखं विना च तत्सर्व- मुध्दूल्यं क्रमयोगतः ॥११५॥ ललाटमात्रमुध्दूल्यं वैश्यैः शूद्रैस्त्रिपुंड्रकं॥ अथवा तिलकं कार्यं स्नानं चैव तथोत्तमम् ॥११६॥ प्रक्षाल्य पादौ हस्तौ च समाचम्य च पूर्ववत् ॥ अदीक्षितश्चतुर्वेदी शिवसंस्कारकर्मणि ॥ ॥११७॥ भूतिस्नानविधिं कृत्वा शिवाग्नेयं प्रवेशयेत् ॥ संध्यात्रये नि- शीथे च तथा पूर्वावसानयोः ॥११८॥ सुप्त्वा भुक्त्वा पयः पीत्वा कृत्वा चावश्यकादिकम् ॥ स्त्रियं नपुंसकं गृध्रं विडालं वकमूषकम् ॥ ॥११९॥ स्पृष्ट्वा तथाविधानः स्याद्भस्मस्नानं समाचरेत् ॥ देवाग्निगु- रुविप्राणां समीपे त्याज्यदर्शने ॥१२०॥ अशुद्धभूतले मार्गे कुर्यान्नोध्दू- लनं व्रती ॥ ब्रह्मा च देवा ऋषयो गंधर्वा यक्षकिन्नराः॥१२१॥ मरुद्गणाः पितृगणाः सर्वे भूतगणा अपि ॥ नित्यं सर्वेण यत्नेन भस्मस्नानं प्रकु- र्वते ॥१२२॥ भस्मस्नानं जलस्नानादसंख्येयगुणाधिकम् ॥ तस्माद्वारु- णमुत्सृज्य स्नानमाग्नेयमाचरेत् ॥ १२३॥ दिव्यवारुणवायव्यब्राह्माग्ने-

---

टच्या सद्योजातमंत्रानें आठवेळां प्रयत्नपूर्वक पायावर टाकावें तसेंच सद्योजातमं- त्रानें खरोखर सर्व अंगांवर भस्म उधळावें; (११५) द्विजानें यथाशास्त्र भस्मोध्दू- लन करावें; क्षत्रियांनीं तोंडावांचून बाकी सर्व अवयवांवर क्रमशः उध्दूलन करावें (११६) वैश्यानें केवळ कपाळावर उध्दूलन करावें व शूद्रानें त्रिपुंड्र लावावेत किंवा तिलक लावावा किंवा स्नान करणेंही उत्तम; (११७) पूर्वीप्रमाणें हातपाय धुवून व आचमन करून चारी वेदांचें ज्ञान असूनही ज्यास शिवसंस्कार कर्मांम- ध्यें दीक्षा मिळाली नाहीं अशा (११८) अदीक्षितानें शिवाग्निसंबंधी भस्मस्नान- विधि करून सूर्योदयीं मध्यान्हीं व सायंकाळीं त्याचप्रमाणें मध्यरात्रीं भस्मस्नान- विधि करून शिवमंदिरांत प्रवेश करावा. (११९) निद्रा, भोजन, पान इत्यादि अवश्य क्रिया केल्यानंतर तसेंच, स्त्री, नपुंसक, गृध्र, मांजर, वगळा, उंदीर यांस (१२०) स्पर्श केल्यास अगर त्याज्य वस्तुदर्शन झाल्यास पूर्वीप्रमाणें हातपाय धु- वून देव, अग्नि, विप्र यांपुढें भस्मस्नान करावें. (१२१) अशुद्ध प्रदेशीं अथवा मार्गांत, व्रतीनें उध्दूलन करूं नये. ब्रह्मा, देव, ऋषि, गंधर्व, यक्ष, किन्नर(१२२) मरुद्गण, पितृगण, व सर्व भूतगण सुद्धां प्रयत्नपूर्वक नेहमीं भस्मस्नान करितात. (१२३) जलस्नानापेक्षां भस्मस्नान अनेक पटीनें श्रेष्ठ आहे म्हणून जलस्नान न करितां भस्मस्नान करावें; (१२४) दिव्य, वारुण, वायव्य, ब्राह्म, आग्नेय ह्या सर्व

येष्वनुत्तमम् ॥ इति मत्वा शिवो भस्मस्नानमादौ ह्यपूरयत् ॥१२४॥ वारुणं वारिणा स्नानमाग्नेयं भस्मना भवेत् ॥ वृष्ट्या सातपया दिव्यं वायव्यं रजसा गवाम् ॥ मानसं ब्रह्मतादात्म्यं स्नानान्येतानि वै विदुः ॥१२५॥ क्रियासारे ॥ भस्मस्नानं यतेरेव नियमेन सदोदितम् ॥ त्रिपुंड्रधारणं स्नानं वारुणं गृहमेधिनाम् ॥१२६॥ भस्मस्नानविशुद्धात्मा जितक्रोधो जितेंद्रियः ॥ मत्समीपमुपागम्य न भूयो विनिवर्तते॥१२७॥ अहं पशुपतिर्नाम मद्भक्ता ये च मानवाः ॥ सर्वे पाशुपता ज्ञेया भस्मदिग्धतनूरुहाः ॥१२८॥ भीमागमे ॥ सर्वतीर्थेषु यत्पुण्यं सर्वयज्ञेषु यत्फलम् ॥ तत्फलं कोटिगुणितं भस्मस्नानान्न संशयः ॥१२९॥ गारुडपुराणे ॥ पंचाक्षरजपं भस्मस्नानं लिंगार्चनत्रयम् ॥ कदाचिदपि न त्याज्यं यथाशक्त्या यथाविधि ॥१३०॥ भस्मना दिग्धसर्वांगो भस्मदीप्तत्रिपुंड्रकः ॥ भस्मशायी च पुरुषो भस्मनिष्ठ इति स्मृतः ॥१३१॥ भूतप्रेतपिशाचाश्च रोगाश्चातीव दुःसहाः॥ भस्मनिष्ठस्य सान्निध्याद्वि-

---

प्रकारच्या स्नानांत भस्मस्नान उत्तम असल्यामुळें श्रीशंकरानें प्रथम भस्मस्नान केलें (१२५) पाण्यानें स्नान करणें यास वारुणस्नान असें ह्मणतात. भस्मानें केलेल्या स्नानास आग्नेयस्नान असें ह्मणतात; उन्हांत पर्जन्यवृष्टीनें केलेल्या स्नानास दिव्यस्नान ह्मणतात; गाईच्या खुरांनीं उडालेल्या धूळीनें केलेल्या स्नानास वायव्यस्नान असें ह्मणतात. ब्रह्माशीं तादात्म्य पावणें यास मानसस्नान असें ह्मणतात. याप्रमाणें हीं पंचस्नानें मानलीं आहेत. क्रियासारग्रंथांत असें ह्मटलें आहे कीं, (१२६) यतीनें सदोदित भस्मस्नान नियमानें करावें व गृहस्थानें त्रिपुंड्रधारण करावें व उदकस्नान करावें. (१२७) भस्मस्नानानें जो विशुद्धात्मा झाला आहे; ज्यानें क्रोध जिंकला आहे व ज्यानें इंद्रियें जिंकिलीं आहेत असा पुरुष माझेजवळ असतां पुनः त्यास पुनर्जन्म नाहीं. (१२८) मी पशुपति आहें व जे मानव माझे भक्त असून भस्मचर्चित असतील ते सर्व पाशुपत असें जाणावें. भीमागमामध्यें सांगितलें आहे कीं, (१२९) सर्व तीर्थें व सर्व यज्ञ केले असतां जें पुण्य व फल प्राप्त होतें त्याहून भस्मस्नानाचें फल निःसंशय कोटिपट अधिक आहे. गरुड पुराणांत ह्मटलें आहे कीं, (१३०) पंचाक्षरी मंत्राचा जप भस्मस्नान व लिंगार्चन हीं तीन मनुष्यानें न टाकतां त्यांचें यथाशक्ति आचरण करीत असावें. (१३१) ज्यानें अंगास भस्म चर्चिलें आहे ज्याचे अंगावर भस्म त्रिपुंड्र चकाकत आहेत व जो भस्मांत निजतो त्या पुरुषास भस्मनिष्ठ असें ह्मणतात. (१३२) भूतें, प्रेतें, पिशाचें तसेंच

द्रवंति न संशयः ॥१३२॥ शातातपस्मृतौ ॥ सुरां पीत्वा गुरुदारांश्च गत्वा स्तेयं कृत्वा ब्रह्महत्यां च कृत्वा॥भस्मच्छन्नो भस्मशय्याशयानो रुद्राध्यायी मुच्यते सर्वपापैः॥१३३॥ यदा कदा यत्र च कुत्र संभवं भस्माहृतं स्यादिह येन केन वा ॥ न तेन तुल्यो भगवानजोऽपि श्रीभूतिधारी स शिवस्तथापि ॥१३४॥

अथ त्रिपुंड्रविधिः॥ अथ कालाग्निरुद्रं भगवंतं सनत्कुमारः पप्रच्छ॥ अभिधेहि भगवन् ॥ त्रिपुंड्रविधिं ॥ तत्वम् ॥ किं द्रव्यम् ॥ कियत्स्थानम् ॥ किं प्रमाणम् ॥ कति रेखाः ॥ किं दैवतम् ॥ का शक्तिः ॥ कः कर्ता ॥ किं फलमिति च ॥ तं होवाच भगवान् कालाग्निरुद्रः ॥ यद्द्रव्यं तदाग्नेयं भस्म ॥ सद्योजातादिपंचब्रह्ममंत्रैः परिगृह्याग्निरिति भस्मेत्यनेनाभिमंत्र्य ॥ मानस्तोकेति समुध्दृत्य ॥ जलेन संमृज्य ॥ त्रियायुषं जमदग्नेरिति शिरोललाटवक्षःस्कंधेषु त्रियायुषैस्त्रियंबकैस्त्रिशक्तिभिस्तिर्यक् तिस्रो रेखाः प्रकुर्वीत ॥ व्रतमेतच्छांभवम् ॥ सर्वेषु वेदेषु वेदवादिभिरुक्तं भवति ॥ तस्मात्तत्समाचरेन्मुमुक्षुरपुनर्भवायाथ

---

अतिशय दुःसह रोग भस्मनिष्ठाला पाहिल्याबरोबर निःसंशय पळून जातात. शातातपस्मृतींत सांगितलें आहे कीं, (१३३) मद्य प्राशन केलें असतां, गुरुपत्नीशीं संभोग केला असतां; चोरी केली असतां ब्रह्महत्या केली असतां जर मनुष्य अंगास भस्मलेप करील, भस्मांत शयन करील; किंवा रुद्राध्याय ह्मणेल तर तो वरील चार पातकांपासून मुक्त होईल. (१३४) कोणत्याहि काळीं कोठेंहि, कोणीहि, भस्मधारण केलें असतां षड्गुणैश्वर्यसंपन्न ब्रह्मदेवही त्याशीं बरोबरी करूं शकत नाहीं. तो विभूति धारण करणारा साक्षात् शिवच होय. (१३५) यानंतर –

त्रिपुंड्रविधि सांगतों–नंतर कालाग्निरुद्र भगवानाला सनत्कुमारांनीं विचारिलें कीं, हे षड्गुणैश्वर्यसंपन्न देवा त्रिपुंड्रविधि, त्याचें आद्यकारण,द्रव्य लावण्याचें कोणतें स्थान, त्याचें प्रमाण, किती रेषा, त्याचें दैवत, कोणती शक्ति, कोण कर्ता, व त्याचें फळ काय तें सांग. त्यास कालाग्निरुद्र उत्तर देतात कीं, भस्म हें द्रव्य, तें "भस्मसद्योजातादि" पंचमंत्रांनीं घेऊन "अग्निरिति" या मंत्रानें अभिमंत्रण करून "मानस्तोक इत्यादि मंत्रानें उचलून घेऊन, पाण्यानें कालवून "त्रियायुषंजमदग्नेः" इत्यादि मंत्रानें मस्तक, कपाळ, ऊर, खांदे, यावर त्रियायुष त्रियंबक, त्रिशक्ति यांपैकीं कोणत्याहि मंत्रानें आडव्या तीन रेघा काढाव्या; हें शैवव्रत आहे तें सर्व वेदांमध्यें वेदवेत्त्या पुरुषांनीं सांगितलें आहे. ह्मणून मोक्षाची इच्छा करणाऱ्यानें हे

सनत्कुमारःप्रमाणमस्य त्रिपुंड्रधारणस्य त्रिधा च रेखा आलला- टादाचक्षुषश्चाभ्रुवोरामूर्ध्नोर्मध्यतश्च याऽस्य प्रथमा रेखा ॥ सा गार्ह- पत्यग्निश्चाकारो भूलोकश्चात्मा क्रियाशक्तिः ॥ ऋग्वेदः प्रातःस- वनं माहेश्वरो देवतेति यास्य द्वितीया रेखा ॥ सा दक्षिणाग्निरुकारः ॥ सत्वमंतरिक्षमंतरात्मेच्छाशक्तिर्यजुर्वेदो माध्यंदिनं सवनं सदाशि- वो देवतेति॥ यास्य तृतीया रेखा सा हवनीया मकारस्तमोद्यौर्लोकः॥ परमात्मा ज्ञानशक्तिः सामवेदस्तृतीयं सवनम् ॥ शिवो देवतेति ॥ त्रि- पुंड्रं भस्मना करोति ॥३५॥ यो विद्वान् ब्रह्मचारी गृही वानप्रस्थो य- तिर्वा समस्तमहापातकोपपातकेभ्यः पूतो भवति ॥१३६॥ तेनेतिहास- पुराणानां रुद्राणां शतसहस्राणि जप्तानि भवंति ॥ प्रणवानामयुतं ज- प्तं भवति ॥ रूपे रूपे दशपूर्वान् पुनाति ॥ दशोत्तराणां च पंडितं पु- नाति ॥ स समस्तमहातीर्थेषु स्नातो भवति ॥ स सर्वान् देवान् ध्यातो भवति ॥ स सर्वकर्मसु योग्यो भवति ॥ देहं त्यक्त्वा शिवसा- युज्यमेति ॥ न स पुनरावर्तते न स पुनरावर्तत इत्याह भगवान् का-

---

सनत्कुमारा मोक्षाकरितां हें व्रत आचरण करावें. या त्रिपुंड्रधारणाचें प्रमाण असें कीं ललाटापासून डोळ्यापर्यंत तीन रेघा काढाव्या. भ्रू व मस्तक यांमधील जी मध्य प- हिली रेखा तिचा अग्नि गार्हपत्य; मूलाक्षर अकार; गुण रजस; भू हा लोक; आत्मा ही क्रियाशक्ति; वेद ऋग्वेद; प्रातः सवन; व महेश्वर ही देवता आहे. जी दु- सरी रेखा तिचा अग्नि दाक्षिणाग्नि, मूलाक्षर उकार; गुणसत्व; लोक अंतरिक्ष; अंत- रात्मा इच्छाशक्ति; वेद यजुर्वेद, माध्यंदिन हें सवन; देवता सदाशिव; याची जी तिसरी रेखा तिचा आहवनीय अग्नि, मूलाक्षर मकार, गुण तमस्, लोक द्यौ परमात्मा ज्ञानशक्ति; वेद सामवेद, तृतीय सायंसवन व देवता शिव. (१३६) भस्माचें त्रिपुंड्र करणारे सर्व महापातकांपासून किंवा उपपातकांपासून विद्वान, ब्र- ह्मचारी, गृहस्थाश्रमी, वानप्रस्थ किंवा यति हे मुक्त होतात. (१३७) त्रिपुंड्रधा- रण केल्यानें इतिहास, पुराणें, किंवा रुद्र यांचीं सहस्रावर्तनें केल्याप्रमाणें होतें, प्र- णवाचा अयुत जप केल्याप्रमाणें आहे. यानें पूर्वींच्या दहा व पुढील दहा पि- ढ्यांचा उद्धार होतो. जो त्रिपुंड्र धारण करितो त्यास सर्व तीर्थस्नानाचें फळ मि- ळतें. त्यास सर्व देवताध्यानाचें फळ मिळतें, तो सर्व कर्माला योग्य होतो. हा देह सांडिल्यानंतर तो शिवसायुज्याला जातो. त्यास पुनर्जन्म नाहीं असें भगवान् का-

लाग्निरुद्रः ॥१३७॥ स्कांदे ॥ नृपाणामीश्वराणां च भस्ममिश्रेण चंद-
नम् ॥ त्रिपुंड्रं विधिवत्कुर्यात् सुगंधेनापि वा गुह ॥१३८॥शिवाग्निवीर्यं भ-
सितं शाक्तामृतसमाप्लुतम् ॥ अग्निष्टोमात्मकं योगं त्रिपुंड्रादिकतोऽ-
धिकः ॥१३९॥ शिवाग्निना तनुं दग्ध्वा शाक्तसोमामृतेन यः ॥ प्लावये-
द्व्योममार्गेण सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १४० ॥ भस्मना वै त्रिसंध्यां च
गृहस्थो जलसंयुतः ॥ सर्वकाले भवेत्स्त्रीणां यतीनां जलवर्जितम् ॥१४१
वानप्रस्थेषु कन्यानां दीक्षाहीननृणां तथा ॥ मध्यान्हात्प्राग्जलैर्युक्तं प-
रतो जलवर्जितम् ॥१४२॥ शुद्धशीतजलेनैव भस्मना च त्रिपुंड्रकम् ॥
यो धारयेत्परं ब्रह्म स प्राप्नोति न संशयः ॥१४३॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन
सांबु सद्भस्मना पुनः ॥ स्वांगे त्रिपुंड्रं संधार्य सर्वदा शिवमर्चयेत् ॥
॥१४४॥ मध्यमानामिकांगुष्ठैरनुलोमविलोमतः ॥ धारयेद्यस्त्रिपुंड्रांकं स
रुद्रो नात्र संशयः ॥१४५॥ क्रियासारे ॥ मध्यांगुलित्रयेणैव स्वदक्षिण-
करस्य तु ॥ षडंगुलायतं मानमपिवालीकमानकम् ॥१४६॥ षडंगुल-
प्रमाणेन ब्राह्मणानां त्रिपुंड्रकम् ॥ नृपाणां चतुरंगुल्यं वैश्यानां तु द्विरं-

---

लाग्निरुद्र ह्मणाला. स्कंदपुराणांत सांगितलें आहे कीं, (१३८) श्रेष्ठ राजांनीं " सु-
गंधेन " या मंत्रानें हे गुहा भस्ममिश्रित चंदनाचे त्रिपुंड्र सशास्त्र लावावेत.
(१३९) भस्म हें शिवाग्नीचें वीर्य असून शाक्तामृतानें थवथबलेलें आहे; तें अग्नि-
ष्टोमरुपी योग आहे, तें त्रिपुंड्रापेक्षांही अधिक आहे. (१४०) शिवाग्नीनें देह जा-
ळन शाक्तसोमामृतानें जो स्नान करितो तो आकाशमार्गानें तरून जातो; तो मो-
क्षास योग्य होतो. (१४१) गृहस्थानें तिन्हीकाळीं जलमिश्रित भस्म अंगास ला-
वावें व स्त्रिया आणि यति यांनीं सर्वकाल कोरडेंच भस्म लावावें. (१४२) वान-
प्रस्थांनीं, मुलींनीं, दीक्षारहित मनुष्यांनीं मध्यान्हाचे पूर्वी जलमिश्रित; उपरांत को-
रडें भस्म लावावें. (१४३) शुद्ध व थंडपाण्यानें व भस्मानें जो त्रिपुंड्र लावतो
त्यास निःशंकपणें परब्रह्मप्राप्ति होते. (१४४) याकरितां प्रयत्नपूर्वक जलमिश्रित
भस्माचे अंगावर त्रिपुंड्र धारण करून सदैव शिवार्चन करावें; (१४५) मध्यमा,
अनामिका, व अंगुष्ठ यांनीं जो उलटसुलट भस्माचे त्रिपुंड्र धारण करितो तो नि-
र्विवाद रुद्र होय. क्रियासारांत सांगितलें आहे कीं, (१४६) आपल्या उजव्या हा-
ताच्या मधल्या तीन बोटांनीं सहा अंगुळें रुंद किंवा कपाळाच्या मानानें त्रिपुंड्र
करावेत. (१४७) ब्राह्मणानें सहा अंगुल प्रमाण, राजांनीं चार अंगुल प्रमाण, व वै-
श्यांनीं दोन अंगुल प्रमाण व शूद्रांनीं आणि बाकीच्या सर्वांनीं एक अंगुल प्रमाण

गुलम् ॥ शूद्राणामथ सर्वेषामेकांगुल्यं त्रिपुंड्रकम्॥१४७॥ भीमसंहितायाम्॥ मूर्धाललाटकंठौ च श्रोत्रे बाहू तथैव च ॥ हृदयं नाभिपृष्ठौ च ह्यष्टौ वै संधयः क्रमात् ॥१४८॥ मूर्ध्नि स्याद्ब्रह्मणः प्रीतिर्ललाटे च सरस्वती॥ कंठे लक्ष्म्या भवेत्प्रीतिः कर्णे प्रीणाति पार्वती॥१४९॥इंद्रप्रीतिकरौ बाहू हृदयं चेश्वरप्रियम् ॥ अनेन विधिना चैव विभूतिं धारयेत्सुधीः॥१५०॥ क्रियासारे ॥ एकादश त्रिपुंड्रस्य स्थानान्याहुः शरीरके ॥ तान्यहं त्रिदशश्रेष्ठ कथयामि शृणु क्रमात् ॥ १५१ ॥ शिरोललाटश्रवणद्वयं ग्रीवा भुजद्वयं ॥ वक्षो नाभिः पृष्ठभागः ककुदेकादशानि तु ॥१५२॥ स्थानानि च त्रिपुंड्रस्य विज्ञेयानि मनीषिभिः॥ त्रिपुंड्रमुक्तस्थानेषु दद्यात्सजलभस्मना ॥१५३॥ मूर्ध्नि श्रवणयोः स्थाने जलं संस्पर्शमात्रतः ॥ एवं त्रिपुंड्रं संधार्य तेषु रुद्रान्स्मरेद्विभून् ॥१५४॥ शिवो महेश्वरो रुद्रः श्रीकंठः शंभुरीश्वरः ॥ महादेवः पशुपतिः शंकरश्च वृषध्वजः ॥१५५॥ परमात्मेत्यमी रुद्रा भालादिषु यथाक्रमम्॥ शुद्धस्फटिकसंकाशा एकवक्त्रास्त्रिलोचनाः ॥१५६॥ सचंद्रार्धजटाजूटा नागाभरणभूषिताः॥ शितक्षौमांबरधराः कंठेकालाश्चतुर्भुजाः ॥ दिव्यगंधानुलिप्तांगा दिव्यपु-

---

त्रिपुंड्र करावेत. भीमसंहितेंत सांगितलें आहे कीं, (१४८) डोकें, कपाळ, कंठ, कान, बाहु, हृदय, नाभि, पाठ, हे क्रमशः आठ संधि होत. (१४९) डोक्यावर ब्रह्मदेवाची प्रीति आहे; कपाळावर सरस्वतीचें प्रेम आहे. कंठाची लक्ष्मीला आवड आहे, व पार्वतीला कानांत संतोष वाटतो. (१५०) इंद्राला तोषविणारे हात होत व हृदय शंकराला प्रिय आहे. या प्रकारानें बुद्धिमानानें विभूति धारण करावें. क्रियासारामध्यें सांगितलें आहे (१५१) हे देवाधिदेवा शरीरांत अकरा स्थानें सांगितलीं आहेत तीं तुला मी सांगतों क्रमशः श्रवण कर. (१५२)शिर, ललाट, कर्ण, कंठ, भुज, ऊर, नाभि, पृष्ठभाग व मान हीं अकरा (१५३) त्रिपुंड्राचीं स्थानें असें शहाण्यांनीं जाणावें. वर सांगितलेल्या स्थानीं जलमिश्रित भस्मानें त्रिपुंड्र करावेत; (१५४) डोक्यावर व कानांवर किंचित् जलानें स्पर्श करावा. अशा प्रकारें त्रिपुंड्र धारण केल्यावर त्यांचे ठिकाणीं वैभवशालि रुद्रांचें स्मरण करावें; (१५५) शिव, महेश्वर, रुद्र, श्रीकंठ, शंभु, ईश्वर, महादेव, पशुपति, शंकर, वृषभध्वज (१५६) परमात्मा ह्या रुद्रांचें भालादिस्थानीं क्रमवार स्मरण करावें. शुद्ध स्फटिकाप्रमाणें शोभणारे, एकवक्र, त्रिनयन (१५७) चंद्रासहित जटाभार धारण करणारे, सर्पांचीं भूषणें घातलेलें, शुभ्र रेशमी वस्त्र धारण केलेले, नीलकंठ व चतुर्भुज असलेले, ते-

ष्पैरलंकृताः ॥१५७॥ सर्वलक्षणसंपन्नाः सर्वावयवसुंदराः ॥ सितपद्मासनासीनाः पूर्णचंद्रनिभाननाः ॥१५८॥ मृगटंकधराः शांता वरदाभयपाणयः ॥ एते ध्येयास्त्रिपुंड्रेषु परमात्मासमूर्त्तयः ॥१५९॥ ऋजुश्वेतमनव्याप्तं स्निग्धं गाढं प्रमाणवत् ॥ एवं हि लक्षणोपेतं त्रिपुंड्रं सर्वसिद्धिदम् ॥१६०॥ मलिनं परुषं वक्रं छिन्नं च विरलं युतम् ॥ एवं षड्दोषसंयुक्तं त्रिपुंड्रमशुभावहम् ॥१६१॥ एषां वपुर्मनुष्याणां त्रिपुंड्रेण विना स्थितम् ॥ श्मशानसदृशं यत्तन्न प्रेक्ष्यं पुण्यकृज्जनैः ॥१६२॥भीमसंहितायाम् ॥ त्रिपुंड्रं बिंदुदीपं च त्रिशूलं चार्धचंद्रकम् ॥ सर्वांगोध्धूलनं चैव षडेते शैवलांछनाः ॥१६३॥ यथेच्छं कारयेद्धीमान् त्रियायुषमिति श्रुतेः ॥ यावंतः पतिता भूमौ भस्मनः परमाणवः ॥ तावद्वर्षसहस्राणि नरो भवति किल्बिषी ॥१६४॥ दधिक्षीरं घृतं चैव तैलं मधु गुडं तथा ॥ नारिकेलस्य सलिलमुपदंशोपदंशकम् ॥१६५॥ कीटेन चान्यदुष्टं वा अभोज्यं गर्हितं च यत् ॥ तत्तावन्मात्रमुध्दृत्य भस्मक्षेपेण शुध्यति ॥१६६॥ स्मृतयः सर्ववेदाश्च पुराणान्यखिलानि च ॥ व-

---

जस्वी गंधानें अंगें चर्चित केलीं आहेत ज्यांनीं, उत्तम पुष्पांनीं सुशोभित झालेले, (१५८) सर्व लक्षणयुक्त सर्वांगीं सुंदर, पांढऱ्या कमलासनावर बसलेले, पूर्णचंद्रासारखें मुख असलेले (१५९) मृग व टंक धारण केलेले, शांतवृत्ति, वरद व अभय हस्त अशा परमात्म मूर्तींचें त्रिपुंड्रामध्यें ध्यान करावें. (१६०) ऋजु, श्वेत, अनव्यास, स्निग्ध, गाढ व प्रमाणयुक्त अशा लक्षणांनीं युक्त त्रिपुंड्र सर्वसिद्धि देणारे होत. (१६१) मलिन, परुष, वांकडे, छिन्न, विरल, व युत ह्या सहा दोषांनीं युक्त त्रिपुंड्र अशुभ होत. (१६२) ज्या मनुष्यांच्या शरीरावर त्रिपुंड्र नाहींत तें शरीर श्मशानासम होय ह्मणून तें पुण्यजनांनीं पाहूं नये. भीमसंहितेंत असें सांगितलें आहे कीं, (१६३) त्रिपुंड्र, बिंदु, दीप, त्रिशूल अर्धचंद्र, सर्वांगोध्धूलन हीं सहा शैवांचीं चिन्हें होत. (१६४) "त्रियायुषमिति" ह्या मंत्रानें बुद्धिमानानें जें पाहिजे तें चिन्ह धारण करावें. भस्माचे जितके परमाणु जमिनीवर पडतील तितकीं सहस्र वर्षें मनुष्य पापी होतो. (१६५) दहिं, दूध, घृत, तेल, मध, व गूळ, नारळाचें पाणी, व्यंजक पदार्थ (१६६) किंवा दुसरें द्रव्य ज्यांत किडे पडून अगर दुसऱ्या कोणत्याही रीतीनें दोषित, अगर न खाण्यासारखें किंवा निंदित झालें असतां तितकेंच तें काढून टाकून त्यावर भस्म सेचन केलें असतां तें शुद्ध होतें. (१६७) स्मृति, सर्व वेद, पुराणें यांनीं विभूतीचें माहात्म्य वर्णन केलें आहे तें सूज्ञांनीं लक्षांत

दंति भूतिमाहात्म्यं तत्तत्संधारयेद्बुधः ॥१६७॥ ब्रह्मांडपुराणे ॥ विप्राणां वेदविदुषां वेदांतज्ञानवेदिनाम् ॥ सितेन भस्मना कार्यं त्रिपुंड्रमिति पद्मभूः ॥१६८॥ कूर्मपुराणे ॥ सर्वे तपस्विनः प्रोक्ताः सर्वयज्ञेषुभागिनः ॥ रुद्रभक्ताः स्मृताः सर्वे त्रिपुंड्रांकितमस्तकाः ॥१६९॥ संवर्तस्मृतौ ॥ श्राद्धे यज्ञे जपे होमे वैश्वदेवे सुरार्चने ॥ धृतत्रिपुंड्रपूतात्मा मृत्युं जयति मानवः ॥१७०॥ त्रिपुंड्रधृद्द्विप्रवरो यो रुद्राक्षधरः शुचिः॥ स पंक्तिपावनः श्राद्धे पूज्यो विप्रैः सुरैरपि ॥ १७१ ॥ स्कांदे ॥ तेनाधीतं श्रुतं तेन तेन सर्वमनुष्ठितम् ॥ येन विप्रेण शिरसि त्रिपुंड्रं भस्मना धृतम् ॥१७२॥ त्यक्तवर्णाश्रमाचारो लुप्तवर्णक्रियोऽपि यः॥ सकृत्तिर्यक्त्रिपुंड्रांकधारणात्सोऽपि पूयते ॥१७३॥ कूर्मपुराणे ॥ त्रिपुंड्रं ब्राह्मणो विद्वान् मनसापि न लंघयेत् ॥ श्रुत्या विधीयते यस्मात्त्यागी पतितो भवेत् ॥१७४॥वेदस्याध्ययने शूद्रो नाधिकारी यथा भवेत्॥ त्रिपुंड्रेण विना विप्रो नाधिकारी शिवार्चने ॥१७५॥ त्रिपुंड्रधारणं मु-

---

आणावें. ब्रह्मांडपुराणामध्यें सांगितलें आहे कीं, (१६८) वेदवेत्त्या व वेदांताचें ज्ञान असलेल्या ब्राह्मणांनीं पांढऱ्या भस्मानें त्रिपुंड्र धारण करावेत असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. कूर्मपुराणांत (१६९) जे सर्व तपस्वी यज्ञभागी असें ह्मटलें आहे. व ज्यांच्या मस्तकावर त्रिपुंड्र आहेत ते सर्व रुद्राचे भक्त असें मानिलें आहे. संवर्त स्मृतीमध्यें सांगितलें आहे कीं, (१७०) श्राद्धांत, यज्ञांत, जपांत, होमांत, वैश्वदेवांत, देवार्चनामध्यें त्रिपुंड्र धारण केल्यानें ज्याचा आत्मा शुद्ध झाला आहे तो मनुष्य मृत्यूला जिंकतो. (१७१) जो द्विजश्रेष्ठ त्रिपुंड्र धारण करितो व रुद्राक्ष धारण करून पवित्र होतो तो शुद्ध पंडित श्राद्धामध्यें विप्र व देव यांस पूज्य होतो. स्कांदांत सांगितलें आहे कीं, (१७२) ज्यानें कपाळावर भस्माचें त्रिपुंड्र धारण केले आहेत त्या ब्राह्मणानें वेदाध्ययन व सर्व कर्मांचें अनुष्ठान केल्यासारखें होतें. (१७३) ज्यानें जाति, आश्रम, व आचार सोडिले आहेत व ज्याचे जाति संस्कार लोप झाले आहेत त्यानें एकवार आडवे त्रिपुंड्र धारण केले असतांही तो पुनीत होतो. कूर्मपुराणांत सांगितलें आहे कीं, (१७४) विद्वान् ब्राह्मणानें त्रिपुंड्राचें मनानेंही उल्लंघन करूं नये (त्रिपुंड्र न लावण्याचा विचारही मनांत आणूं नये.) कारण तो श्रुतिविहित आहे ह्मणून त्याचा त्याग केला असतां मनुष्य पापी होतो. (१७५) जसा शूद्राला वेदाध्ययन करण्यास अधिकार नाहीं त्याप्रमाणें ब्राह्मणास त्रिपुंड्रावांचून शिवाची पूजा करण्यास अधिकार नाहीं. (१७६) त्रिपुंड्रधारण टा-

क्त्वा मुक्तिमिच्छति यः पुमान् ॥ विषपानेन नित्यत्वं कुरुते स्वात्मनो हि सः ॥१७६॥ यथा कृशानुरहितस्त्वध्वरो न विराजते ॥ अशेषसाधनोऽप्येवं भस्महीनं शिवार्चनम् ॥१७७॥ न तत्ध्यानं न तत्ज्ञानं न तत्पूजा न तत्तपः ॥ विना तिर्यक्त्रिपुंड्रांकं विप्रेण यदनुष्ठितम् ॥ ॥१७८॥ धिग्भस्मरहितं भालम् धिग्ग्राममशिवालयम् ॥ धिगनीशार्चनं जन्म धिग्विद्यामशिवाश्रयाम् ॥१७९॥ स्रष्टा सृष्टिच्छलेनाह त्रिपुंड्रस्य प्रशस्तताम्॥ ससर्ज च ललाटं हि तिर्यगूर्ध्वं न वर्तुलम्॥१८०॥ दुःशीलः शीलयुक्तो वा यो वा को वाऽप्यलक्षणः ॥ भूतिशासनसंयुक्तः स पूज्यो राजपुत्रवत्॥१८१॥त्रिपुंड्रं ये विनिंदंति निंदंति शिवमेव ते ॥ धारयंति च ये भक्त्या धारयंति तमेव ते॥१८२॥विभूतिमाहात्म्यं वक्तुं ब्रह्मापिच न शक्नुयात्॥किं पुनः संस्कृतं भस्म मानवो वक्तुमुत्सहेत् ॥१८३॥ तिर्यक्त्रिपुंड्रमाहात्म्यं यः पठेत् सततं नरः ॥ इहेष्टान् सकलान् प्राप्य यात्यंते परमं पदम् ॥ १८४ ॥

इति श्रीशैवरत्नाकरे सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

---

कून जो मनुष्य मुक्तीची इच्छा करितो तो विषप्राशन करून आत्मा शाश्वत करूं पाहतो. (१७७) सर्व सामुग्री जमविली असतांहीं अग्निविना जसा यज्ञ शोभत नाहीं तसें भस्मधारण न करितां केलेलें शिवपूजन शोभत नाहीं. (१७८) ब्राह्मणानें आडवे त्रिपुंड्रधारण केल्याविना आचरिलेलें ध्यान, ज्ञान, पूजा तप हीं सर्व व्यर्थ होत. (१७९) भस्मरहित कपाळ, शिवालयावांचून गांव, ज्यांत शिवार्चन झालें नाहीं तो जन्म, जीस शिवाचा आश्रय नाहीं अशी विद्या यां सर्वांस धिक्कार असो. (१८०) जणूं काय ब्रह्मदेवच सृष्टिरचनेनेंच त्रिपुंड्रमहत्व सांगत आहे. कारण त्यानें ललाट केवळ आडवें केलें आहे उभें किंवा वाटोळें केलें नाहीं.(१८१) कोणीही मनुष्य दुःशील अथवा सुशील किंवा कुलक्षण असला तरी तो विभूति धारण केलेला असेल तर तो राजपुत्राप्रमाणें पूज्य होतो. (१८२) जे त्रिपुंड्राची निंदा करितात ते केवल शिवाचीच निंदा करितात. व जे त्रिपुंड्रधारण करितात ते त्या शिवालाच धारण करितात. (१८३) ब्रह्मदेव केवल विभूतीचें माहात्म्य वर्णन करूं शकला नाहीं तर मानव संस्कारितभस्माचें कसें बरें वर्णन करूं शकेल. (१८४) आडव्या त्रिपुंड्राचें माहात्म्य जो नर नित्य पठन करील त्याचे इहलोकीचे सर्व मनोरथ परिपूर्ण होऊन तो उत्तम पदाला जाईल.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रंथांतील सातवा अध्याय पूर्ण झाला.

# अथ अष्टमोऽध्यायः

श्रीगणेशाय नमः ॥ अथ रुद्राक्षमाहात्म्यं ॥ रुद्राक्षमाहात्म्यं कात्यायनशाखायां अथाहैनं भगवंतं कालाग्निरुद्रं भ्रशुंडः पप्रच्छ भगवन् कथं रुद्राक्षोत्पत्तिस्तध्दारणात्फलं किमिति तं होवाच स भगवान् रुद्रः ॥ पुरा त्रिपुरवधायोन्मीलिताक्षोऽहं तेभ्यो जलबिंदवो भूमौ पतितास्ते रुद्राक्षा जाताः ॥ सर्वानुग्रहार्थाय तेषां नामोच्चारणमात्रेण दशगोदानफलं भवति ॥ दर्शनस्पर्शनाभ्यां द्विगुणत्रिगुणफलं भवति ॥ अत ऊर्ध्वं वक्तुं न शक्नोमीति ॥ भ्रशुंड ततो जपसमंत्रकधारणं विधिं कथयामि ॥ स्नानविधिना स्नातः शुचिराग्नेयस्नानं त्रिपुंड्रधारणं च कृत्वा एकाश्यादिचतुर्दशांतानां सृष्टिक्रमेण मंत्रास्तु ॥ ॐ ऱ्हूं स्रूं ब्रूं रुं ज्रुं भ्रांतरूतमपि श्रीं मां क्षां क्षमपि क्षौं ऱ्हीं ऱ्हं नमोऽतमोमिति ॥ पूर्वोक्तमंत्राननंतरोक्तान्वा जपेध्दीमान् ॥ प्राणानायम्य समस्तपापक्षयार्थं शिवज्ञानप्राप्त्यर्थं समस्तमंत्रैः सह धारणं करिष्यामि ॥ इति संकल्प्य शिखायामेकमेकास्यं श्रीसदाशिवाय नम इति द्वित्रिद्वादशवक्त्राणि त्रीणि शिरसि ॥ वन्हिसूर्यसोमाधिपाय

---

(१) आतां रुद्राक्षमाहात्म्य सांगतों. कात्यायनशाखेमध्यें रुद्राक्षमाहात्म्य सांगितलें आहे; भगवान् कालाग्नि रुद्राला भ्रशुंड ह्मणतो हे भगवन् रुद्राक्षांची उत्पत्ति कशी झाली व तें धारण केल्यास फल कोणतें? भगवन् कालाग्निरुद्र भ्रशुंडाला ह्मणाले, पूर्वी त्रिपुरवधप्रसंगीं मी माझे डोळे उघडले तेव्हां त्यापासून पाण्याचे थेंब जमिनीवर पडले; ते सर्व जनांचें कल्याण व्हावें ह्मणून रुद्राक्ष झाले. त्यांचा केवल नामोच्चार केला असतां दहा गाई दिल्याचें फल येतें. दर्शन घडलें असतां याचे दुप्पट फल मिळतें व स्पर्श झाला असतां तिप्पट फल मिळतें यापुढें माझ्यानें सांगवत नाहीं. हे भ्रशुंडा, रुद्राक्षांचा जप व ते मंत्रपूर्वक धारण करण्याची रीतही सांगतों. स्नानविधीनें पवित्र होऊन भस्मधारण करून व त्रिपुंड्र लावून एकमुखरुद्राक्षापासून चतुर्दशमुख रुद्राक्षापर्यंत सृष्टिक्रमानुसार सर्व मंत्र ह्मणावेत. ते वर मुळांत दिले आहेत ते पूर्वी सांगितलेले किंवा नन्तर सांगितलेले मन्त्र बुद्धिमानानें जपावेत. प्राणायाम करून सर्व पापांचें निरसन व्हावें व शिवज्ञान व्हावें ह्मणून सर्व मन्त्रांनीं रुद्राक्षधारण करितों असा संकल्प करून 'श्रीसदाशिवाय नमः' असें ह्मणून शेंडींत एकतोंडी एक रुद्राक्ष धारण करावा; अग्नि, सूर्य, सोम यांचा अधिप

शिवाय नम इति ॥ एकादशवक्रं षट्त्रिंशन्मूर्ध्नि ॥ षट्त्रिंशत्तत्वात्मकाय परशिवाय नम इति॥ पंचदशसप्तवक्त्राणि कर्णयोरेकमेकं सोमाय नम इति ॥ षडष्टवक्त्राणि कण्ठे द्वात्रिंशत्त्रियंबककलात्मने श्रीकण्ठाय नम इति ॥ चतुर्वक्त्रां पंचाशन्मालिकामुरसि ॥ श्रीकण्ठादिमूर्त्यात्मकाय श्रीसर्वज्ञाय नम इति ॥ बाह्वोस्त्रयोदशवक्त्राणि षोडश षोडश ॥ सुखासनादिषोडशमूर्त्यात्मकाय श्रीकण्ठाय नम इति ॥ दक्षिणे ॥ श्रीसोमकलात्मकाय श्रीसोमनाथाय नम इति ॥ वामे ॥ मणिबंधयोर्नववक्त्राणि द्वादश द्वादश द्वादशादित्याधिपाय श्रीमहादेवाय नम इति दक्षिणे ॥ केशवादिमूर्त्यधिपाय श्रीउमापतये नम इति वामे ॥ अष्टोत्तरशतं सोपवीतं चतुर्दशवक्त्राणि शतरुद्रविद्येश्वरात्मकाय श्रीविश्वेश्वराय नम इति ॥ बोधायनशाखायाम् ॥ तानि हवा एतानि रुद्राक्षाणि यत्र वेदा धारयंति तस्माद्देवा धारयंति ॥ यस्तानि धारयन् गच्छन् तिष्ठन् स्वपन् खादन्नुन्मिषन्निमिषन्नपि ॥ सर्वाण्येनांसि तरति

---

अशा शिवाला नमस्कार असो असें ह्मणून दोन, तीन किंवा बारा तोंडांचे तीन रुद्राक्ष डोक्यावर धारण करावेत. छत्तीस तत्वात्मक परशिवाला नमस्कार असो असें ह्मणून अकरा तोंडी छत्तीस रुद्राक्ष डोक्यावर धारण करावेत. सोमाला नमस्कार असो असें ह्मणून पांच; दहा किंवा सात तोंडांचा रुद्राक्ष प्रत्येक कानांत एक बांधावा. त्रियंबकीकलांचा आत्मा जो श्रीकण्ठ त्यास नमस्कार असो असें ह्मणून सहा किंवा आठ तोंडांचे बत्तीस रुद्राक्ष कण्ठामध्यें धारण करावेत; श्रीकंठादि मूर्तिरूपी सर्वज्ञ शिवास नमस्कार असो असें ह्मणून चार तोंडांच्या पन्नास रुद्राक्षांची माळ उरावर धारण करावी. सुखासनादि षोडश मूर्तिरूपी श्रीकण्ठास नमस्कार असो असें ह्मणून तेरा तोंडाचे सोळा रुद्राक्ष घेऊन उजव्या बाहूला बांधावेत. श्रीसोमकलारूपी श्रीसोमनाथाला नमस्कार असो असें ह्मणून सोळा रुद्राक्ष घेऊन डाव्या बाहूला बांधावेत. द्वादशाधिप अशा श्रीशंकराला नमस्कार असो असें ह्मणून नऊ तोंडांचे बारा रुद्राक्ष उजव्या मणिबंधास बांधावेत. केशवादि मूर्त्यधिप अशा श्रीउमापतीला नमस्कार असो असें ह्मणून डाव्या मणिबंधाला नऊ तोंडांचे बारा रुद्राक्ष बांधावेत. शतरुद्र इत्यादि विश्वेश्वराला नमस्कार असो असें ह्मणून चौदा तोंडांचे एकशेआठ रुद्राक्ष यज्ञोपवीतासहित धारण करावेत. बोधायनशाखेंत सांगितलें आहे कीं, वेदपुरुष ह्या रुद्राक्षांचें धारण करितात ह्मणून देवहि धारण करितात; उठणें, बसणें, खाणें, पिणें, निजणें वगैरे सर्व व्यवहारांत जो

रुद्रो भूत्वा रुद्रो भवति॥ य एवं विद्वान् ब्रह्मचारी गृहस्थो वानप्रस्थो यतिर्वा धारयेत्॥ पदे पदे ऽश्वमेधशतफलं प्राप्नोति॥१॥ लैंगे॥ रुद्राक्षान्धारयेद्विप्रः संध्यादिषु च कर्मसु ॥ तत्सर्वं समवाप्नोति कोटिकोटिगुणं सदा ॥२॥ स्नाने दाने जपे होमे वैश्वदेवे सुरार्चने ॥ प्रायश्चित्ते तथा श्राद्धे दीक्षाकाले विशेषतः ॥३॥ अरुद्राक्षधरो भूत्वा यत्किंचित्कर्म वैदिकम् ॥ कुर्याद्विप्रस्तु यो मोहान्नासावाप्नोति तत्फलम् ॥४॥ खादन्मांसं पिबन्मद्यं स गच्छन्नंत्यजामपि ॥ सद्यो भवति पूतात्मा रुद्राक्षे शिरसि स्थिते ॥५॥ मानवपुराणे ॥ रुद्राक्षं धारयन्पापं कुर्वन्नपि च मानवः ॥ सर्वं तरति पाप्मानं जाबालश्रुतिराहिता (वाक्यतः) ॥६॥ अस्मिन्नर्थे स्कांदे ॥ स्कंद उवाच ॥ भगवन् देवदेवेश सर्वज्ञ परमेश्वर॥ पृच्छामि त्वां महाभक्त्या कथयस्व प्रसादतः ॥७॥ वामदक्षिणसिद्धांते कथितं हि महागुणम् ॥ पुण्यानां परमं पुण्यं पवित्रं पापनाशनम् ॥८॥ रुद्राक्षधारणं पुण्यमिह लोके परस्य च ॥ कस्माज्जातं तु किं

---

रुद्राक्ष धारण करितो तो सर्व पापांतून तरून जातो व रुद्र होतो. याप्रमाणें जो कोणी विद्वान् ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, किंवा यति रुद्राक्ष धारण करितो त्यास पावलोपावलीं शंभर अश्वमेध केल्याचें फळ मिळतें. लिंगपुराणांत सांगितलें आहे कीं, (२) ब्राह्मणानें संध्या वगैरे कर्मांत रुद्राक्ष धारण करावेत ह्मणजे त्यास आपल्या सर्व कर्मांचें कोटिपट फल प्राप्त होतें. (३) स्नान, दान, जप, होम, वैश्वदेव, देवपूजा, प्रायश्चित्त, ह्या कर्मांत व श्राद्धांत विशेषतः दीक्षाप्रसंगीं (४) जो ब्राह्मण अज्ञानानें रुद्राक्ष धारण न करितां वैदिक कर्म करितो त्यास त्या कर्मांचें फल मिळत नाहीं. (५) मांसभक्षण करणारा, मद्यपान करणारा, इतकेंच नव्हे परंतु अंत्यजेकडे जाणारा असला तरी त्याच्या डोक्यावर रुद्राक्ष ठेविल्याबरोबर तो पवित्र होतो. मानवपुराणांत सांगितलें आहे कीं, (६) रुद्राक्ष धारण करून पाप करणारा मनुष्य असला तरी तो तें सर्व पाप तरून जातो असें जाबालश्रुति सांगते. याचअर्थी स्कांदपुराणांत सांगितलें आहे कीं, (७) स्कंद ह्मणतो, हे भगवन् देवाधिदेवा, सर्वज्ञ परमेश्वरा मी तुला मोठ्या भावानें विचारतों तूं कृपा करून सांग. (८–९) वामदक्षिणसिद्धांतांत सांगितलें आहे कीं, रुद्राक्ष धारण करणें फार गुणकारक, अति पुण्यकारक, पवित्र व पापनाशक असून या लोकामध्यें व परलोकामध्येंही पुण्यकारक आहे तें कसें उत्पन्न झालें, त्याचें नांव काय, व ते मनुष्यांनीं

नाम कथं वा धार्यते नरैः॥ कतिवैषां मुखान्यत्र *कैर्मंत्रैःकथयस्व मे॥९॥
ईश्वरः ॥ शृणु षण्मुख यत्नेन कथयामि समासतः॥ त्रिपुरो नामदैत्यस्तु पुरा चासीत्सुदुर्जयः ॥ जितास्तेन सुरास्सर्वे ब्रह्मविष्णिवद्रमुखगाः ॥१०॥ चिंतितं च मया पुत्र अघोरास्त्रमनुत्तमम् ॥ सर्वदेवमयं दिव्यं ज्वलितं घोररूपकम् ॥११॥ त्रिपुरस्य वधार्थाय देवानां त्राणनाय च ॥ सर्वविघ्नप्रशमनमघोरास्त्रं तु चिंतितम् ॥१२॥ दिव्यवर्षसहस्राणि चक्षुरुन्मीलितं मया ॥ उभाभ्यां चारुपक्ष्मभ्यां पतिता जलबिंदवः ॥१३॥ तत्राश्रुबिंदवो जाता महारुद्राक्षवृक्षकाः ॥ स्थावरत्वमनुप्रापुर्भक्तानुग्रहकारणात् ॥१४॥ रुद्राक्षाणां फलं वत्स त्रिषु लोकेषु विश्रुतम् ॥ लिंगस्य दर्शने पुण्यं भवेद्रुद्राक्षदर्शनात् ॥१५॥ भक्त्या रात्रौ दिवा पापं दिवा रात्रिकृतं हरेत् ॥ लक्षं तु दर्शनात्पुण्यं कोटिस्तत्स्पर्शनाद्भवेत् ॥१६॥ तस्य कोटिशतं पुण्यं लभते धारणान्नरः ॥ लक्षकोटिसहस्राणि लक्षकोटिशतानि च ॥ तज्जपाल्लभते पुण्यं नात्र कार्या विचारणा ॥१७॥ हस्ते चोरसि कंठे च कर्णयोर्वापि मस्तके ॥

---

कसें धारण करावें. त्या रुद्राक्षांचीं मुखें किती असावीं व तें कोणत्या मंत्रांनीं धारण करावेत हें मला सांगा.

ईश्वर ह्मणतात–(१०) हे षण्मुखा तूं लक्षपूर्वक श्रवण कर, मी थोडक्यांत सांगतों. त्रिपुरनामें कोणी एक प्राचीनकाळीं अजिंक्य राक्षस होता. त्यानें ब्रह्मा, विष्णु, इंद्र आदिकरून सर्व देव जिंकले. (११) तेव्हां त्याचा वध करण्याकरितां हे पुत्रा मीं अत्युत्कृष्ट सर्व देवस्वरूपी, तेजस्वी, भयंकर अशा अघोरास्त्राची योजना केली. (१२) त्रिपुराचा नाश व्हावा, देवांचें रक्षण व्हावें व सर्व विघ्नांची शांति व्हावी ह्मणून मीं तें अघोरास्त्र योजिलें. (१३) देवमानाच्या हजार वर्षांनीं मीं तो डोळा उघडला तेव्हां दोन्ही पापण्यांपासून पाण्याचे थेंब पडले. (१४) तेथें ते अश्रुबिंदु, रुद्राक्षाचें मोठे वृक्ष झालें. भक्तांवर उपकार कराच ह्मणून ते तेथें स्थावर झाले. (१५) रुद्राक्षांचें फल तिन्ही लोकांत प्रसिद्ध आहे; लिंगदर्शन झाल्याचें जें पुण्य तेंच रुद्राक्षदर्शनाचें पुण्य होय. (१६) भक्तिपूर्वक रुद्राक्षदर्शन केलें असतां अहोरात्र केलेलें पाप नाश पावतें. दर्शन झालें असतां लक्ष पुण्य लागतें व स्पर्श झाला असतां कोटिप्रमाण पुण्य लागतें. (१७) तो रुद्राक्ष धारण केला असतां मनुष्याला शतकोटि पुण्य लागतें. त्या रुद्राक्षमाळेचा जप केला असतां मनुष्यास हजारो लक्षावधि कोटिपुण्य लाभतें यांत संशय नाहीं. (१८) हातांत, उरा-

---

* कैर्मंत्रैर्धार्यतेकथम्

मुच्यतं सर्वपापेभ्यो नरो रुद्राक्षधारणात् ॥१८॥ शिरोमाला च षट्त्रिंशत् द्वात्रिंशत्कंठमालिका॥ कूर्परे षोडश प्रोक्ता द्वादशं मणिबंधयोः ॥ ॥१९॥ उरो माला च पंचाशदष्टोत्तरशतं तथा ॥ शिरसा धार्यते कोटिः कराभ्यां दशकोटयः ॥२०॥ गले बध्वा शतं कोटि मूर्ध्नि कोटिसहस्रकम् ॥ अयुतं चोपवीतं च लक्षकोटि भुजद्वये ॥२१॥ अप्रमेयफलं हस्ते रुद्राक्षं मोक्षसाधनम् ॥ अवध्यः सर्वभूतानां रुद्रवद्विचरेद्भुवि ॥ ॥२२॥ सुराणामसुराणां च वंदनीयो यथा शिवः ॥ रुद्राक्षधारणान्नित्यं वंदनीयो नरैरिह ॥२३॥ उच्छिष्टो वा विकर्मस्थो युक्तो वा सर्वपातकैः॥ मुच्यते सर्वपापेभ्यो नरो रुद्राक्षधारणात् ॥२४॥ रुद्राक्षमालिकां कंठ धारयेद्भक्तिवर्जितः ॥ पापकर्मापि यो नित्यं रुद्रलोके महीयते ॥२५॥ रुद्राक्षं कंठमाश्रित्य श्वापि वा म्रियते यदि ॥ सोऽपि रुद्रत्वमाप्नोति किं पुनर्मानुषादयः॥२६॥ ध्यानधारणहीनोऽपि रुद्राक्षं यदि धारयेत्॥ सर्वपापविनिर्मुक्तः स याति परमां गतिम् ॥२७॥ शुचिर्वाप्यशुचिर्वा-

---

वर, गळ्यांत, किंवा कानांत वा मस्तकावर रुद्राक्ष धारण केले असतां मनुष्य सर्व पापांतून मुक्त होतो. (१९) मस्तकावर घालण्याच्या माळेंत छत्तीस रुद्राक्ष असावेत; गळ्यांतील माळेंत बत्तीस, कोपरांत सोळा व मणिबंधामध्यें बारा असे रुद्राक्ष असावेत. (२०) उरावरील माळेंत पन्नास किंवा एकशे आठ, मस्तकावरील माळेंत एक कोटी, हातांत दहा कोटी (२१) गळ्यांत शंभर कोटी, टाळूवर एक हजार कोटी, जानव्यांत अयुत कोटी, दोन्ही भुजांवर लक्ष कोटी, असे रुद्राक्षधारण करावेत. (२२) हातांत रुद्राक्षधारण केलें असतां अगणित फल मिळतें व ते मोक्षाचें साधन होतात व धारण करणारा मनुष्य अमर होऊन या पृथ्वीवर रुद्राप्रमाणें संचार करितो. (२३) ज्याप्रमाणें शिव देवांना व राक्षसांना पूज्य आहे त्याप्रमाणेंच मनुष्य रुद्राक्षधारण केल्यानें या लोकांत सर्वदा मनुष्यांस पूज्य होतो. (२४) उच्छिष्ट ( बाटलेला ) कर्मभ्रष्ट, किंवा सर्व पापें आचरण करणारा असला तरी तो मनुष्य रुद्राक्षधारण केल्यानें सर्व पापांपासून मुक्त होतो. (२५) भक्तिवांचूनहि गळ्यांत रुद्राक्षांची माळ घालणारा किंवा सर्वकाल पापाचरण करणारा मनुष्य रुद्रलोकांत श्रेष्ठत्व पावतो. (२६) कुत्रें जरी रुद्राक्षांची माळ घालून मरण पावलें तरी तें रुद्रत्व पावतें मग मनुष्य वगैरेंची गोष्ट काय सांगावी. (२७) ध्यानधारणा न करणाऱ्या मनुष्यानेंही रुद्राक्षधारण केले असतां तो सर्व पापांतून मुक्त होऊन उत्तम गतीला जातो. (२८) कोणीही मनुष्य पवित्र वा अपवित्र, निषिद्ध

पि ह्यभक्षस्य च भक्षकः ॥ अगम्यागमनश्चैव ब्रह्महा गुरुतल्पगः ॥२८॥ म्लेंच्छो वाप्यथ चंडालो युक्तो वा सर्वपातकैः॥रुद्राक्षधारणाद्यस्तु स रुद्रो नात्र संशयः ॥२९॥ स्कंदः ॥ तेषां नानामुखानां तु देवताश्च सुरेश्वर ॥ गुणाश्च कीदृशास्तेषां कथयस्व यथार्थतः ॥३०॥

ईश्वरः ॥ शृणु षण्मुख यत्नेन वक्रे वक्रे यथाफलम्॥ एकवक्त्रं शिवः साक्षाद्ब्रह्महत्त्यां व्यपोहति ॥ द्विवक्त्रमीश्वरेशानौ गोवधं नाशयेद्ध्रुवम् ॥३१॥ त्रिवक्रमनलः साक्षात् स्त्रीहत्यां दहति क्षणात्॥ चतुर्वक्त्रं स्वयं ब्रह्मा पुंहत्या च व्यपोहति ॥३२॥ पंचवक्त्रं स्वयं रुद्रः कालाग्निर्नामनामतः ॥ अगम्यागमनश्चैव ह्यभक्षस्य च भक्षकः ॥ मुच्यते सर्वपापेभ्यो पंचवक्त्रस्य धारणात्॥३३॥षड्वक्त्रं कार्तिकेयस्तु धारयेद्दक्षिणे करे ॥ ब्रह्महत्यादिभिः पापैर्मुच्यते नात्र संशयः ॥३४॥ सप्तवक्रं महासेन ह्यनंतो नामनामतः ॥ गोवधस्वर्णस्तेयाभ्यां मुच्यते सर्वदा बुधः ॥३५॥ अष्टवक्त्रं महासेन साक्षाद्देवो गणाधिपः ॥ चोरकूटं तुलाकूटं

---

पदार्थ भक्षण करणारा, ज्या स्त्रीशीं गमन करूं नये त्या स्त्रीशीं गमन करणारा, ब्रह्महत्या करणारा, गुरुपत्नीशीं संभोग करणारा (२९) म्लेंच्छ, चांडाल किंवा सर्व पातकांनीं युक्त असला तरी तो रुद्राक्षधारणानें निःसंशय रुद्र होतो. स्कंद ह्मणतो (३०) हे देवाधिदेवा त्या नानामुखांच्या रुद्राक्षांना कोणत्या देवता, त्यांचे गुण कसे, हें सर्व यथातथ्य सांगावें.

ईश्वर ह्मणतात. (३१) हे षण्मुखा एकेका तोंडांत काय काय फल आहे तें लक्षपूर्वक श्रवण कर. एक तोंडी रुद्राक्ष साक्षात् शिव होय, तो ब्रह्महत्येचें निरसन करतो. दोन तोंडी रुद्राक्ष ईश्वर व ईशान होय, तो गोवधाचा नाश करितो. (३२) तीन तोंडी रुद्राक्ष साक्षात् अग्नि होय, तो स्त्रीहत्या पातकाचा क्षणांत नाश करितो. चार तोंडी रुद्राक्ष प्रत्यक्ष ब्रह्म होय, तो पुरुषवधाच्या पातकाचा नाश करतो.(३३) पांच तोंडी रुद्राक्षास प्रत्यक्ष कालाग्नि नांवाचा रुद्र असें ह्मणतात. समागमास अयोग्य अशा स्त्रीशीं समागम करणारा, निषिद्ध पदार्थ खाणारा अशा मनुष्यानें पंचमुखी रुद्राक्षधारण केले असतां तो सर्व पापांपासून मुक्त होतो.(३४) सहा तोंडी रुद्राक्ष कार्तिकेय होय ते उजव्या हातांत धारण करावें त्यायोगें मनुष्य ब्रह्महत्या इत्यादि पातकांतून निःसंशय मुक्त होतो. (३५) सात तोंडी रुद्राक्ष हे स्कंदा अनंत होय; ते धारण केल्यास गोवध, सुवर्णचोरी या पापांतून मनुष्य मुक्त होतो. (३६) आठ तोंडी रुद्राक्ष साक्षात् गणाधिप होय. तो चोरीचा खोट्या वजनांचा

सर्वकूटं तथैव च ॥३६॥ दुर्विचित्रकरेणैव संस्पृशेद्वा गुरुस्त्रियम् ॥ एवमादीनि पापानि हंति सर्वाणि सर्वदा ॥३७॥ विघ्नास्तस्य प्रणश्यंति ह्यंते याति परं पदम् ॥ गुणानेतान् लभेत्सर्वानष्टवक्रस्य धारणात् ॥३८॥ नववक्त्रं भैरवं च धारयेद्वामहस्तके ॥ भुक्तिदं मुक्तिदं प्रोक्तं मम साम्यबलो भवेत् ॥३९॥ लक्षकोटिसहस्राणि पातकानि करोति यः ॥ तत्सर्वं दह्यते शीघ्रं नववक्त्रस्य धारणात्॥४०॥दशवक्त्रं भवेद्वत्स साक्षाद्देवो जनार्दनः ॥ ग्रहाश्चैव पिशाचाद्या वेतालब्रह्मराक्षसाः ॥४१॥ पन्नगाश्चापि ये चान्ये सर्वे नश्यंति धारणात्॥ वक्रैकादशरुद्राक्षं रुद्रा एकादश स्मृताः ॥४२॥ शिखायां धारयेन्नित्यं तस्य पुण्यफलं शृणु ॥ अश्वमेधसहस्रस्य वाजपेयशतस्य च ॥४३॥ गवां शतसहस्रस्य सम्यग्दत्तस्य यत्फलम्॥ तत्फलं समवाप्नोति वक्रैकादशधारणात्॥४४॥ रुद्राक्षं द्वादशं वक्त्रं कंठदेशे तु धारयेत्॥ आदित्यास्तर्पितास्तेन द्वादशात्मव्यवस्थितम् ॥ गोमेधस्याश्वमेधस्य बहुस्वर्णस्य यत्फलम्॥४५॥ तत्फलं लभते मर्त्यो नात्र कार्या विचारणा ॥ दंष्ट्रिणां शृंगिणां चैव

---

असा सर्व पापसमूह (३७) तसेंच दुष्टवासनेनें गुरुस्त्रीस स्पर्श करण्याचें पाप इत्यादि सर्व पापें नाश करितो. (३८) हे रुद्राक्षधारण करणाऱ्याचीं सर्व संकटें नाश पावतात व अंतीं त्यास उत्तम पद मिळतें. हे अष्टवक्र रुद्राक्षधारण केल्यानें हे सर्व गुण प्राप्त होतात. (३९) नऊ तोंडी रुद्राक्ष भैरवच होय. ते डाव्या हातांत धारण करावे ते भुक्ति, मुक्ति देणारे असून ते धारण करणारा माझ्यासारखा बलवान् होतो. (४०) जो मनुष्य असंख्य पातकें करितो तीं सर्व नऊ तोंडी रुद्राक्ष धारण केल्यानें जळून जातात. (४१) दहा तोंडी रुद्राक्ष हे बाळा प्रत्यक्ष जनार्दन होय. ते धारण केल्यानें दुष्ट ग्रह भूतें, वेताळ, ब्रह्मराक्षस, (४२) सर्प व इतर दुष्ट प्राणी हीं सर्व नाश पावतात (धारण करणारा ह्या सर्वांच्या भयापासून मुक्त होतो.) अकरा तोंडी रुद्राक्ष हे अकरा रुद्र असें मानिलें आहे. (४३) ते सर्वकाल शेंडींत धारण करावें; त्यांचें पुण्य ऐक. हजार अश्वमेध आणि शंभर वाजपेय यज्ञ केल्याचें (४४) व एक लक्ष गोदान योग्य रीतीनें केल्याचें जें फल तें अकरा तोंडी रुद्राक्ष धारण करणाऱ्यास मिळतें. (४५) बारा तोंडी रुद्राक्ष जो गळ्यांत धारण करितो तो बारा आदित्यांना संतोष देतो; विपुल दक्षिणेसहित केलेल्या गोमेधांचें व अश्वमेधांचें जें फल (४६) तें त्या मनुष्यास मिळतें यांत सुत-

खड्गवज्रनिवारणम् ॥४६॥ न चैवाग्निभयं चैव न च व्याधिः प्रवर्तते॥ कर्तुर्लाभसुखं चैवमैश्वर्यं न दरिद्रता ॥४७॥ हस्त्यश्वमृगमार्जारसर्पमूषकदर्दुरान् ॥ श्वोष्ट्रजांश्च शृगालांश्च हत्वा बहुविधानपि ॥ पापैः प्रमुच्यते सर्वैर्वक्रद्वादशधारणात् ॥४८॥ वक्त्रं त्रयोदशं वत्स रुद्राक्षं यदि धारयेत् ॥ कामदं सिद्धिदं ज्ञेयं सर्वसिद्धिप्रदायकम् ॥४९॥ रसं रसायनं चैव धातुवादस्तथैव च ॥ सिध्यंति तस्य सर्वाणि भाग्यहीनोऽपि यो नरः ॥५०॥ माता पिता तथा बंधुर्भ्राता चैव निहन्यते ॥ मुच्यते सर्वपापैस्तु वक्त्रं धृत्वा त्रयोदशम् ॥५१॥ वक्त्रं चतुर्दशं वत्स रुद्राक्षं यदि धारयेत् ॥ धारयेत्सततं मूर्ध्नि स तु बंधुः शिवस्य तु ॥ ॥५२॥ किं पुनर्बहुनोक्तेन वर्णनेन पुनः पुनः ॥ पूजितः सततं देवैः प्राप्यते पुण्यमुत्तमम् ॥५३॥ शृणु षण्मुख यत्नेन वक्रे वक्रे यथाविधि ॥ अमंत्रधारणादेव गुणा एते प्रकीर्तिताः ॥५४॥ सर्वांश्च मंत्रसंयुक्तान्धारयेद्भुवि मानवः॥ गुणास्तस्य च माहात्म्यं कथितुं नैव शक्यते ॥५५॥ इदानीमंत्रमुद्दिश्यते एकवक्रादि ॥ ॐ हुं ॥ चं ॥ खं ॥ हुं ॥ क्लूं ॥ मां ॥

---

राम् संशय नाहीं. दंष्ट्रा किंवा शिंगें यांनीं युक्त प्राण्यापासून किंवा खड्ग, वज्र धारण करणाऱ्यांपासून ते रक्षण करितात. (४७) अग्नीचें भय किंवा रोग हीं धारण करणाऱ्यास होत नाहींत व तो सुख, ऐश्वर्य यांनीं युक्त होऊन धनवान् होतो.(४८) हत्ती, घोडा, हरिण, मांजर, सर्प, उंदीर, बेडूक, कुत्रें, उंट, कोल्हा असे अनेकविध प्राणी मारल्याच्या पापांतून बारा तोंडी रुद्राक्षधारण केल्यास धारण करणारा मुक्त होतो. (४९) तेरा तोंडी रुद्राक्ष हे बाळा धारण केल्यास ते धारण करणाऱ्यास सर्व इच्छापूरक व सर्व सिद्धिदायक होतात. (५०) व त्याचीं रसायणें, रस, धातुवाद हीं सर्व सिद्ध होतात. व जो भाग्यहीन मनुष्य (५१) आपल्या आईबापांस व भाउबंदांस मारतो तो! तेरामुखी रुद्राक्ष धारण केल्यानें त्या सर्व पापांपासून मुक्त होतो. (५२) हे बाळा जर मनुष्यानें चौदामुखी रुद्राक्ष नित्य डोक्यावर धारण केले तर तो शंकराचा बंधु होय. (५३) वारंवार फार काय सांगावें किंवा वर्णन करावें तो मनुष्य नित्य देवांस पूज्य होऊन त्यास उत्तम पुण्य मिळतें. (५४) हे षण्मुखा ह्याप्रमाणें वर सांगितलेल्या निरनिराळ्या तोंडांच्या प्रत्येक रुद्राक्षाचें मंत्रावांचून धारण केलें असतांही हे गुण सांगितले आहेत; तें लक्षपूर्वक श्रवण कर. (५५) या भूलोकांत मनुष्यानें मंत्रसहित सर्व रुद्राक्षांचें धारण करावें व तसें केलें असतां त्याचे गुण व माहात्म्य कोण वर्णन करूं शकेल. (५६) आतां एकमुखी

द्रां ॥ द्रीं ॥ ह्रुं ॥ क्रुं ॥ क्षौं ॥ कीं ॥ उं ॥ उमापति ॥ ॐ त्रिपुंड्रधृग्विप्रवरो यो रुद्राक्षधरः शुचिः ॥ स पंक्तिपावनः श्राद्धे पूज्यो विप्रैः सुरैरपि ॥५६॥

इति श्रीशैवरत्नाकरे रुद्राक्षधारणतन्माहात्म्यकथनंनामाष्टमोऽध्यायः ॥८॥

---

रुद्राक्षापासून मंत्र सांगतों. ॐ इत्यादिपासून उमापतिपर्यंत चौदा बीजमंत्र सांगितले आहेत ते मुळांत पहावेत. जो पवित्र ब्राह्मण श्रेष्ठ त्रिपुंड्रधारण करितो व रुद्राक्षधारण करितो तो श्राद्धीं बसण्यास योग्य होतो व तो देव ब्राह्मणाला पूज्य होतो.

ह्याप्रमाणें श्रीशैवरत्नाकर ग्रंथांतील रुद्राक्षधारण तन्माहात्म्य कथननांवाचा आठवा अध्याय समाप्त झाला.



## अथ नवमोऽध्यायः

श्रीगणेशाय नमः ॥ अथ गुरुशिष्यलक्षणम् ॥ अतः परं प्रवक्ष्यामि गुरोः शिष्यस्य लक्षणम् ॥ शुश्रूषायाः क्रमं चाथ शृणुष्व चतुरानन॥१॥ सद्वंशजः सुपूर्णांगः प्रशांतः प्रियभाषणः ॥ गंभीरः सत्यवाग्वाग्मी संतुष्टः करुणास्पदः ॥२॥ स्निग्धस्मितमुखो रागी प्रगल्भो निरहंकृतिः ॥ शुचिः सुशीलो धर्मिष्ठः सदाक्षिण्यो बृहद्ध्वनिः ॥३॥ निर्मत्सरो गुणग्राही सुशांतो विजितेंद्रियः ॥ वेदांगेषु कृताभ्यासः पुराणस्मृतिवित्तमः ॥४॥ सर्वागमेषु कुशलः कुलीनश्च महामतिः॥ मंत्रोद्धारप्रवीणश्च मंत्रार्थप्रतिपादकः ॥५॥ शिवस्य च गुरोर्भक्तः शिवैकाहितमानसः ॥ शिवार्चनासक्तचित्तः शिवध्यानैकतत्परः ॥६॥ एतल्लक्षणसंयुक्तो गुरुरित्यभिधीयते ॥ निराकारं निरालंबं निर्मलं निर्विकल्पकम् ॥७॥ निर्गुणं निश्चलं नित्यं परात्परपदं गुरुः ॥ आधाराधेयस्वाधिष्ठानाद्यंतरहितो गुरुः ॥८॥ मनसो वाचकस्यैव गुरोर्भावस्य गोचरः ॥ गुरुमूर्तिः शिवः साक्षान्नान्यथा च सुरेश्वर ॥९॥ वसते पादयुग्मे तु त्रैलोक्यं सचराचरम् ॥ अंगुष्ठाग्रे चाष्टषष्ठि तीर्थानि निवसंति वै ॥१०॥ नक्षत्रग्र

---

(१) आतां गुरुशिष्यांचीं लक्षणें सांगतों. तसेंच सेवाक्रमही सांगतों. हे ब्रह्मदेवा श्रवण कर. (२) कुलीन, रूपवान्, शांत, मधुरभाषी, गंभीर, सत्य भाषण करणारा, वक्ता, समाधानी, दयावंत, (३) स्नेहाळु, हास्यवदन, ममताळु, बोलका, अनभिमानी, पवित्र, सुस्वभावी, धर्मिष्ठ, सरलस्वभावी, गंभीर आवाजाचा, (४) निर्मत्सर, गुणग्राहक, अत्यंत शांत, इंद्रियनिग्रही, वेदांगांचें अध्ययन केलेला, पुराण स्मृति जाणणारा, (५) सर्व आगमग्रंथांत निष्णात, चांगल्या कुलांतला, मोठा बुद्धिमान्, मंत्रोद्धारांत हुषार, मंत्रार्थ सांगणारा, (६) शिव व गुरु यांवर भक्ति करणारा, शिवाचेच ठिकाणीं मनोनिष्ठा ठेवणारा, शिवाच्या पूजेंत रत असणारा, व शिवाचेंच एकान्त ध्यान करणारा, (७) अशा लक्षणांनीं युक्त मनुष्यास गुरु असें ह्मणतात. ज्यास आधार नाहीं, ज्यास आकार नाहीं, आणवादि मलरहित, निर्विकल्प, (८–९) निर्गुण, निश्चल, सर्वोत्तमपद असा गुरु होय, हे देवाधिदेवा आधाराधेयरहित गुरु आदि व अंतरहित आहे. मनाला, वाचेला, व भावाला गोचर असलेला तो गुरु साक्षात् शिवच होय अन्य नव्हे. (१०) त्याच्या पादद्वयाच्या ठिकाणीं चराचर त्रैलोक्य आहे व त्याच्या आंगठ्याच्या टोंकांत ६८ तीर्थें आहेत; (११) नक्षत्र व ग्रह यांचें समुदाय त्याच्या टांचांत आहेत; त्याच्या पा-

ह्वृंदानि गुल्फे तस्य वसंति वै ॥ सप्ताब्धयश्च पादाधस्तदूर्ध्वेऽष्टकुला नगाः ॥११॥ जंघयोर्वसते नित्यं षट्त्रिंशत्तत्वरूपधृक् ॥ स्मर्तव्यः पठितव्यश्च गुरुः परमकारणम् ॥१२॥ गुरुदेवं महादेवमेकीभावेन भाविताः ॥ त्रिषु लोकेषु पूज्यंते ते नरा गुरुभक्तितः ॥१३॥ हररूपं समादाय पूजां गृण्हाति सर्वदा ॥ गुरुरूपं समादाय भवपाशं निकृंतति ॥१४॥ पशुनाथः शिवस्तस्मात्पशूनां पतिरित्यभूत् ॥ पशुपाशविनिर्मुक्तो गुरोराज्ञां निरीक्षयेत् ॥१५॥ त्रिसंध्यं तु गुरोः पूजा कर्तव्या हितमिच्छता ॥ यो गुरुः स शिवः प्रोक्तो यः शिवः स गुरुः स्मृतः ॥१६॥ यथा शिवस्तथा विद्या यथा विद्या तथा गुरुः ॥ शिवविद्यागुरूणां च पूजया सदृशं फलम् ॥१७॥ एषां चतुर्णां वर्णानां गृहस्थानां च योषिताम् ॥ गुरुर्गृहस्थ एव स्यान्न कदाचिद्यतिर्गुरुः ॥१८॥ अयमेव यतीनां स्याद्यतिर्गुरुरथापि वा ॥ यथाहं सर्वलोकानां गुरुरंबिकया सह ॥१९॥ तस्मादयं समस्तानां गुरुराश्रमिणामज ॥ अनेन याः प्रतिष्ठाद्याः क्रियाः स्युः सफलाः स्मृताः ॥२०॥ एक एव गुरुर्ब्रह्मन् भ्रातृभार्यात्मजन्मनाम् ॥ इत्थं तेषां च सर्वेषां यथाहं जगतां तथा ॥२१॥ हायनैरधि·

---

याच्या तळव्यांत सप्त समुद्र आहेत व त्याचे वरचे बाजूस आठ कुलपर्वत आहेत. (१२) छत्तीस तत्वें त्याचे पोटऱ्यांत राहतात. परमकारण गुरूचें स्मरण करावें व ध्यान करावें. (१३) गुरु व महादेव शंकर हे एकच होत अशा भावाचे लोक गुरुभक्तीनें तिन्ही लोकांत पूज्य होतात. (१४) शिवस्वरूपधारण करून नेहमीं पूजेचा स्वीकार करितो व गुरुरूप धारण करून प्राण्यांचे भवपाश तोडितो. (१५) ह्मणून पशुस्वामी जो शिव तो पशूंचा ह्मणजे प्राणिमात्रांचा स्वामी होय. पशुपाशांतून मुक्त होऊन गुरूच्या आज्ञेची अपेक्षा करीत असावें. (१६) कल्याणाची इच्छा करणाऱ्यानें त्रिकाल गुरुपूजा करावी गुरु ह्मणजे शिव व शिव ह्मणजे गुरु असे मानिलें आहे. (१७) जसा शिव तशीच विद्या व जशी विद्या तसा गुरु शिव विद्या व गुरु या तिघांच्या पूजेचें फल सारखेंच. (१८) चातुर्वर्ण्यामध्यें गृहस्थाश्रमी स्त्रीपुरुषांचा गुरु गृहस्थाश्रमीच असावा; यति कधींहि असूं नये. (१९) व यतींचा यतिच गुरु होय. व पार्वतीसह मी शिवशंकर सर्व लोकांचा गुरु आहें. (२०) हे ब्रह्मदेवा, ह्मणून हा सर्व आश्रम्यांचा गुरु होय. यानें ज्या प्रतिष्ठा वगैरे क्रिया त्याजकडून करविल्या असता त्या सफल होतात.(२१) हे ब्रह्मदेवा भाऊ, बायका व मुलें यांचा एकच गुरु असावा. जसा मी सर्व जगांचा गुरु आहें. (२२) मागें

को बालो गुरुराख्यातलक्षणैः ॥ समस्तैः सहितः सम्यग्यः स एव गु-रुर्भवेत् ॥ २२ ॥ वयसैव किमाधिक्यमाधिक्यं ज्ञानमेव हि ॥ तस्मात् ज्ञानाधिकं शिष्यो गुरुमेव समाश्रयेत् ॥ २३ ॥ शिष्यस्तु शिक्षणी-यत्वाद्गुरुर्गौरवकारणात् ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गुरुर्गौरवमाचरेत् ॥२४॥ द्विजातिर्वा च सच्छूद्रः स्वस्वोक्ताचारवान् शुचिः ॥ सत्यवाग्गु-रुभक्तश्च दंभाहंकारवर्जितः ॥ २५ ॥ रागद्वेषविनिर्मुक्तः शांतः सर्वजनप्रियः ॥ गुर्वाज्ञाचकितः सौम्यः शिष्य इत्यभिधीयते ॥ २६ ॥ उक्तलक्षणसंपन्नो यस्मिन्देशे गुरुः स्थितः ॥ तत्र शिष्यः स्वयं गत्वा प्रणमेद्दंडवद्गुरुम् ॥२७॥ ततः कुर्वीत शुश्रूषां सम्यगहरहर्गुरोः ॥ अब्दास्त्रयो वैकोऽब्दौ वा मासषट्कमथापि वा ॥२८॥ अथवा त्रिदश-श्रेष्ठ गुरुर्यावत्प्रसीदति ॥ तावच्छुश्रूषयेच्छिष्यो हृद्वाक्कायक्रियाधनैः ॥२९॥ मनस्यनारतं सम्यग्गुरोराकारचिंतनम् ॥ शुश्रूषोपायचिंता च हृच्छुश्रूषेत्युदाहृता ॥३०॥ देव किं कर्म कर्तव्यं तथैवेत्युत्तरं पुनः ॥ एवमादिक्रियोक्तिश्च सा वाक्छुश्रूषिका स्मृता ॥३१॥ समीपे वातिदूरे

---

सांगितलेल्या सर्व लक्षणांनीं योग्य प्रकारें युक्त असाच केवल गुरु होय, मग तो वृद्ध असो वा तरुण असो. (२३) वयानें महत्व येत नाहीं तर ज्ञानानेंच म-हत्व येतें ह्मणून जो ज्ञानानें वरिष्ठ आहे तोच शिष्यानें गुरु करावा. (२४) गुरु शिष्यास ज्ञानदान करीत असल्यामुळें व शिष्यास गुरु सन्माननीय असल्यामुळें शिष्यानें गुरूचा सन्मान करावा. (२५) शिष्यानें आपल्या वर्णास सांगितलेले आ-चार आचरण करावेत, मग तो द्विजाति असो वा शूद्र असो. त्यानें पवित्र, सत्य-भाषणी गुरुभक्त असें असावें व त्याचे ठिकाणीं गर्व व अहंभाव नसावा. (२६) त्यानें इच्छाद्वेषरहित असावें, शांत व सर्व जनांना आवडतें असावें; व गुरूचे आज्ञेविषयीं तत्पर व सुशील असावें. या सर्व लक्षणांनीं जो युक्त त्यास शिष्य ह्म-णतात. (२७) वर सांगितलेल्या लक्षणांनीं मंडित असा गुरु जेथें असेल तेथें शि-ष्यानें स्वतः जाऊन गुरूस साष्टांग नमस्कार घालावा. (२८) व नंतर प्रत्यहीं गु-रूची योग्य सेवा करावी; ती सेवा तीन वर्षें किंवा एक वर्ष किंवा सहा महिने (२९) किंवा हे देवेंद्रा गुरु प्रसन्न होईपर्यंत मनानें, वाणीनें, शरीरानें व धनानें करावी. (३०) गुरुस्वरूपाचें मनांत सतत ध्यान करणें व कोणत्या उपायानें गुरू-ची सेवा करावी असें चिंतन करणें यास हृच्छुश्रूषा असें ह्मणतात. (३१) गुरुम-हाराज काय आज्ञा आहे असें विचारून नंतर आज्ञानुसार कर्म करणें यास वा-क्छुश्रूषा असें ह्मणतात. (३२) आपल्या बायकामुलांसहवर्तमान समीप वा दूर अ-

वा स्वशरीरनिवेदनम् ॥ गत्यागत्यादिका या सा स्वभार्यानंदनैस्तथा ॥३२॥ प्रदक्षिणनमस्कारं सम्यक्पादाब्जसेवनम् ॥ पयसाज्येन दध्ना वा शुद्धेनांघ्रिप्रलेपनम् ॥ ३३ ॥ ततः श्लक्ष्णैर्मुद्गचूर्णैश्चोष्णेन सलिलेन च ॥ प्रक्षाल्याथ च वस्त्रेण तथार्द्रत्वप्रमार्जनम् ॥३४॥ शय्यासंस्तरणं सम्यक्केशसंमार्जनं नखैः ॥ तैलाभ्यंगक्रिया चाथ स्नानकर्म यथा शुभम् ॥३५॥ श्रीखंडं घर्षणं पुष्पमालिका चारुचंदनम् ॥ शौचार्थं मृज्जलानीति तत्र योग्यप्रदेशनम् ॥३६॥ पूजास्थानानुलेपं च गोमयेन सवारिणा ॥ पूजापुष्पजलानीति तत्र योग्यप्रदेशनम् ॥३७॥ एवमादीनि चान्यानि गृहकर्माणि यानि वै ॥ तेषामहरहः कर्म कायशुश्रूषिका स्मृता ॥ ३८ ॥ धान्यस्वर्णपशुक्षेत्रदासीदासांबराणि च ॥ पर्यंकभूषणापात्रत्रिपादिचषकादयः ॥ ३९ ॥ चंदनाद्यनुलेपोक्तद्रव्याणि सुरभीणि च ॥ केशानुलेपद्रव्याणि कस्तूर्यादीनि यानि च ॥४०॥ तुरंगमगजांदोलस्यंदनानि शुभानि च ॥ तेषां प्रदानं सद्भक्तथा धनशुश्रूषिका स्मृता ॥४१॥ द्रव्यसामर्थ्यसंपन्नो यः कश्चिच्छिष्यकः सदा ॥ सर्वशु-

---

सलेल्या गुरूकडे जाऊन येंऊन आत्मशरीर निवेदन करणें; (३२) त्यास प्रदक्षिणा घालणें नमस्कार करणें, त्याच्या चरणकमलाची योग्य सेवा करणें शुद्ध दुधानें तुपानें वा दह्यानें त्याच्या आंगठ्यांस लेप करणें, (३४) नंतर बारीक मुगाच्या पिठानें व ऊनपाण्यानें धुवून नंतर वस्त्रानें पाणी टिपणें, (३५) बिछाना घालणें, योग्य रीतीनें श्रमपरिहार करणें, नखांनीं तैलाभ्यंग करणें, शुभदायक स्नान घालणें, (३६) गंध उगाळणें, फुलें, माळा, सुंदर चंदन, शुद्धि करण्याकरितां मृत्तिका व पाणी आणून देणें. योग्य वसतिस्थान दाखविणें. (३७) पूजेची जागा शेणपाण्यानें सारवणें. पूजेला फुलें, पाणी योग्य ठिकाणीं आणून ठेवणें. (३८) अशीं किंवा अशाच प्रकारचीं दुसरीं गृहकृत्यें प्रत्यहीं करणें यास शारीरसेवा असें ह्मणतात. (३९) धान्य, सुवर्ण, पशु, शेत, दासी, दास, वस्त्रें, पलंग, दुसरीं भूषणें, आडणी ( त्रिपादि ), गिंड्या वगैरे (४०) तसेंच चंदनासारखीं अंगास लावण्याचीं सुगंधि द्रव्यें, तशींच केशांस लावण्याची कस्तूरी वगैरे सुगंधि तैलें,(४१) घोडे, हत्ती, पालखी, रथ व शुभवस्तु—हीं गुरूला सद्भावानें अर्पण करणें यास धनसेवा असें ह्मणतात. (४२) जो शिष्य श्रीमान् व सदृढ असेल त्यानें आपल्या

श्रूषिकां कुर्यात् स्वगुरोरेव भक्तितः ॥४२॥ शुश्रूषां कायकीमेकां विना नास्ति त्रिधा सदा ॥ कुर्यान्नृपोऽन्याः शुश्रूषाः सर्वाः कुर्युः स्त्रियो भृशम् ॥४३॥ हीनवत्यपि ये जाता भक्ताश्चेदीश्वरे यदि ॥ तेऽपि स्वयोग्यशुश्रूषां कुर्युरिष्टार्थसिद्धये ॥४४॥ आनीय भूपतिर्भक्तया गुरुं देशांतरे स्थितम् ॥ स्वस्थाने स्थाप्य शुश्रूषां त्रिविधां कारयेत् सदा ॥४५॥ गुरोः प्रियाणि द्रव्याणि यानि कानि चिदन्वहम् ॥ तानि भक्त्या प्रदेयानि शिष्येण सुलभानि च ॥४६॥ गुरुं दिदृक्षुर्यः शिष्यः सद्भक्त्यानुदिनं सदा ॥ रिक्तपाणिर्न तं पश्येद्यथा राजा तथा गुरुः ॥४७॥ फलं प्रसूनं तांबूलमन्यत्किमपि वस्तु च ॥ एष्वेकं गुरवे दत्त्वा नमस्कार्यस्ततो गुरुः ॥४८॥ गुरुं स्वगृहमायातं दृष्ट्वा भक्तिरतो नृपः॥गत्वोन्नतासनं चाथ दत्वासीत्तदनुज्ञया ॥४९॥ तांबूलमुत्तमं तस्मै ततः पात्रेण दापयेत्॥ पश्चादिष्टानि वस्तूनि दत्वा नत्वा विसर्जयेत् ॥५०॥ *संभोजयित्वा स्वगुरुं पश्चाद्भुंजीत बुद्धिमान् ॥ गुरोः पुरस्ताद्यो भुंक्ते गुरु

---

गुरूची भक्तिपुरस्सर सर्व प्रकारची सेवा करावी. (४३) शारीरिक सेवेवांचून तीन प्रकारची सेवा होत नाहीं. राजानें दुसऱ्या सेवा कराव्या व स्त्रियांनीं सर्व सेवा चांगल्या कराव्यात. (४४) हीन कुलांत उत्पन्न झालेले जे जन गुरुभक्त झाले असतील त्यांनींही आपला हेतु पूर्ण व्हावा ह्मणून आपल्या योग्यतेनुसार गुरुसेवा करावी. (४५) दूरदेशीं असलेल्या गुरूला राजानें भक्तिपुरःसर आणून त्यास आपले स्थानीं बसवून तीन प्रकारची सेवा करवावी. (४६) शिष्यानें गुरूस ज्या ज्या प्रिय वस्तु असतील त्या व सुलभ असतील त्या दररोज अर्पण कराव्यात. (४७) गुरूस भेटण्याची इच्छा करणाऱ्या शिष्यानें नेहमीं त्याजकडे रिकाम्या हातानें जाऊन पाहूं नये. कारण जसा राजा तसा गुरु हें लक्षांत असावें. (४८) फल, पुष्प, तांबूल किंवा दुसरी कोणतीही वस्तु एकेक गुरूला अर्पण करून नंतर त्यास नमस्कार करावा. (४९) भक्तिमान् राजानें गुरूला आपले घरीं येतांना पाहिलें असतां त्यानें त्यास सामोरें जावें व उंच आसन द्यावें व त्याचे आज्ञेनें आपण खालीं बसावें. (५०) उत्तम तांबूल पात्रांत ठेऊन ते त्यास देववावें. नंतर त्यास इष्ट वस्तु देऊन त्याची बोळवण करावी. (५१) बुद्धिमानानें आपल्या गुरूस भोजन घालून

---

*भोगार्थे यां स्त्रियं मोहाद्गुरुर्यद्यभिवांच्छति ॥
भक्त्या तेन गता सा चेत्सर्वपापैः प्रमुच्यते ॥ १ ॥

द्रोही स उच्यते ॥५१॥ शिष्येण भोजनात्पूर्वं न भोक्तव्यं कदाचन ॥ भोजनानंतरेऽश्नीयात् स्वगुरोर्यः स पुण्यभाक् ॥५२॥ यानि भक्ष्याणि नव्यानि कन्दमूलफलानि च ॥ अपूर्वाण्युपदंशानि गुरोः पूर्वं न भक्षयेत् ॥५३॥ यो भक्त्या स्वगुरोर्भुक्तं शिष्यः पात्रेऽन्नमुज्झितं ॥ भुङ्क्ते स सर्वदुरितैर्मुच्यते नात्र संशयः॥ ५४ ॥ प्रदत्तं यत्स्वगुरुणा तांबूलं परिचर्वितं ॥ शिष्यस्तद्भक्षयेद्भक्त्या शुध्दांतःकरणो भवेत् ॥५५॥ स्वाचार्यचरणद्वंद्वप्रक्षालितजलं सदा ॥ यः पिबेध्दारयेद्भक्त्या सर्वपापैः प्रमुच्यते ॥५६॥ शुभकार्येषु सर्वेषु विवाहादिषु भक्तितः ॥ गुरुमभ्यर्चयेच्छिष्यो वस्त्रहेमांगुलीयकः ॥५७॥ तत्रापि च सभापूजाविधेः पूर्वं गुरुं यजेत् ॥ ततः सभां यजेद्योग्यां क्रमेणैव यथा शुभं ॥५८॥ सभांतरे गुरुं धीमान् कदाचिदपि नार्चयेत् ॥ आसनस्थं विशुध्द्यांघ्रिं गंधपुष्पाक्षतैर्यजेत् ॥५९॥ ततोऽर्पयत् स्वगुरवे वस्त्रहेमांगुलीयकान् ॥ कार्तिकस्य चतुर्दश्यां विषुयुग्मेऽयनद्वये ॥६० ग्रहणे चार्चयेच्छिष्यो गुरुं वै मौक्तिकांशुकैः ॥ दरिद्रश्चेद्धि तष्वेषु निजशक्तिमवंचयन् ॥६१॥ अ-

---

मागून आपण जेवावें. गुरूच्या पूर्वी जो जेवतो तो गुरुद्रोही असें मानिलें आहे. (५२) जेवणाच्या पूर्वी शिष्यानें जेऊं नये, जो शिष्य आपल्या गुरूच्या जेवणानंतर जेवतो तो पुण्यवान् होय. (५३) कंदमूल फळें वगैरे जीं नवीं नवीं व अपूर्व तोंडीलावणीं असतील तीं गुरूच्या अगोदर कोणीहि खाऊं नयेत. (५४) जो शिष्य गुरूनें जेवून पात्रांत टाकिलेलें अन्न प्रीतीनें खातो तो सर्व पापांपासून निःसंशय मुक्त होतो. (५५) गुरूनें चाऊन दिलेला विडा शिष्यानें आवडीनें खावा ह्मणजे त्याचें अंतःकरण शुद्ध होतें. (५६) आपल्या आचार्यांचे दोन्ही पाय धुतलेलें पाणी जो सर्वकाल पितो व भक्तीनें धारण करितो तो सर्व पापांतून मुक्त होतो. (५७) विवाहाप्रमाणें सर्व शुभकार्यांत शिष्यानें गुरूस वस्त्रें व सुवर्णाच्या अंगठ्या देऊन भक्तीनें त्याची पूजा करावी. (५८) व तीहि सभापूजा करण्याचे पूर्वी करावी; नंतर क्रमवार योग्य सभासदांची पूजा करावी. (५९) बुद्धिमान् शिष्यानें सभेमध्यें गुरूची पूजा कधींहि करूं नये. ज्याचीं बोटें शुद्ध आहेत व ज्यास आसनावर बसविलें आहे अशा गुरूचें गंध, पुष्प, अक्षता यांनीं पूजन करावें.(६०) नंतर आपल्या गुरूला वस्त्रें व सोन्याच्या आंगठ्या द्याव्यात; कार्तिकी चतुर्दशीस, विषुयोगी, दोन्ही संक्रमणकालीं (६१) ग्रहणसमयीं शिष्यानें गुरूची मोत्यांनीं व वस्त्रांनीं पूजा करावी; दरिद्यानेंही याप्रसंगीं यथाशक्ति पूजन करावें. (६२) शि-

वश्यमर्चयेच्छिष्यो गुरुं लब्धधनेन वा ॥ दरिद्रश्चेत्स्वयं शिष्यः प्रति- संवत्सरं यजेत् ॥६२॥ वासः प्रावरणे दद्यादवश्यं नेत्रवल्लभं ॥ चंदनं चाक्षतं पुष्पं स्वर्णं तांबूलमंबरं ॥६३॥ पात्रे निधाय गुरवे शिष्यो द- द्यान्न पाणिना ॥ न्यायार्जितं स्थितं स्वर्णमुख्यं यद्व्यवहारतः ॥६४॥ त- देव देयं गुरवे देयं धामापि यद्वरं ॥ यन्नूनं व्यवहारे तु तच्च स्वर्णं कदा- चन ॥६५॥ न दद्याद्गुरवे दानं मनुष्यः फलवांछकः ॥ नूतनं सदृढं स्नि- ग्धं धवलं नेत्रवल्लभं ॥६६॥ दद्यादाच्छादनं भक्त्या गुरवे सर्वदा बुधः ॥ विशीर्णं तृटितं दग्धं प्राक्तनं स्वधृतं पुरा ॥ ६७ ॥ दष्टमाखवादिभि- र्वस्त्रं न दद्याद्गुरवे बुधः ॥ परुषं दुष्क्रियायुक्तं नीलसूत्रविनिर्मितं ॥६८॥ पट्टवस्त्रेतरं वस्त्रं विरलं न प्रदापयेत् ॥ पट्टदेवांगचीनानि वासां- स्यन्यानि यानि च ॥६९॥ चित्राणि दद्यान्नृपतिरितरो वा धनाधिपः॥ अपूर्वं पेशलं वासो वस्त्वन्यत्सुमनानि च ॥७०॥ स्वगुरोः पुरतः शि- ष्यो न कदाचित्स्वयं हरेत् ॥ यदि रिक्तो गुरुः शिष्यः समृद्धः स्यात्स- हायतां ॥७१॥ यथाशक्ति गुरोः शिष्यः प्रकुर्वीतासनादिकं ॥ गुरुं भ-

---

ष्यानें मिळालेल्या धनानें गुरूचें अवश्य पूजन करावें व शिष्य दरिद्री असेल तर त्यानें वर्षांतून एकदां तरी पूजन करावें. (६३) डोळयांस चांगलें दिसणारें वस्त्र अंगावर घेण्यास द्यावें. चंदन, अक्षता, पुष्प, तांबूल, सुवर्ण (६४) वस्त्र हीं पा- त्रांत ठेवून द्यावीत हातानें देऊं नयेत. न्यायानें व्यवहारांत मिळविलेलें सुवर्णा- दि द्रव्य (६५–६६) उत्तम घर देखील गुरूला द्यावें, व व्यवहारामध्यें जें कमी किंमतीचें असेल तें सुवर्ण गुरूला फल इच्छिणाऱ्या शिष्यानें कधींहि दान देऊं नये. नवीन, घट्टमूट, नरम पांढरें, दिसण्यांत चांगलें असें, (६७) आच्छादनास वस्त्र जाणत्या शिष्यानें गुरूला द्यावें; फाटकें तुटकें, जळालेलें, जुनें, आपण वाप- रलेलें (६८) उंदरांनीं वगैरे खाल्लेलें वस्त्र जाणत्यानें गुरूला देऊं नये. खरबरीत वाईट कर्मानें युक्त, निळयासूताचें केलेलें (६९) विरविरीत, पट्टवस्त्राहून दुसरें वस्त्र गुरूला कधींहि देऊं नये. पट्टदेवांग वगैरे जीं दुसरीं रेशमी वस्त्रें (७०) तीं चित्र- विचित्र वस्त्रें सावकारानें गुरूस द्यावींत. अत्युत्तम, वारीक वस्त्र, वा दुसरी वस्तु, आणि फुलें (७१) आपल्या गुरूच्या पुढें शिष्यानें धारण करूं नयेत. जर शिष्य गरीब असेल व गुरु समृद्ध असेल तर त्यानें त्याला सहाय्य करावें. (७२) शिष्यानें यथाशक्ति गुरूला आसनादिक द्यावें व गुरूला पाहतांच भक्तीनें नमस्कार करावा.

क्त्या नमस्कुर्याद्दर्शने परमे सदा ॥ ७२ ॥ संनिधानं विना शंभोरन्यत्रांबुरुहासनः ॥ मातापित्रोः स्वबन्धूनां ब्राह्मणानां तपस्विनां ॥ ७३ ॥ नमस्कारं न कुर्वीत शिष्यः स्वगुरुसंनिधौ ॥ गुर्वीश्वराग्रे योऽज्ञानात् ज्ञानाद्वा प्रणमेदिमान् ॥७४॥ स पापात्मा पतत्येव नरकेऽमीभिरन्वितः॥ श्रीमानपि तपोवेषी शास्त्रज्ञः कुलशौचवान् ॥ ७५ ॥ कृत्वा दंडनमस्कारं निर्लज्जो गुरुसंनिधौ ॥ गुरोः पत्नी गुरोर्भ्राता गुरोः पुत्रा गुरोः समाः ॥७६॥ गुरुः पिता गुरुर्माता गुरुर्देवः स्वयं शिवः॥अग्रजावरजापत्यज्येष्ठश्रेष्ठतदंगनाः ॥७७॥ भार्या गुरोश्च वंद्याः स्युरल्पसंवत्सरा अपि ॥७८॥ तद्योषाश्च नमस्कार्याः सदाल्पवत्सरा अपि ॥ आराध्यकुलशास्त्राणि पूज्यानि स्थानकानि च ॥७९॥ निकेतने च त्रिः पूर्वं प्रणम्य परिकीर्तयेत् ॥ दूरतोऽपि गुरुं दृष्ट्वा उदासीनोऽपि यो व्रजेत् ॥८०॥ श्वानयोनिशतं गत्वा भवेच्चंडालवेश्मनि ॥ ज्येष्ठा यदि क्षत्रियाद्या न वंद्याः स्युर्द्विजोत्तमैः ॥८१॥ तथैव वैश्यैः शूद्राश्च जात्यनुक्रमशः स्मृताः ॥ स्वजातेः श्रेष्ठजातौ च ज्येष्ठः स्यान्नियमो भवेत् ॥८२॥ स्व-

---

(७३) हे चतुरानन शंकरसांनिध्यावांचून अन्यत्र गुरुसमक्ष शिष्यानें आईबापांना आपल्या बांधवांना, ब्राह्मणांना, तपस्व्यांना, (७४) नमस्कार करूं नये. गुरु अगर शंकर यां समक्ष जो अज्ञानानें वा ज्ञानानें यांना नमस्कार करील. (७५) तो पापात्मा त्यांसह नरकांत पडतो. शिष्य श्रीमान तपोवेष धारण करणारा, शास्त्र जाणणारा, कुलीन, शुचि असला तरी (७६) त्यानें न लाजतां गुरुसंनिध नमस्कार घालावा. गुरूची बायको गुरूचा भाऊ, गुरूचे पुत्र हीं गुरुसमान होत. (७७) गुरु हाच बाप, गुरु हीच आई व गुरुच साक्षात् शिव होय. गुरूचे वडील भाऊ, धाकटे भाऊ, गुरूचीं मुलें, गुरूच्या घरच्या श्रेष्ठ स्त्रिया, (७८) व गुरूच्या बायका वयानें लहान असतांही शिष्यास वंद्य होत. (७९) गुरूच्या स्त्रिया वयानें लहान असतांही नमस्कारास योग्य होत. आपल्या पूज्य अशा मतशास्त्रांचें आराधन करून (८०) व घरांत गुरूस तीनवार नमस्कार करून त्याची स्तुति करावी. गुरूला दुरून पाहिलें असतांही जो अनादरानें चालता होईल.(८१) तो शंभर वेळां कुत्र्याचा जन्म पावेल व चांडालाच्या घरीं वास करील. क्षत्रिय वगैरे वर्णांतील लोक वयानें थोर असतांहीं ब्राह्मणाला ते वंद्य नाहींत. (८२) त्याचप्रमाणें वैश्यास शूद्र वंद्य नाहींत असें जात्यानुक्रमानें मानिलें आहे. श्रेष्ठ जातींतील मनुष्य स्वजातीपेक्षां श्रेष्ठ होय असा नियम आहे. (८३-८४) स्वजातीपेक्षां हीनजातींतील

जातेर्हीनजातौ तु ज्येष्ठस्यापि कनिष्ठता ॥ उपचारेषु सर्वेषु द्वावेवात्यं-तशोभनौ ॥८३॥ प्रियवाक् च प्रणामश्च तौ विनान्ये वृथा स्मृताः ॥ प्रथमं द्वारमारभ्य द्वारावधि परिक्रमात् ॥ ८४ ॥ प्रदक्षिणाविधौ धीमान् न तु दीर्घपदं न्यसेत् ॥ न गच्छेत्त्वरितं जल्पन्नितरैर्मानुषैः सह ॥८५॥ छायां न लंघयेदंते शिवधाम्नः सुबुद्धिमान् ॥ पदे पदांतरं न्यस्तं करौ चलनवर्जितौ ॥८६॥ स्तुतिर्वाचा हृदि ध्यानं चतुरंगं प्रदक्षिणं ॥ एवं शिष्यश्चतुर्भक्त्या सह कुर्यात्परिक्रमं ॥ ८७ ॥ गुरुं शिवं प्रतिपदं सोऽश्वमेधफलं लभेत् ॥ स्वामिभट्टारकाचार्यदेवश्रीगुरुनामभिः ॥८८॥ ब्रूयात्सदा गुरुं शिष्यो जातुचिन्नान्यनामभिः ॥ त्वं शब्दं न प्रयुंजीत गु-रौ शिष्यः कदाचन ॥८९॥ आज्ञां न लंघयेत्तस्य समं नोपविशेत्तथा ॥ समस्तदेवतावासं सर्वमंत्रास्पदं गुरुम् ॥९०॥ उपेक्षते स पापात्मा यः शिष्यो रौरवं व्रजेत् ॥ हृदि नायं ममाचार्य इत्युपेक्षां करोति चेत् ॥९१॥ मयि भक्तिर्वृथा तस्य तथैव च समर्चनम् ॥ स्वगुरोः पुरतः

---

पुरुष वयानें थोर असला तरी तो कनिष्ठच समजावा. सर्व उपचारांमध्यें प्रियभा-षण व नमस्कार करणें हे दोन उपचार अत्यंत शोभादायक आहेत यांशिवाय बाकीचे सर्व व्यर्थ असें मानिलें आहे. पहिल्या दारापासून आरंभ करून शेवटच्या द्वारापर्यंत क्रमानें (८५) बुद्धिमान् मनुष्यानें प्रदक्षिणा करीत असतां लांब पाऊल टाकूं नये, जलद चालूं नये; किंवा दुसऱ्या मनुष्यांशीं बोलूं नये (८६) चांगल्या बुद्धिमान् मनुष्यानें शिवालयाची छाया ओलांडूं नये. पावलावर पाऊल टाकीत, हात न हालवितां (८७) तोंडानें देवाची स्तुति करीत, हृदयांत ध्यान करीत च-तुरंग प्रदक्षिणा शिष्यानें चार प्रकारच्या भक्तीनें युक्त होऊन करावी. (८८) या-प्रमाणें गुरूला व शिवाला जो प्रदक्षिणा करितो त्यास प्रतिपावलास अश्वमेध य-ज्ञाचें फल मिळतें. स्वामि, भट्टारक, आचार्य, देव, श्रीगुरु या नांवांनीं (८९) शि-ष्यानें गुरूस संबोधावें. दुसऱ्या कोणत्याही नांवानीं कधींही संबोधूं नये. शिष्यानें गुरूसंबंधीं "तूं" या पदाचा कधींही उपयोग करूं नये. (९०) त्याची आज्ञा उल्लंघूं नये. त्याजबरोबर बसूं नये. सर्व देवतांचें वसतिस्थान गुरु होय व गुरु सर्व मंत्रांचें स्थान होय. (९१) हा माझा आचार्य नाहीं असें मनांत जो उपेक्षापूर्वक वागवितो तो पापी शिष्य नरकाला जातो, (९२) माझ्या ठिकाणची त्याची भक्ति तसेंच त्याचें पूजन हीं व्यर्थ होत. आपल्या गुरूच्या पुढें शिष्यानें दुसऱ्या पुरुषाचें

शिष्यो नेतरान् कीर्तयेन्नरान् ॥९२॥ असह्यभावं न वदेन्न वदेदितरेतरम् ॥ स्वमातृपितृभार्यासु भ्रातृबंधुसुतेषु च ॥९३॥ ये गुरुद्वेषिणः शिष्याः प्रणेयांस्तान् परित्यजेत्॥ सन्मानं गुरुभाषां च गुरौ शिष्यो यइच्छति ॥९४॥ स महापातकी ज्ञेयः पतत्येव स दुर्गतौ ॥ यस्मात्कस्माद्गुरुः शिष्यं यदि विद्वेषकारकः ॥९५॥ शुश्रूषयेत्स्वयं शिष्यः सद्भक्त्या पूर्ववत्सदा ॥ यो गुरुं सर्वदा स्तौति तदिष्टं तस्य यच्छति॥९६॥ करोति स्नेहिभिः स्नेहं सदैव मुनिना समः ॥ गुरुं निंदति यः शिष्यो द्रव्यं हरति तस्य च ॥९७॥ करोति द्वेषिभिः स्नेहं स चांडाल समः स्मृतः॥ जुगुप्सितस्य चार्थस्य रोः शिष्योऽतियत्नतः ॥९८॥ अहेयबुध्या यः कुर्याच्छुश्रूषामालभेत सः ॥ गच्छन् तिष्ठन् स्वपन् भुंजन् यद्यत्कर्म समारभेत् ॥९९॥ समक्षं वा परोक्षं वा कर्तव्यं गुर्वनुज्ञया॥ रुगेहे समक्षं वा न यथेष्टासनो भवेत् ॥१००॥ गुरुर्देवो यतः साक्षात्तद्गेहे शिवमंदिरे ॥ आसनं वाहनं वस्त्रं भूषणं शयनं तथा ॥१०१॥ न

---

गुणानुवर्णन करूं नये. (९३) गुरूस असह्य असें कधींही भाषण करूं नये, अथवा दुसऱ्याशीं गुरूसमक्ष परस्पर भाषण करूं नये. आपली आई, बाप, बायको, भाऊ, संबंधी, मुलगा यांत (९४) गुरुद्वेष करणारे जे शिष्य असतील ते प्रियकर असले तरी त्यांचा त्याग करावा. गुरूच्या ठिकाणीं मान अथवा गुरूकडून आपला भाषणगौरव व्हावा अशी जो शिष्य इच्छा करितो (९५) तो महापातकी जाणावा; तो दुर्गतीला जातो. कोणा एकाद्या कारणानें गुरु शिष्याचा द्वेष करूं लागला तर (९६) शिष्यानें स्वतः पूर्वीप्रमाणें चांगल्या भक्तिभावानें त्याची चाकरी करावी. जो शिष्य गुरूची नेहमीं स्तुति करितो व त्यास आवडती वस्तु देतो व (९७) गुरूच्या स्नेह्यांशीं स्नेह करितो तो नेहमीं मुनिसारखा होय. जो शिष्य गुरूची निंदा करितो व त्याचें द्रव्य हरण करितो (९८) व त्याच्या शत्रूशीं स्नेह करितो तो चांडालासम होय असें मानिलें आहे. गुरूसंबंधी कोणत्याहि निंदित पदार्थाची मोठ्या यत्नानें (९९) त्यागबुद्धि मनांत न आणतां शुश्रूषा करावी व तसें केलें असतां त्या शिष्यास सुखप्राप्ति होते. जाणें, उभे रहाणें, निजणें, जेवणें, जें काय करणें तें (१००) मग तें परोक्ष असो वा अपरोक्ष असो गुरूच्या आज्ञेनें करावें. गुरुगृहीं गुरूसमोर आसनावर बसूं नये. (१०१) कारण गुरु साक्षात् शिव शंकर होय; त्याचें घर ह्मणजे शिवमंदिर होय. आसन वाहन (घोडें, गाडी वगैरे) वस्त्र अलंकार, बिछाना, (१०२) हीं ज्या शिष्यास गति ( मोक्ष प्राप्ति ) व्हावी

कुर्याद्गुरुसादृश्यं गतिसिद्धेरपेक्षकः ॥ शिष्यो गुरुस्थितग्रामे प्रविश-न्वाहनादिकम् ॥१०२॥ वर्जयेद्देहसामीप्ये तथा वै पादुकानि च ॥ नानृतं नाप्रियं वाक्यं न गुह्यं चापि भाषयेत् ॥१०३॥ नापृष्टो नामुखे ब्रूयाद्गुरोरग्रे कदाचन ॥ नोपतिष्ठो भवेदूर्ध्वं नोर्ध्वस्थानं विशेद्गुरोः॥१०४ पश्चात्पादेन निर्गच्छेन्नमस्कृत्याग्रतो गुरोः ॥ दीक्षाव्याख्याप्रमत्तादि गुरोरग्रे विसर्जयेत् ॥१०५॥ अतिहास्यमवष्टंभलीलामंघ्रिप्रसारणम् ॥ विनोदोज्वलवेषं च पर्यंकं दंतधावनम् ॥१०६॥ पर्वस्फोटविकारं च पादप्रक्षालनं तथा ॥ तद्वाक्यप्रतिकूलं च न कुर्याद्गुरुसंनिधौ ॥१०७॥ पात्रस्नानजलछायामाल्योपकरणानि च ॥ भक्तिहीनः स्वपादाभ्यां न स्पृशेन्नैव लंघयेत् ॥१०८॥ पादुकासनशय्यादि गुरुणा यद्यधिष्ठितं॥ नमस्कुर्वीत तत्सर्वं पादाभ्यां न स्पृशेत्क्वचित् ॥१०९॥ देहलीं गेषणीं चुल्लीं तर्जनीं खंडनीमपि ॥ वर्धिनीं दीपकं शूर्पं खट्वामपि घरट्टकं ॥११०॥ लेपनीं मुसलं चापि नैव पादेन संस्पृशेत् ॥ नोल्वणं धारयेद्वेषं नालंकारांश्च कर्हिचित् ॥१११॥ न कुर्यादाश्रमे तस्य ह्युपानत्परिसर्पणं॥ऊढा

---

अशी इच्छा आहे त्यानें गुरूसारखीं करूं नयेत; शिष्यानें गुरु असलेल्या गांवांत प्रवेश केल्याबरोबर वाहन वगैरे सर्व (१०२) सोडावें व गुरुगृहाजवळ आल्याबरोबर पादुकाही सोडाव्यात; खोटें, अप्रिय, गुह्य भाषण करूं नये. (१०४) विचारिल्यावांचून बोलूं नये व बोलणें झाल्यास गुरूपुढें राहून बोलूं नये. गुरूपेक्षां उच्चासनावर बसूं नये व गुरूपेक्षां उच्चस्थानीं जाऊं नये; (१०५) गुरूला नमस्कार करून तोंड न फिरवितां मागच्यामागें जावें. दीक्षा, व्याख्या, प्रमत्त भाषण वगैरे गुरूपुढें सोडून द्यावें. (१०६) अति हंसणें अवष्टंभ, खेळ, पाय लांब करणें, थट्टा, ऐटीचा पोशाख, पलंग, दांत घांसणें, (१०७) टिचक्या वाजविणें, पाय धुणें, प्रतिकूल भाषण हीं गुरुसंनिध करूं नयेत. (१०८) गुरूचें पात्र, स्नान जल, छाया, फुलें, त्याचीं उपकरणें यांस शिष्यानें भक्तिहीन होऊन पायानें स्पर्श करूं नये. किंवा तीं ओलांडूं नयेत. (१०९) पादुका, आसन, विछाना वगैरे ज्या ज्या वस्तूंचा गुरूनें स्वीकार केला असेल त्या सर्व वस्तूंस नमस्कार करावा. पायानें त्यांस कधीहि स्पर्श करू नये. (११०) गुरुगृहांतील उंबरा, गेषणी, चूल, तर्जनी, खंडनी, मडकीं, दिवा, सूप. खाट, जातें, (१११) लेपनी ( पोतेरें ), मुसळ यांस पायानें स्पर्श करू नये. भपक्याचा पोशाख धारण करू नये; अलंकार कधींहि घालूं नयेत. (११२) गुरूच्या आश्रमामध्यें जोडे आणूं नयेत. विवाहित, राखेली, प्रे-

धृता च प्रीता च मूल्येन च समाहृता ॥११२ ॥ सकृत्कामगता चापि पंचधा गुरुयोषितः ॥ वंद्या पूज्या ह्यलंघ्याश्च गुरुवद्गुरुशक्तयः ॥११३॥ न लिंगग्रहणं कुर्याद्बहिर्लिंगार्चनं नच ॥ दुःसंगं च दुरुक्तिं च दुःशीलं दुर्गुणं तथा ॥११४॥ दुर्वाक्यं दुश्चरित्रं च दूरेण परिवर्जयेत् ॥ स्वदेशे वान्यदेशे वा शिष्यो विंशतियोजनात् ॥ ११५ ॥ अभ्यंतरस्थं स्वगुरुं संपश्येत्प्रतिवत्सरं ॥ गुरुयात्रा देवयात्रा तीर्थयात्रेति च त्रिधा ॥११६॥ आसां त्रिविधयात्राणां गुरुयात्रा फलाधिका ॥ गुरुसंदर्शनार्थं यो भक्त्या यात्रां करोति सः ॥११७॥ पुण्यदेहीति विज्ञेयः समस्तागमवल्लभः ॥ यात्रां कर्तुमशक्तश्चेत् प्रियं द्रव्यं हि तस्य यत् ॥११८॥ तद्दत्वा स्वजनं तस्मै भक्त्या प्रहिणुयाद्बुधः ॥ आदिष्टो वा नवा शिष्यो दूरे वापि समीपतः ॥११९॥ स्थितः स्वस्वगुरोः प्रीतिं स्नेहेनैव समाचरेत् ॥ कार्यविज्ञापनार्थं यद्गुरूणां दूरवासिनां ॥१२०॥ पत्रलेखावृतेः संख्या षडित्यभिहिता बुधैः ॥ शिष्याणां ससमानां तु मित्राणां च महीभृतां ॥ १२१ ॥ देयाद्वित्रिचतुःपंच वृतिसंख्या यथाक्रमं ॥

---

मपात्र झालेली, विकत घेतलेली, (११३) एकवार संभोगिलेली; अशा पांच प्रकारच्या गुरुस्त्रिया शिष्यांस वंद्य, पूज्य व माननीय आहेत. कारण जसे गुरु सर्व प्रकारें सन्माननीय आहेत तशाच त्याच्या शक्तीहि आहेत. (११४) दुसऱ्याचें शिवलिंग धारण करूं नये व शिवलिंगाचें बाहेर पूजन करूं नये; वाईट संगति, वाईट भाषण, दुष्ट स्वभाव, दुर्गुण, (११५) दुराचरण हीं दुरूनच त्याग करावीत. आपल्या देशांत किंवा दुसऱ्या देशांत वीस योजनांपर्यंत असलेल्या (११६) गुरूची प्रत्येक वर्षी शिष्यानें भेट घ्यावी. यात्रा तीन प्रकारची आहे. गुरुयात्रा, देवयात्रा व तीर्थयात्रा. (११७) ह्या तीन प्रकारच्या यात्रांमध्यें गुरुयात्रा अधिक फलदायक आहे. गुरुभेटीकरितां जो भक्तीनें यात्रा करितो (११८) तो पुण्यदेही व सर्व आगमांस प्रिय असा मानिला जातो. जर कोणी यात्रा करण्यास अशक्त असेल तर त्यानें आपणांस जें द्रव्य प्रिय असेल (११९) तें आपल्या मनुष्याबरोबर देऊन त्या शहाण्या मनुष्यानें भक्तीनें त्यास आपल्या गुरूकडे पाठवावें. गुरूची आज्ञा असो वा नसो, शिष्य दूर असो वा जवळ असो, (१२०) शिष्यानें आपल्या गुरूला प्रिय असें आचरण करीत असावें. दूर असलेल्या गुरूंना कार्यविज्ञापना करण्याकरितां पाठवावयाचे (१२१) पत्रास सहा घड्या असाव्या असे विद्वानांचें मत आहे. शिष्यांना, समानांना, मित्रांना, राजांना (१२२) पाठवावयाच्य

तालपत्रं दृढं सौम्यमृजुः साग्रं द्विधाकृतं ॥१२२॥ मृदुलं तत्प्रशस्तं यद्यात्रालेखाविलेखने ॥ कर्कशं कल्मषं वक्रं हीनाग्रं स्फुटितं युगं ॥१२३॥ तालपत्रमशस्तं स्यात्पत्रलेखाविलेखने ॥ मात्राविसर्गानुस्वारैर्वर्णैः स्पष्टं यथा भवेत् ॥ १२४ ॥ तथैव लेखां विलिखेच्छिद्याद्वर्णं न जातुचित् ॥ संदिग्धं छिन्नवर्णं च प्रशस्तेतरभाषणं ॥१२५॥ न कदाचिल्लिखेत्पत्रे स्वेनैवाभ्याशगं यदि ॥ प्रशस्तभाषासंयुक्तं विनयस्तुतिपूर्वकं ॥१२६॥ विज्ञापनीयं गुरवे यापयेदन्तिकं गुरोः ॥ यत्रोपविष्टः स्वगुरुः परितः पंचयोजनात् ॥ १२७ ॥ अंतर्न कारयेद्दीक्षां प्रतिष्ठाद्यखिलक्रियाः ॥ स्वगुर्वाज्ञां विना शिष्यो यः कुर्याच्छिष्यसंग्रहं ॥ यददृष्टं कृतं पूर्वं तत्सर्वं प्रविनश्यति ॥१२८॥ तथा भवेद्गुरुद्रोही स पापात्मा शिवस्य च ॥ शरीरांते महाघोरे नरके विवशेच्चिरं ॥१२९॥ योग्यमाद्यं गुरुं त्यक्त्वा शिष्यः क्षुद्रक्रियावहं ॥ गुरुं समाश्रयेदन्यं यः प्रयाति स दुर्गतिम् ॥ १३० ॥ मारणोच्चाटने द्वेषमोहनं स्तंभनं तथा ॥ द्वेषणाकर्षणे चैतत् षट्कं क्षुद्रमिति स्मृतम् ॥१३१॥ ज्वरादिसर्वरोगाणां मन्त्रतन्त्रप्रतिक्रियाः ॥ भूतप्रेतपिशाचानां क्षुद्राः स्युर्ब्रह्मरक्षसां

---

पत्रांस अनुक्रमें दोन, तीन, चार, पांच घड्या असाव्यात. जें ताडपत्र बळकट, नरम, सरळ, साग्र, व दुप्पट केलेलें (१२३) व मृदु असेल तें पत्राचा लेख लिहिण्यास योग्य होय. कडकडीत, मलीन, वांकडें, टोंक नसलेलें, फाटलेलें (१२४) तें पत्र लेख लिहिण्यास अयोग्य होय. मात्रा, विसर्ग, अनुस्वार, व अक्षरें ज्यांत स्पष्ट आहेत. (१२५) असें पत्र असावें. अक्षरें कधींही गाळूं नयेत. संदिग्ध, अक्षरें गाळलेलें, योग्य भाषण नसलेलें (१२६) पत्र कधींही लिहूं नये. ज्यांत पोक्त भाषा, विनय, स्तुति व प्रार्थना हीं आहेत. (१२७) असें पत्र गुरूकडे पाठवावें. आपल्या स्थलापासून सभोंवार पांच योजनांच्या अंतरांत गुरु असल्यास (१२८) दीक्षा प्रतिष्ठादि सर्व क्रिया गुरूवांचून शिष्यानें करवूं नयेत. गुरूच्या आज्ञेवांचून जो शिष्य शिष्यसमूह जमवील त्याचें पूर्वीचें केलेलें सर्व अदृष्ट नाश पावेल. (१२९) तो पापात्मा शिष्य गुरुद्रोही व शिवद्रोही होऊन मरणानंतर मोठ्या भयंकर नरकामध्यें सर्वदा वास्तव्य करील. (१३०) पूर्वीचा योग्य गुरु टाकून जो शिष्य क्षुद्रक्रिया करणाऱ्या दुसऱ्या गुरूचा आश्रय करील तो दुर्गतीला जाईल. (१३१) मारण, उच्चाटण, द्वेष, मोहन, स्तंभन, द्वेषाकर्षण, हीं सहा क्षुद्रकर्में मानिलीं आहेत. (१३२) ज्वर वगैरे सर्व रोगसंबंधी मंत्र, तंत्र, प्रतिक्रिया, भूत, प्रेत,

॥१३२॥ नाचरेत्क्षुद्रकर्माणि गुरुः श्रेष्ठः कदाचन ॥ मिथ्या गुरुः स शिष्याणां विहीनगुरुलक्षणः ॥१३३॥ किमप्यपेक्षया दीक्षां कुर्वाणो याति रौरवं ॥ लिंगिनां शिवविप्राणां किं तत्कर्तव्यमुच्यते ॥ गुरौ शरीरं संत्यज्य परलोकं गते सति ॥१३४॥ कार्या परा या शुश्रूषा शिष्येण स्वाभिवृध्द्यर्थे ॥ गुरोः प्रयाणसमये शिष्याः पार्श्वे तु संस्थिताः॥१३५॥ तदा केशान् वपेयुस्ते श्रुत्वा दूरे स्थितास्तथा ॥ तथा तस्य सुतैः सार्धं प्रकुर्युस्तर्पणादिकं ( केशवपनं तर्पणादिकं विना लिंगिविप्राणामन्यत्सर्वं समम् ) ॥१३६॥ ततः पृथक् पृथक् पूजां प्रकुर्युः शंकरस्य च ॥ सद्भक्त्या गुरुसंप्रीत्यै समृध्दो विभवैः सह ॥१३७॥ समूहीकृत्य कुर्वीरन्नेकस्मिन्दिवसे धनं ॥ ततः प्रतिसमं शिष्या गुरुपर्वविधिं सदा ॥१३८॥ पृथक् पृथक् प्रकुर्वीरंस्तदर्थं तीर्थसेवनं ॥ यस्मिन्मासे तिथौ यस्यां मुमोच स्वतनुं गुरुः ॥१३९॥ तत्तीर्थं गुरुपर्वेति नामधेयं भविष्यति ॥ भक्तान् भक्त्या यथा शक्त्या शिष्यस्य गुरुपर्वणि॥१४०॥ भोजयेत्परमान्नेन घृतापूपोपदंशकैः ॥ भक्ता एकादश श्रेष्ठं दश मध्यं

---

पिशाच, ब्रह्मराक्षस (१३३) यांसंबंधीं सर्व क्रिया क्षुद्र मानिल्या आहेत. श्रेष्ठ गुरूनें क्षुद्रकर्में कधींही आचरण करूं नयेत. गुरुलक्षणहीन जो गुरु तो शिष्यांचा खोटा गुरु होय. (१३४) द्रव्यादि अपेक्षा धरून जो गुरु दीक्षा करितो तो रौरव नरकाला जातो. गुरु मरण पावला असतां लिंगधारण करणाऱ्या शैव ब्राह्मणांचें कोणतें कर्तव्य ह्मणून सांगितलें आहे.–(१३५) आपल्या उत्कर्षाकरितां शिष्यानें जी क्रिया करावयाची ती ही कीं, गुरु मरणकालीं जवळ असलेल्या सर्व शिष्यांनीं (१३६) केशवपन करावें. त्याचप्रमाणें दूर असलेल्यांनींही गुरुकाल झालेल्याचें ऐकून वपन करावें. तसेंच त्याच्या मुलांसहवर्तमान तर्पण वगैरे करावें ( केशवपन, तर्पणादिकांशिवाय बाकी सर्व क्रिया लिंगिब्राह्मणास इतरांसारख्या ). (१३७) नंतर सर्वांनीं शंकराची वेगळाली पूजा करावी. ती पूजा चांगल्या भक्तीनें गुरुप्रीत्यर्थ करावी. श्रीमंतानें ऐश्वर्यानें पूजन करावें. (१३८) सर्वांनीं एकत्र धनसंग्रह करून एके दिवशीं गुरुतिथी पाळावी. ज्या महिन्यांत ज्या तिथीस गुरूचा काल झाला असेल (१३९) त्या दिवशीं त्या करितां तीर्थसेवन निरनिराळें करावें. ज्या महिन्यांत ज्या तिथीस गुरु मरण पावला (१४०) त्या दिवसास गुरुपर्व असें नांव आहे. शिष्यानें गुरुपर्वणीस यथाशक्ति भक्तीनें भक्तांस (१४१) घृत, अपूप, तोंडीलावणीं यांसह परमान्न भोजन घालावें. त्याप्रसंगीं अकरा भक्तांस भोजन घा-

नवाधमः ॥१४१॥ यथाशक्त्याथवा लाभे संभोज्या गुरुपर्वणि॥ शांताः सच्छीलवन्तश्च श्रोत्रियाः शिवपूजकाः ॥ १४२॥ गुर्वर्थे भोजने योग्या एते वै नेतराः स्मृताः ॥ पूर्वरात्रौ द्विजानुक्तान् गत्वा तद्गृहकं प्रति ॥१४३॥ हस्तेषु दत्वा तांबूलं भक्त्या शिष्यो निमन्त्रयेत् ॥ कृतनित्यक्रियः शिष्यः कृतनित्याखिलांजनान् ॥१४४॥ निमन्त्रितांस्तानाहूय स्थापयेदासने दिने ॥ ततः शुद्धप्रदेशे तु गोमयालिप्तमण्डले ॥१४५॥ गंधपुष्पाक्षतैश्चैव षडंगैरपि पूजयेत् ॥ तिष्ठतः प्राङ्मुखस्यादावेकस्य चरणद्वये ॥१४६॥ गन्धाद्यंभोऽञ्जलिं दद्याद्भक्तस्य नियतात्मनः ॥ ततः प्रक्षालयेत्तद्वदन्यान् भक्तान् यथाक्रमात् ॥१४७॥ ततस्तु भोजनस्थाने शुभे चातिमनोहरे ॥ प्राङ्मुखान् स्थापयेदेतानासनेषु यथाक्रमम् ॥१४८॥ अथवोदङ्मुखान्वातु स्थापयेन्नान्यदिङ्मुखान् ॥ वस्त्रोर्मिकाभ्यां गन्धाद्यैः समृध्दः पूजयेत्ततः ॥१४९॥ असमृध्दो यथाशक्ति भक्त्या सह समर्चयेत् ॥ पायसापूपसर्पिर्भिर्दध्यन्नाद्युपदंशकैः ॥ १५० ॥ अखंडैर्भोजयेद्विप्रान्यथापूर्वं यथा तथा ॥ ततस्तांबूलकं दत्वा यथाश-

---

लणें उत्तम, दहांस भोजन घालणें मध्यम व नवांस जेवण घालणें अधम असें मानिलें आहे. (१४२) अथवा मिळतील तितक्या शांत, सच्छीलवंत, श्रोत्रिय शिवपूजकांना यथाशक्ति भोजन घालावें. (१४३) वरील प्रकारचेच ब्राह्मण गुरुप्रीत्यर्थ भोजनास योग्य मानिले आहेत व याहून इतर भोजनास योग्य मानिले नाहींत. पूर्वरात्रीं पूर्वोक्त ब्राह्मणाचे घरीं जाऊन (१४४) त्यांचे हातांत विडा देऊन शिष्यानें भक्तिपूर्वक आमंत्रण द्यावें. आपलें आन्हिक झाल्यावर शिष्यानें ज्यांचें नित्यकर्म झालें आहे. (१४५) अशा सर्व आमंत्रण केलेल्या लोकांना बोलावून आणून शेणानें सारवलेल्या शुद्ध जागीं आसनावर बसवावें. (१४६) गंध, पुष्प, अक्षता वगैरेनीं षडंगपूजा करावी. पहिल्यांदा उत्तरेकडे तोंड करून बसलेल्या एकाच्या पायांवर (१४७) गंधादियुक्त ओंजळभर पाणी घालावें परंतु तो भक्त जितेंद्रिय असावा. नंतर क्रमशः दुसऱ्या भक्तांचे पादांगुष्ठ प्रक्षालन करावें. (१४८) नंतर अतिरम्य व पवित्र अशा जेवावयाचे जागीं यांना यथाक्रम पूर्वेकडे तोंड करून आसनांवर बसवावें. (१४९) अथवा उत्तरेकडे तोंड करून बसवावें. परंतु दुसऱ्या कोणत्याही दिशेकडे तोंड करवूं नये. नंतर श्रीमंतानें वस्त्र, सुवर्णाच्या अंगठ्या, गंध वगैरेंनीं पूजन करावें. (१५०) गरिबानें यथाशक्ति भक्तीनें पूजन करावें; खीर, वडे, तूप, दहीं, भात, चटण्या (१५१) यांनीं रगडून ब्राह्म-

क्ति च दक्षिणं ॥१५१॥ कृत्वा प्रदक्षिणं नत्वा क्षमध्वमिति तान्वदेत् ॥ गुर्वर्थमेवं यः शिष्यः प्रकुर्याद्भोजनादिकं ॥१५२॥ सर्वपापविनिर्मुक्त इहामुत्र सुखी भवेत् ॥ भक्ताभावे महादेवं तदर्थं संप्रपूज्य तु ॥१५३॥ भक्तार्थं पाकसकलं तस्मै प्रीत्यै निवेदयेत् ॥ देशांतरे स्थितः शिष्यो योजनान् गुरुपर्वसु ॥१५४॥ रवौ कन्यागते दर्शे गुरुपर्वक्रियां चरेत् ॥ यावच्छिष्योऽवनौ जीवेत्समृध्दो गुरुपर्वणि ॥१५५॥ तावत्सद्भक्तितो भक्तान् भोजयेत् प्रतिवत्सरं ॥ गुरोरत्यंतभक्तस्य शिष्यस्येह परत्र च ॥१५६॥ न किंचिद्दुर्लभं ब्रह्मन् समस्तं सुलभं सदा ॥ अथ किं बहुनोक्तेन गुरुदेवो महेश्वरः ॥१५७॥ यः कश्चिद्गुरुभक्तश्चेत्स याति परमं पदं ॥ स्कांदे ॥ गुरुशुश्रूषणं कार्यं गुरोर्वाक्यानुवर्तनम् ॥१५८॥ सदा गुरुपरो नित्यं गुरोराज्ञां न लंघयेत् ॥ गुरुपादोदकं पीत्वा गुरूच्छिष्टं तु सेवयेत् ॥१५९॥ गुरुमूर्तिं सदा ध्यायेद्गुरुनाम सदा जपेत् ॥ गुरुपादांवुजध्यानं कुर्याद्गौरि महेश्वरि ॥१६०॥ तमेव यः स्मरेन्नित्यं स मुक्तो नात्र संशयः ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन शिष्यः सेवेत सद्गुरुं

---

णांना जेऊं घालावें. नंतर पूर्वीप्रमाणें विडे देऊन यथाशक्ति दक्षिणा द्यावी.(१५२) प्रदक्षिणा घालून नमस्कार करून, क्षमा करा असें त्यांना ह्मणावें. याप्रमाणें गुरुकरितां जो शिष्य भोजन वगैरे घालतो तो (१५३) सर्व पापांपासून मुक्त होऊन इहपरलोकीं सुखी होतो. भक्तांचा अभाव असेल तर त्याकरितां महादेवाचें पूजन करावें. (१५४) व भक्तांचें सर्व जेवण शिवार्पण करावें. दूरदेशीं असलेल्या शिष्यानें गुरुतिथीचे दिवशीं, (१५५) सूर्य कन्याराशीस आला असतां, दर्शकाळीं गुरुतिथि पाळावी. या पृथ्वीतलावर जितके समृद्ध शिष्य जिवंत असतील (१५६) तितक्यांनीं प्रत्येक वर्षीं चांगल्या भक्तीनें भक्तांना जेऊं घालावें. जो गुरूचा दृढ भक्त आहे त्यास इहपरलोकीं (१५७) हे ब्रह्मदेवा कांहींहि दुर्लभ नाहीं सर्व कांहीं सुलभ आहे. फार काय सांगावें. गुरुदेव हा साक्षात महेश्वर होय. (१५८) जो कोणी गुरूचा भक्त असेल तो उत्तम पदास जातो. स्कंदपुराणांत सांगितलें आहे कीं, गुरूची सेवा करावी, गुरुवचनाप्रमाणें वागावें. (१५९) नेहमीं गुरूवर चित्त ठेवून असावें. गुरूची आज्ञा उल्लंघन करूं नये. शिष्यानें गुरूच्या पायांचें पाणी पिऊन गुरूचें उष्टें खावें. (१६०) गुरुमूर्तीचें नेहमीं ध्यान करावें, गुरुनामाचा जप करावा व गुरुपादकमलाचें, हे महेश्वरी गौरि नेहमीं ध्यान करावें. (१६१) जो त्याचेंच नेहमीं स्मरण करितो, तो निःसंशय मुक्त होय. याकरितां शिष्यानें सर्व

॥१६१॥ तत्संपर्के शिवार्चादौ स्वगतं वा परागतं ॥ यथैव वन्हिसंपर्कान्मलं त्यजति कांचनम् ।।१६२।। तथैव गुरुसंपर्कात्पापं त्यजति मानवः ॥ पापीनां च यथा संगात्तत्पापफलमश्नुते ॥१६३॥ तद्वदाचार्यसंगेन सद्धर्मफलभाग्भवेत् ।। यथा प्रज्वलितो वन्हिः स्पृष्टं काष्ठं च निर्दहेत् ॥१६४॥ गुरुस्तुष्टो दहत्येव पापं तन्मात्रचेतसां ॥ इत्थमाचारवान्भक्तो नित्यं जपपरायणः ॥ गुरुप्रियकरो मन्त्रावि नियोगे सदार्हति॥१६५॥ ततः शिष्यः समुत्थाप्य कुसुमैः पूरितांजलिः ॥ प्रविशेत्पादयुग्मे तु प्रणामं कारयेद्गुरोः ॥१६६॥ चैतन्यं शाश्वतं नित्यं व्योमातीतं निरंजनं ॥ नादबिंदुकलातीतं तस्मै श्रीगुरवे नमः ॥१६७॥ ज्ञानशक्तिसमारूढं तत्वमालाविभूषितं ॥ भुक्तिमुक्तिप्रदातारं तस्मै श्रीगुरवे नमः ॥१६८॥ ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च ईश्वरश्च सदाशिवः॥एते गर्भगता यस्य तस्मै श्रीगुरवे नमः ॥१६९॥ गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ॥ गुरुरेव परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥१७०॥ अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशला-

---

प्रयत्नानें सद्गुरूची सेवा करावी. (१६२) शिवार्चनकालीं त्याचा आपल्यास अगर आपला त्यास संपर्क झाला असतां सुवर्णाचा अग्नीशीं संपर्क झाला असतां जसा सुवर्णाचा मल नाश होतो. (१६३) तसेंच गुरुसंपर्कानें मनुष्याचें पाप नष्ट होतें. पाप्यांचा संसर्ग घडल्यास जसें त्याच्या पापाचें फल भोगावें लागतें (१६४) तद्वत आचार्यांचे संसर्गानें सद्धर्म फलप्राप्ति होते. जसा प्रदीप्त अग्नि स्पर्श झालेल्या लांकडास जाळतो. (१६५) तसा गुरु संतोषित झाला असतां त्याचे ठिकाणीं मन ठेवणाऱ्यांचें पाप जाळून टाकितो. याप्रकारें शिष्यानें आचार पालन करून नेहमी जप करीत राहावें. व गुरूस इष्ट होऊन मंत्र दिला जाण्यास योग्य व्हावें. (१६६) नंतर शिष्यानें उठून कुसुमांनीं ओंजळ भरून गुरुपादाजवळ जावें व गुरूस नमस्कार करावा. (१६७) चैतन्यस्वरूपी, शाश्वत, नित्य, अनंत, निरंजन, नादबिंदुकला याहून अतीत अशा श्रीगुरूस नमस्कार असो. (१६८) ज्ञानशक्तीवर आरोहण केलेला, तत्वमाला धारण करणारा, भोग व मुक्ति देणारा, असा जो श्रीगुरु त्यास नमस्कार असो. (१६९) ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईश्वर, सदाशिव, हे ज्याचे गर्भवासी झाले, त्या श्रीगुरूस नमस्कार असो. (१७०) गुरु हाच ब्रह्मा, विष्णु, व तेजस्वी महेश्वर होय. व गुरु हेंच परब्रह्म, त्या गुरूस नमस्कार असो. (१७१) अज्ञानरूपी अंधळ्याचा ज्ञानरूपी अंजनशलाकेनें ज्यानें डोळा उघडिला त्या श्री-

कया ॥ चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १७१ ॥ अनंतजन्मसंप्राप्तं कर्मैंधनविदाहकं ॥ ज्ञानानलप्रभावेन तस्मै श्रीगुरवे नमः ॥१७२॥ अखंडमंडलाकारं व्याप्तं येन चराचरम् ॥ तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥१७३॥ भवारण्यप्रविष्टस्य दिङ्मोहभ्रांतचेतसः ॥ येन मे दर्शितः पंथास्तस्मै श्रीगुरवे नमः ॥१७४॥ इत्यष्टमंत्राः ॥ प्रणम्य दण्डवद्भूमावष्टमंत्रेण चार्चयेत् ॥ गुरोः श्रीपादपद्मं च गंधपुष्पाक्षतादिभिः ॥१७५॥ गुरुपादयुतः शिष्यो मस्तके रचितांजलिः॥ नासापुटं निरीक्षेत काष्ठमौनं समाचरेत् ॥१७६॥ गुरोराज्ञां दिवा नक्तं दासवत्सेवयेन्मुदा ॥ अभिमानो न कर्तव्यो जातिविद्याधनादिभिः॥१७७॥ ततस्तेनैव गुरुणा शिष्यसंतोषितेन च ॥दीक्षाविध्युक्तमार्गेण सम्यग्दीक्षां समाश्रयेत् ॥१७८॥ ततोपदिष्टमार्गेण शिवार्चामनुवासरं ॥ त्रिकालमेककालं वा यथाशक्ति समर्चयेद् ॥१७९॥ यो दीक्षाते गुरोर्भक्त्या ददाति स्वस्य विग्रहं ॥ भोगार्थं स्वार्जितं द्रव्यं त्यक्त्वा भोगं स्ववांछितं ॥१८०॥ तेन लब्धं परब्रह्म शृणु तात्पर्यसंग्रहं ॥ सर्वपापविनिर्मु-

---

गुरूस नमस्कार असो. (१७२) अनेक जन्मांचें कर्मरूपी इंधन ( जळण ) ज्ञानरूपी अग्नीच्या प्रतापानें जाळून टाकणारा जो श्रीगुरु त्यास नमस्कार असो. (१७३) ज्यानें हें चराचर जग व्यापून टाकिलें आहे व जो तत्पदवाच्य आहे. त्या श्रीगुरूस नमस्कार असो. (१७४) भवरूपी अरण्यामध्यें शिरलेल्या व मोहानें भ्रान्तचित्त होऊन दिशाभूल झालेल्या मला ज्यानें मार्ग दाखविला त्या श्रीगुरूस नमस्कार असो (१७५) हे आठ मंत्र होत. जमिनीवर साष्टांग नमस्कार घालून अष्ट मंत्रांनीं व गंधपुष्पाक्षतादि करून गुरूच्या पायांचें पूजन करावें. (१७६) शिष्यास गुरुपायांची जोड झाल्यावर शिष्यानें हात जोडून असावें व नाकाकडे दृष्टि द्यावी व मौन धारण करावें. (१७७) गुरूची आज्ञा अहोरात्र दासाप्रमाणें आनंदानें बजावीत जावी. व जाति, विद्या आणि धन यांचा अभिमान बाळगूं नये. (१७८) नंतर त्याच गुरूनें शिष्याकडून संतुष्ट होऊन दीक्षाविधींत सांगितलेल्या रीतीप्रमाणें योग्य दीक्षा द्यावी. (१७९) व शिष्यानें नंतर सांगितलेल्या मार्गानें दररोज शिवार्चन तीन वेळां किंवा एक वेळां यथाशक्ति करीत असावें. (१८०) दीक्षा घेतल्यानंतर जो शिष्य आपला देह गुरुभक्तीनें गुरूस अर्पण करितो किंवा आपले इच्छितभोग टाकून आपण मिळविलेलें द्रव्य गुरूस भोगण्याकरितां देतो. (१८१) तो परब्रह्म मिळवितो. तात्पर्य इतकेंच कीं, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन

कः सर्वैश्वर्यसमन्वितः ॥१८१॥ ब्रह्मलोकादिलोकेषु यथेष्टमनुभूय च ॥ मम प्रसादान्मल्लोके यथेष्टं विचरेत्सदा ॥१८२॥ कर्मणा मनसा वाचा गुरूणां भक्तवत्सलः॥ शरीरमर्थं प्राणं च सद्गुरुभ्यो निवेदयेत् ॥१८३॥ गुरुनिंदाकरं दृष्ट्वा घातयेदथवा शपेत्॥ स्थानं वा तत्परित्यज्य गच्छेद्यद्यक्षमो भवेत् ॥१८४॥ त्रिपुंड्रं चैव रुद्राक्षं नित्यार्चनजपं तथा ॥ होमन्यासादि तत्सर्वं दीक्षाहीनेन निष्फलं॥१८५॥ अदीक्षितश्च यो विप्रश्चतुर्वेदधरोऽपि वा ॥ संस्पृशेद्यदि वा लिंगं शुनकात्परतो भवेत् ॥१८६॥ अत्रोक्तमर्थं सकलं गुरुः शिष्यं प्रबोधयेत् ॥ नो चेद्गुरोर्भवेत्पापं तेनाज्ञानेन यत्फलम् ॥१८७॥

इति श्रीशैवरत्नाकरे गुरुशिष्यलक्षणकथनं नाम नवमोऽध्यायः ॥

---

व सर्वैश्वर्यभरित होऊन (१८२) ब्रह्मादि लोकांत यथेष्ट सुख भोगून माझ्या कृपेनें माझ्या लोकांत यथेष्ट संचार करितो. (१८३) कर्मानें, मनानें, वाणीनें गुरुभक्त शिष्यानें स्वशरीर, अर्थ व प्राण सद्गुरूंना द्यावेत. (१८४) गुरुनिंदा करणारे कांहीं दिसल्यास त्यांचा घात करावा किंवा त्यांस शाप द्यावा व असें करण्याचें सामर्थ्य नसल्यास स्थानत्याग करून जावें. (१८५) त्रिपुंड्र, रुद्राक्ष, नित्य शिवपूजन, जप, होम, न्यास वगैरे हीं सर्व दीक्षा नसल्यास व्यर्थ होत. (१८६) चतुर्वेद जाणणारा ब्राह्मण असून जर तो दीक्षाविहीन असून लिंगास शिवेल तर तो कुत्र्याहूनही निंद्य होय. (१८७) येथें सांगितलेला सर्व अर्थ गुरुनें शिष्यास सांगावा. न सांगितल्यास त्याचे अज्ञानानें उत्पन्न होणारें पापरूपी फल गुरूस भोगावें लागेल.

याप्रमाणें श्रीशैवरत्नाकरग्रंथांतील गुरुशिष्यलक्षणकथननामक नववा अध्याय पुरा झाला.

---

 ९५

# अथ दशमोऽध्यायः

श्रीगणेशाय नमः ॥ अथ दीक्षाविधिः ॥ पार्वत्युवाच ॥ को मन्त्रः सर्वजातीनां मतः साधारणः प्रभो ॥ उपदेशविधानस्य कीदृशीं वद सत्क्रियाम् ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ॥ मम पंचाक्षरी मंत्रः पाठमात्रेण सिध्यति ॥ सर्वलोकवशीकारः सर्वसौभाग्यवर्धनः ॥ २ ॥ आयुरारोग्यसंपत्तिहेतुरैश्वर्यकारणम् ॥ इष्टावाप्तिकरोऽनिष्टपरिहारैककारणम् ॥३॥ परानंदनिजावासो मुक्तेस्तत्र प्रवर्धनम् ॥ शबरेश्वरवेषेण पुरा पुरविरोधिना॥४॥ सर्वजातीयमनुना साधारणतयेश्वरी ॥ सर्वानुग्राहके चास्मिंस्तंत्रे वातुलनामनि ॥ ५ ॥ उपदिष्टो महैश्वर्यसिद्धिमंत्रः प्रभावनात् ॥ उपदेशविधिं तस्य कथयामि ततः शृणु ॥६॥ एको भवेदिहाचार्यः शिवभक्तिपरायणः ॥ सद्गुरुप्रभवः ख्यातः शांतः शैवागमार्थवित् ॥७॥ चत्वारो ऋत्विजस्तत्र तस्याचार्यस्य संमताः ॥ अनिंदितचरित्राः स्युः शिवाराधनतत्पराः ॥८॥ स्नात्वा प्रभातसमये गुरूणामभ्यनुज्ञया ॥ अलंकृतश्च गंधाद्यैर्गुरूणामंतिकं व्रजेत् ॥९॥ समस्तसंपत्संप्राप्तिहेतुभिर्भसितैः

---

आतां दीक्षाविधि सांगतों. (१) पार्वती ह्मणत्ये, हे प्रभो सर्व जातींना संमत असा मंत्र कोणता व तो मंत्रोपदेश करण्याची क्रिया कशी तें सांगा.

(२) श्रीभगवान् ह्मणाले—माझा पंचाक्षरी मंत्र केवल पठण केल्यानें सिद्धि पावतो, तो सर्व लोकांना वश करणारा असून सर्व कल्याण करणारा आहे. (३) तो आयुष्य, आरोग्य, संपत्ति यांचा हेतु व सर्व ऐश्वर्यांचें कारण आहे. इच्छित पुरविणारा, अनिष्ट निवारण्यास कारण, (४) परमानंद देणारा, व मुक्ति देणारा आहे. तो पूर्वी शबर वेष घेऊन क्रीडा करणाऱ्या त्रिपुरांतकानें (५) सर्व जातींस साधारण ह्मणून हे पार्वती, सर्वांवर अनुग्रह करणाऱ्या या वातूलतंत्रामध्यें (६) सिद्धिमंत्र प्रभावनेमुळें सांगितला आहे. तो मंत्रोपदेश करण्याचें विधान सांगतों, तें तूं श्रवण कर. (७) यांत शिवावर भक्ति ठेवणारा एक आचार्य असतो, तो सद्गुरूपासून उत्पन्न झालेला, प्रसिद्ध, शांत, शैवागमाचा अर्थ जाणणारा असतो. (८) व आचार्यास संमत असे चार ऋत्विज असतात, ते आचरणानें शुद्ध व शिवाराधन करण्यांत तत्पर असतात. (९) ज्यास दीक्षा द्यावयाची असत्ये त्यानें प्रातःकाळीं स्नान करून गुरूच्या आज्ञेनें गंधादि अलंकार धारण करून गुरूजवळ जावें. (१०) सकल संपत्तीच्या प्राप्तीस कारण अशा पांढऱ्या व गुरूनें दिलेल्या भस्मानें

सितैः ॥ गुरुदत्तैर्ललाटादिस्थाने कुर्यात्त्रिपुंड्रकं ॥१०॥ समेत्याचार्यपादाब्जे प्रणम्य तदनंतरं॥पूजयेत्स्वर्णपुष्पाद्यैर्भक्त्या वित्तानुसारतः॥११॥ स्नातानलंकृतान् शुद्धवाससा ऋत्विजस्ततः ॥ पुष्पाक्षतविभूत्याद्यैश्चतुरस्तान् प्रपूजयेत् ॥ १२ ॥ विभूतिं शिवभक्तेभ्यः सर्वेभ्यस्तदनंतरं ॥ वृद्धानुक्रमतो दत्वा पुष्पाद्यैस्तान्प्रपूजयेत् ॥१३॥ अथ तेभ्यः समस्तेभ्यो देशिकेंद्रपुरस्सरं ॥ यथा प्रदक्षिणं भक्त्या तांबूलानि समर्पयेत् ॥ १४ ॥ विधिवत् कृतपूजस्य पुरस्तात् परमेष्ठिनः ॥ पंचस्वर्णादिकलशानाचार्यः स्थापयेन्नवान् ॥१५॥ एवं मध्यचतुष्कोणे चतुरस्तान्निधापयेत् ॥ एकैकं नववस्त्रेण वेष्टयेद्देशिकोत्तमः ॥ तेषु स्वर्णानि रत्नानि यथा संभवमर्पयेत् ॥१६॥ नवभिस्तंतुभिः शुद्धैः पंच तान् परिवेष्टयेत् ॥ आचार्यो मध्यमस्यार्चां कुर्यात्पुष्पाक्षतादिभिः ॥१७॥ ऋत्विजः प्रीतमनसो विदध्युरितरार्चनां ॥ तेषु तीर्थांबुपूर्णेषु विदध्यादाम्रपल्लवान्॥१८॥ दूर्वांकुरान्सपूगानि नागवल्लीदलान्यपि ॥ अथ तत्कलशस्थानामंभसामभिमंत्रणं ॥१९॥ मम पंचाक्षरीमंत्रेणाचार्यः प्रतिपादयेत् ॥ ततः सम-

---

ललाट वगैरे उक्त स्थानांवर त्रिपुण्ड्र धारण करावेत (११) व जवळ येऊन आचार्यांच्या चरणकमलास नमन करून नन्तर सुवर्णपुष्पें वगैरेंनीं भक्तिपूर्वक आपल्या ऐपतीप्रमाणें त्याचें पूजन करावें, (१२) नंतर स्नान केलेल्या शुद्ध वस्त्रानें अलंकृत झालेल्या चार ऋत्विजांचें, शिष्यानें पुष्पें, अक्षता, विभूति यांनीं पूजन करावें. (१३) नन्तर सर्व शिवभक्तांना वृद्धानुक्रमानें विभूति देऊन त्यांची पुष्पांनीं वगैरे पूजा करावी. (१४) नन्तर देशिकांस पुढें करून त्या सर्वांना प्रदक्षिणा घालावी व त्यांना विडे द्यावेत. (१५) उत्तम स्थानीं विराजमान झालेल्या व विधिवत् पूजिलेल्या ( आचार्यां ) पुढें आचार्यानें पांच नवे सुवर्णादि कलश मांडावेत. (१६) ते चार कोंपऱ्यांस चार ठेवावेत. त्या उत्तम देशिकानें प्रत्येकास नवीन वस्त्राचें वेष्टन करावें. त्या कलशांत प्रसंगीं मिळतील तितकीं सुवर्णरत्नें घालावींत. (१७) नवीन शुद्ध सुतानें त्यांस पांच वेळ वेष्टन करावें. आचार्यानें मध्यकलशाची गन्धाक्षता वगैरेंनीं पूजा करावी. (१८) ऋत्विजांनीं संतोषित मनानें बाकींच्यांचें पूजन करावें. तीर्थोदकानें भरलेल्या त्या कलशांत आंब्याची कोंवळीं पानें घालावींत. (१९।२०) तसेंच दूर्वा, सुपाऱ्या व विड्याचीं पानेंही घालावींत. नन्तर त्या कलशांतील पाण्याचें माझ्या पंचाक्षरी मन्त्रानें आचार्यानें अ-

स्तभक्तेभ्यः कुर्वंस्त्वाशिषमुत्सुकः ॥२०॥ परितस्तूर्यनिस्वानैर्मंगलार्थ-विजृंभितैः ॥ तत्पंचकलशांभोभिराचार्यः शिष्यमूर्धनि ॥२१॥ संप्रोक्ष्य पंचकलशान् सदूर्वांकुरपल्लवान् ॥ स्वस्वस्थानेषु कलशांस्तान्निधाय प्रयत्नतः॥२२॥ उध्दृत्य च यथापूर्वं कुर्यात्तत्प्रोक्षणं पुनः ॥ स्थापयित्वा पुनस्तांश्च कलशान् स्वस्वभूमिषु ॥२३॥ उद्धृत्य पूर्ववत्कुर्यात्प्रोक्षणं शिष्यमूर्धनि ॥ इत्थं त्रिवारं तत्सेकं कृत्वा तस्याघमर्षणं ॥२४॥ शिवशांतिकमाचार्यः सह शिष्येण संस्मरेत् ॥ ततस्तु दक्षिणे भागे शिष्यस्योपविशेद् गुरुः ॥२५॥ शिवहस्तं विधायाथ शिष्यस्य शिरसि न्यसेत् ॥ शिवतेजोमयं पाणिं शिवमंत्रमुदीरयेत् ॥२६॥ ततः शिवासनं ध्यात्वा शिष्यमूर्धनि देशिकः ॥ तत्रावाह्यं यथान्यायमर्चयेन्मनसा शिवं ॥२७॥ प्रार्थयेत्प्रांजलिर्देवं नित्यमंत्रस्थितो भव ॥ इति विज्ञाप्य तं शंभोस्तेजसा भास्वरं स्मरेत् ॥२८॥ मम पंचाक्षरीमंत्रं सोपांशूपदिशेद् गुरुः ॥ कर्णे शिष्यस्य शनकैः शिवमंत्रमुदीरयेत् ॥२९॥ स तु बद्धांजलिः शिष्यो मंत्रं तद्गतमानसः ॥ समस्तं व्याहरेद्धीमान् शिवाचार्यस्य शासनात् ॥३०॥ पाशानशेषान् कर्तर्या छित्वा लिंगं समादिशेत् ॥ कर्तरी

---

भिमंत्रण करावें. नन्तर सर्व भक्तांकडून आशीर्वाद देऊन (२१) मंगलवाद्यांनीं त्या पांच कलशांतील पाण्यानें शिष्याचे डोक्यावर (२२) प्रोक्षण करून ते कलश दूर्वांकुरपल्लवांसहित आपापल्या जागीं हळूच ठेवावेत. (२३) व पूर्वींप्रमाणें पुनः उचलून प्रोक्षण करावें, पुनः ते आपापल्या जागीं ठेवून (२४) व पुनः उचलून पूर्वींप्रमाणें शिष्याचे डोक्यावर प्रोक्षण करावें. याप्रमाणें तीन वेळां अभिषेक व अघमर्षण करून (२५) शिष्यासह आचार्यांनें शिवशांतिक ह्मणावें. नन्तर गुरूनें शिष्याचे उजवे बाजूस बसावें. (२६) नन्तर शिष्याचे डोक्यावर शुभ हस्त ठेवावा व शिवतेजोमयपाणिमंत्र ह्मणावा. (२७) नन्तर देशिकानें शिष्याचे डोक्यावर शिवासनाचें ध्यान करून तेथें शिवाचें आवाहन करून योग्य प्रकारें शिवाचें मानसिक पूजन करावें. (२८) येथें नित्य मंत्ररूपानें रहा, अशी हात जोडून प्रार्थना करावी व तो शिष्य शंकरतेजानें प्रकाशित झाला असें स्मरण करावें. (२९) नन्तर माझ्या पंचाक्षरीमन्त्राचा शिष्याचा कानांत मंद स्वरानें उच्चार करावा. (३०) व मंत्राचे ठिकाणीं ज्याचें मन लागलें आहे अशा त्या बुद्धिमान शिष्यानें शिवाचार्यांच्या हुकुमानें सर्व मंत्र ह्मणावा. (३१) सर्व पाशांचें छेदन करून लिंग द्यावें.

ज्ञानशक्तिः स्याद्यथा पाशांश्छिनत्यसौ ॥३१॥ या कला परमा सूक्ष्मा मंत्राणां बोधिनी परा॥ तामाकृष्य यथा न्यायं लिंगे समुपवेशयेत्॥३२॥ तल्लिंगं स्थापयेच्छिष्य प्राणलिंगमिदं तव ॥ एवं वदेत्सदा लिंगं न कदाचिद्वियोजय ॥३३॥ शिष्यस्तु दक्षिणां दद्यादाचार्याय स्वशक्तितः ॥ गुरूपदिष्टमार्गेण कुर्यात्सन्मानमृत्विजां ॥३४॥ तदा प्रभृति गुर्वंघ्रि-पद्मयोर्दंडवत्पतेत् ॥ न लंघयेद्गुरोराज्ञां तस्याग्रे प्रांजलिर्भवेत् ॥३५॥ नित्यं भवेद्गुरोः शिष्यः श्रीपादाब्जपरायणः ॥ प्रणमेद्भूतिरुद्राक्षधारिणां दूरतो मुदा॥३६॥ स्वशक्त्या शिवभक्तस्य पित्रोरभ्यागतस्य च ॥ संतोषं सततं कुर्याद्भोजनाच्छादनादिभिः॥३७॥ उपभोगाय पुरतो वस्तु यद्यदुपस्थितं ॥ तत्तत्समर्प्य देवाय विदधीतात्मसात्ततः ॥३८॥ असमर्प्य यदीशाय वस्तु किंचित्कदाचन ॥ कथंचिन्नोपभुंजीत शिवभक्तिपरो नरः ॥३९॥ या या क्रिया विधातव्या प्रस्तुता जायते रतिः ॥ तां तां कुर्यान्महादेवे समर्पणधिया सुधीः ॥४०॥ देशकालविपर्यासे सर्वावस्थासु सर्वदा ॥ ज्ञातव्यं बुद्धियुक्तेन शिवाचारं न लंघयेत् ॥४१॥ शिवभक्तं समालो-

---

ज्ञानशक्ति ही पाश तोडणारी कातरी होय. कारण ती पाशांचा नाश करिते (३२) मंत्रोपदेश करणारी जी श्रेष्ठ व सूक्ष्म उत्तम ज्ञानकला ती लिंगामध्यें यथायोग्य प्रविष्ट करवून (३३) तें लिंग स्थापन करावें ( शिष्यानें धारण करावें ). व हे शिष्या हें तुझें प्राणलिंग आहे त्या लिंगाचा कधींही त्याग करूं नकोस असें ह्मणावें. (३४) शिष्यानें आपल्या शक्तिप्रमाणें आचार्यास दक्षिणा द्यावी व गुरूनें सांगितलेल्या रीतीनें ऋत्विजांचा सन्मान करावा. (३५) त्यावेळेपासून गुरुपदीं साष्टांग नमस्कार घालावा व गुरूची आज्ञा कधींहि मोडूं नये व त्यापुढें हात जोडून उभे रहावें. (३६) नेहमीं शिष्यानें गुरुचरणसेवारत असावें व दुरूनच आनंदानें विभूति रुद्राक्ष धारण केलेल्यास नमस्कार करावा. (३७) यथाशक्ति शिवभक्ताचे आईबापांचें व अभ्यागताचें अन्नवस्त्र देऊन समाधान करावें. (३८) ज्या ज्या वस्तु भोगार्थ आपणापुढें प्राप्त होतील त्या त्या देवाला समर्पण करून आपण स्वीकाराव्यात. (३९) शिवभक्तानें कोणतीही वस्तु शिवार्पण केल्याविना कधींहि कोठेंहि खाऊं नये. (४०) जें कांहीं करण्याची बुद्धि होईल तें बुद्धिमामानें शिवार्पण बुद्धिनें करावें. (४१) देशकाल बदलला असतांही सर्वावस्थेमध्यें सर्वदा शिवाचार जाणून बुद्धिमानानें आचारोल्लंघन करूं नये. (४२) शिवभक्तास पा-

क्य दूरादेवातिभक्तितः ॥ प्रांजलिः प्रणतो भूत्वा भाषयेन्मृदुभाषणैः ॥ ॥४२॥ शिवालये शिवारामे शिवग्रामाभिरक्षणे ॥ तात्पर्यमनिशं कुर्याद्धन्यात्तदपहारिणं ॥४३॥ शिवकिंकरभूतोऽहमिति नित्यं विभावयेत् ॥४४॥ समस्तभोगसंपत्तिः सम्यक्समुपजायते ॥ आयुरारोग्यतां याति यशो याति विशुद्धतां ॥४५॥ विद्यानवद्यतां याति भूतिरेति प्रभूतितां॥ अनेकजन्मसंबंधो दूरं यात्यघसंचयः ॥४६॥ भूतप्रेतपिशाचाद्याः पलायंते भयातुराः ॥४७॥ भक्त्या यथेष्टं विश्वेशप्रसादान्मुक्तिमेष्यति ॥ मंत्रारंभस्तु चैत्रे चेद्बहुदुःखफलप्रदः ॥४८॥ वैशाखे रत्नलाभः स्याज्ज्येष्ठायां मरणं ध्रुवं ॥ आषाढे बंधुनाशः स्यात् पूर्णायुः श्रावणे भवेत् ॥४९॥ प्रजानाशो भाद्रपदे सर्वतः शुभमाश्विजे ॥ कार्तिके मंत्रसिद्धिः स्यान्मार्गशीर्षे शुभावहः ॥ ५० ॥ पुष्ये तु मंत्रहानिः स्यान्माघे मेधाविवर्धनं ॥ फाल्गुन्यां सर्वसिद्धिः स्यादिति मंत्रविदो विदुः ॥५१॥ शिवरहस्ये॥ इंधनानलसंयोगे वृक्षनाम न विद्यते॥शिवसंस्कारसंपन्नः स रु·

---

हिल्याबरोबर अतिभक्तीनें हात जोडून नमस्कार करावा. व मधुर भाषण करावें. (४३) शिवमंदिर, शिवबाग, शिवग्राम यांचें रक्षण करण्यास नेहमीं तत्पर असावें व त्यांचें हरण करणारास ठार मारावें. (४४) मी शंकराचा किंकर आहें ही बुद्धि नेहमीं मनांत वागवावी. (४५) असें करणारास सर्व भोगसंपत्ति प्राप्त होते. आयुष्य व निरोगता प्राप्त होते व त्याचें यश शुद्ध होतें. (४६) विद्या निष्कलंक होते. ऐश्वर्यास प्रभुत्व प्राप्त होतें. अनेक जन्मांचा पापसंचय नाश पावतो. (४७) भूतें, प्रेतें, पिशाचें वगैरे सर्व भयभीत होऊन दूर पळून जातात. (४८) तो जगदीशाच्या प्रसादानें मुक्त होतो. चैत्र महिन्यांत मंत्रारंभ केल्यास तो फार दुःखदायक होतो. (४९) वैशाखांत केला असतां रत्नलाभ होतो. जेष्ठांत केल्यास निश्चयानें मरण येतें; आषाढांत केल्यास बांधवांचा नाश होतो. श्रावण महिन्यांत केल्यास पूर्ण आयुष्य प्राप्त होतें. (५०) भाद्रपदांत केल्यास संततीचा नाश होतो. आश्विन महिन्यांत केल्यास शुभदायक होतो. कार्तिकांत केल्यास मंत्रसिद्धि होते. मार्गशीर्षांत मंत्रारंभ शुभावह होतो. (५१) पौषांत केल्यास मंत्रहानि होते. माघ महिन्यांत केल्यास बुद्धि वाढते. फाल्गुनांत मंत्रारंभ केल्यास तो सर्व सिद्धिदायक होतो. असें मंत्रवेत्त्यांचें मत आहे. शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, (५२) सर्पणाचा व विस्तवाचा संयोग झाला असतां वृक्षाचें नांवही राहत नाहीं

द्रो नात्र संशयः ॥५२॥ रजतं पैत्तलं ताम्रं लोहं चेति चतुष्टयं ॥ यद्वदे-ति सुवर्णत्वं रसभेदप्रभावतः ॥५३॥ नगरीनिर्झराद्यंबु गंगां प्राप्य यथैकतां ॥ दीक्षायोगात्तथेशस्य शूद्रादिः शिवतां व्रजेत् ॥५४॥ श्वपचोऽपि मुनिश्रेष्ठः शिवसंस्कारसंयुतः ॥ शिवसंस्कारहीनस्तु द्विजोऽपि श्वपचाधमः ॥५५॥ जन्मना जायते शूद्रः संस्काराद्विज उच्यते ॥ शिवसंस्कारसंपन्ने जातिभेदं न कारयेत् ॥५६॥ शिवसंस्कारसंपन्नो ह्ययं शूद्रो ह्ययं द्विजः ॥ लिंगभेदः कृतो येन रौरवं नरकं व्रजेत् ॥५७॥ शिवदीक्षाभिजातस्य पूर्वजातिं न चिंतयेत् ॥ सुप्रतिष्ठितलिंगस्य न यथा पूर्वभावना ॥५८॥ यस्य चित्तं शिवे लीनं तस्य जात्यादिकं स्मरेत् ॥ शिवलिंगे शिलाबुद्धिं कुर्वाण इव पातकी ॥५९॥ दार्वश्मलोहमृद्रत्नजातलिंगप्रतिष्ठितं ॥ यथा पूज्यं तथैव स्याद्भक्तश्चंडालवंशजः ॥ ६० ॥ लैंगे ॥ यथा पंके सरोजं स्याद्यथा काष्ठे हुताशनः ॥ यथा सुवर्णं पाषाणे

---

तसें शिवसंस्कार प्राप्त झालेला मनुष्य साक्षात रुद्र होतो यांत संशय नाहीं. (५३) रुपें, पितळ, तांबें, लोखंड हे चार धातु वनस्पतिरसभेद केल्यानें जसें सुवर्ण होतात. (५४) किंवा शहरांतील वा झऱ्यांतील वगैरे पाणी गंगेस मिळाल्यास गंगारूप होतें त्याप्रमाणें शिवदीक्षेनें शूद्रादि मनुष्यहि शिवस्वरूपी होतो. (५५) श्वपचास शिवसंस्कार झाला असतांहि तो उत्तम मुनि होतो व शिवसंस्कार नसलेला ब्राह्मणही श्वपचाहून नीच होतो. (५६।५७) मनुष्य जन्मतः शूद्र असतो. त्यास संस्कार झाल्यावर त्यास द्विज असें ह्मणतात. शिवसंस्कार झालेल्याविषयीं शिवसंस्कार झालेला हा शूद्र आहे, हा द्विज आहे, असा जातिभेद करूं नये. ज्यानें लिंगभेद केला तो रौरवनामक नरकाला जातो. (५८) योग्य रीतीनें स्थापिलेल्या लिंगाविषयीं जसा पूर्वस्थिति ( दगडावस्था ) विषयीं विचार कर्तव्य नाहीं तसा दीक्षेनें पुनर्जन्म पावलेल्याच्या पूर्व जातीविषयीं विचार करूं नये. (५९) शिवलिंगाचें ठिकाणीं हा दगड आहे अशी बुद्धि वागविणाराप्रमाणें ज्याचें मन शिवाचे ठिकाणीं लीन झालें आहे त्याच्या जातीचा विचार करणारा पातकी होतो. (६०) लांकूड, दगड, लोखंड, माती, रत्न यांचें करून स्थापिलेलें लिंग जसें पूज्य होय तसा चांडालकुलांत उत्पन्न झालेलाही शिवभक्त पूज्य होतो. लिंगपुराणांत सांगितलें आहे कीं, (६१) ज्याप्रमाणें चिखलांतील कमल, लांकडांतील विस्तव, किंवा दगडांतील सुवर्ण हीं पूज्य आहेत त्याप्रमाणेंच चांडालकुलांत उत्पन्न झालेलाही

भक्तश्चंडालवंशजः ॥६१॥ प्राग्देशजातिनामानि यः पठेत्कथयेच्च सः॥ प्रायश्चित्तक्रियानर्हः पतेत्समयशासने ॥६२॥ माता गिरिसुता देवी पिता देवो महेश्वरः ॥ बांधवाः शिवभक्ताश्च स्वदेशभुवनं यथा ॥६३॥ शिवधर्मशास्त्रे ॥ तावद्भ्रमंति संसारे दुःखशोकपरिप्लुताः ॥ न भवंति शिवे भक्ता यावत्सर्वेऽपि देहिनः ॥६४॥ जीवनं शिवभक्तानां वरं पंचदिनं च यत् ॥ अजकल्पसहस्राणि भक्तिहीनस्य शांकरि ॥६५॥ महापातककोटिघ्नः श्वपचो लिंगपूजकः ॥ तत्संभाषणतो मुक्तिर्गणमुख्यः सुखी भवेत् ॥६६॥ सुदुर्लभा शिवे भक्तिर्दुर्लभं च शिवार्चनं ॥ सुदुर्लभं शिवे दानं शिवयोगः सुदुर्लभः ॥६७॥ नारुद्रः संस्मरेद्रुद्रं नारुद्रो रुद्रमर्चयेत् ॥ नारुद्रः कीर्तयेद्रुद्रं नारुद्रो रुद्रमाप्नुयात् ॥ ६८ ॥ नमस्कारादिसंयुक्तं शिवायेत्यक्षरत्रयं ॥ जिव्हाग्रे वर्तते यस्य सफलं तस्य जीवितं ॥६९॥

इति श्रीशैवरत्नाकरे दीक्षाप्रकरणंनाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

---

मनुष्य शिवभक्त झाल्यास पूज्य होतो. (६२) दीक्षासंस्कार होण्यापूर्वींचे आपलें नांव किंवा देशाचें वा जातीचें नांव जो सांगतो किंवा सांगवितो तो प्रायश्चित्तक्रियेस अयोग्य होऊन समयशासनांत पतित होतो (मतोक्तशासनास पात्र होतो) (६३) पार्वतीदेवी आई व महेश्वर देव बाप, शिवभक्त हे नातलग व सर्व जग हा आपला देश, असें शिवभक्तानें समजावें. शिवधर्मांत सांगितलें आहे कीं(६४) जोंपर्यंत मनुष्यें शिवभक्त होत नाहींत तोंपर्यंत तीं सर्व मनुष्यें दुःख व शोक यांनीं भरलेल्या संसारांत भ्रमण करितात. (६५) शंकराचा भक्त न होतां ब्रह्मदेवाची एक हजार कल्पें जगण्यापेक्षां हे पार्वती शिवभक्त होऊन पांच दिवस जगणें बरें. (६६) श्वपच लिंगपूजक असला तर तो कोट्यावधि महापातकांचा नाश करितो. त्याच्या संभाषणापासून मुक्ति लाभते व शिवगणांचा मुख्य गण होऊन सुखी होतो. (६७) शंकराचे ठिकाणीं भक्ति जडणें, शंकराचें पूजन घडणें हीं दुर्लभ होत. तसेंच शिवाचे ठिकाणीं दान देणें व शिवयोग लाभणें हीं हि दुर्लभ होत. (६८) रुद्र झाल्यावांचून रुद्राचें स्मरण करूं नये; रुद्राचें पूजन करूं नये; रुद्राचें कीर्तन करूं नये; व रुद्र झाल्यावांचून रुद्राची प्राप्ति नाहीं. (६९) नमस्कारपूर्वक " शिवाय " हीं तीन अक्षरें ज्याचे तोंडीं वसत आहेत त्याचें जिणें सफल होय.

ह्याप्रमाणें श्रीशैवरत्नाकरग्रन्थांतील दीक्षाप्रकरणनामक दहावा अध्याय पुरा झाला.

# अथ एकादशोऽध्यायः

श्रीगणेशाय नमः ॥ अथ पंचाक्षरी॥ सर्वव्रतेषु संपूज्य देवदेवमुमापतिम् ॥ जपेत्पंचाक्षरीविद्यां विधिनैव द्विजोत्तमाः ॥१॥ जपादेवमसंदेहो व्रतानां वै विशेषतः ॥ समाप्तिर्नान्यथा तस्माज्जपेत्पंचाक्षरीं शुभां ॥२॥

ऋषय ऊचुः ॥ कथं पंचाक्षरीविद्याप्रभावो वा कथं वद ॥ क्रमो वाऽथ महाभाग श्रोतुं कौतूहलं हि नः ॥३॥ पुरा देवेन रुद्रेण देवदेवेन शंभुना ॥ पार्वत्यै कथितं पुण्यं प्रवदामि समासतः ॥४॥

पार्वत्युवाच ॥ भगवन्देवदेवेश सर्वज्ञ परमेश्वर ॥पंचाक्षरस्य माहात्म्यं श्रोतुमिच्छामि तत्वतः ॥५॥

महादेवः ॥ पंचाक्षरस्य माहात्म्यं वर्षकोटिशतैरपि ॥ न शक्यं कथितुं देवि तस्मात्संक्षेपतः शृणु ॥६॥ अल्पाक्षरं महार्थं च महासारं विमुक्तिदं ॥ आज्ञासिद्धमसंदिग्धं वाक्यमेतच्छिवात्मकं ॥७॥ नानासिद्धियुतं दिव्यं लोकचित्तानुरंजनं ॥ सुनिश्चितार्थं गंभीरं वाक्यं तत्पारमेश्वरं ॥८॥ मंत्रं सुखमुखोच्चार्यमशेषार्थप्रसाधनं ॥ तद्बीजं सर्व-

---

(१) आतां पंचाक्षरी मंत्राचें माहात्म्य सांगतों. हे द्विजोत्तम ऋषिहो, शिवभक्तानें सर्व व्रतांमध्यें देवाधिदेव जो पार्वतीपति याचें पूजन करून पंचाक्षरी विद्येचा यथाशास्त्र जप करावा. (२) जप केल्यानें व्रतें निःसंशय निर्विघ्नपणें समाप्त होतात ह्मणून शुभदायक पंचाक्षरीचा जप करावा.

(३) ऋषी ह्मणाले, ती पंचाक्षरी विद्या कोणती, तिचा प्रभाव काय, तिचा क्रम कसा हें सर्व, हे महाभाग, आह्मांस कथन कर. तें ऐकण्याची आह्मांस फार उत्सुकता आहे. (४) मागें देवाधिदेव जो रुद्रदेव शंकर त्यानें पार्वतीला पंचाक्षरी विद्येचें माहात्म्य सांगितलें तें मी तुह्मांस संक्षेपानें सांगतों.

(५) पार्वती ह्मणाली—हे षड्गुणैश्वर्यसंपन्न देवाधिदेवा, सर्वज्ञा, परमेश्वरा, मला पंचाक्षरीचें माहात्म्य ऐकण्याची इच्छा आहे.

(६) महादेव ह्मणतात— हे देवि, पंचाक्षरीचें माहात्म्य शेकडों कोटि वर्षें सांगितल्यानें संपावयाचें नाहीं ह्मणून संक्षेपानें सांगतों ऐक— (७) ज्यांत थोडीं अक्षरें असून अर्थ मोठा आहे; जो महाबल, व मुक्ति देणारा आहे; जो आज्ञासिद्ध व स्पष्टार्थ आहे असा हा पंक्षाक्षरी मंत्र शिवस्वरूपी वाक्य होय. (८) अनेक सिद्धिसामर्थ्यांनें युक्त, तेजस्वी, लोकांचें रंजन करणारें, निश्चितार्थ असलेलें, गम्भीर असें हें परमेश्वरस्वरूपी वाक्य होय. (९) हा षडक्षरी मंत्र सुखानें उच्चार

 

विद्यानामाद्यमंत्रं षडक्षरं ॥९॥ अतिसूक्ष्मं महार्थं च ज्ञेयं तद्वटबीजवत् ॥ ज्ञेयः स त्रिगुणातीतः सर्वज्ञः सर्वतः प्रभुः ॥१०॥ ॐमित्येकाक्षरे मंत्रे स्थितः सर्वगतः शिवः ॥ मंत्रे षडक्षरे सूक्ष्मे पंचाक्षरतनुः शिवः ॥११॥ वाच्यवाचकभावेन स्थितः साक्षात्स्वभावतः ॥ वाच्यः शिवः प्रमेयत्वात् मंत्रस्तद्वाचकः स्मृतः ॥१२॥ वाच्यवाचकभावोऽयमनादिः संस्थितस्तयोः ॥१३॥ वेदे शिवागमे चायमुभयत्र षडक्षरः ॥ मंत्रः स्थितः सदा मुख्यो लोके पंचाक्षरः स्मृतः ॥१४॥ किं तस्य बहुभिर्मंत्रैः शास्त्रैर्वा बहुविस्तरैः ॥ यस्योंनमः शिवायेति मंत्रोऽयं संस्थितो हृदि ॥१५॥ शिवज्ञानानि यावंति विद्यास्थानानि यानि च ॥ षडक्षरस्य सूत्रस्य तानि भाष्यं समासतः ॥१६॥ को विद्वान् वेदवित्सम्यगधिदैवं विजानकः ॥ एतावद्धि शिवज्ञानमेतावत्परमं पदं ॥१७॥ येनोंनमः शिवायेति ज्ञातं वाक्यं षडक्षरं ॥ विधिवाक्यमिदं शैवं नार्थवादः शिवात्मकं

---

करितां येण्यासारखा आहे, सर्व अर्थ विशद करणारा आहे व सर्व विद्यांचें मूलस्थान असून मंत्रांतील आद्य मंत्र आहे. (१०) हा षडक्षरी मंत्र अति सूक्ष्म असून त्यांत अर्थ थोर आहे; तो वटवृक्षाच्या बीजाप्रमाणें आहे असें जाणावें. तो त्रिगुणातीत सर्वज्ञ व सर्व शक्तिमान् आहे असें जाणावें. (११) "ॐ" या एकाक्षर मंत्रामध्यें सर्व बाजूंनीं शिव ओतप्रोत भरला आहे असें जाणावें; सूक्ष्म षडक्षरी मंत्रामध्यें पंचाक्षरशरीरी शिव आहे असें जाणावें. (१२) वाच्यवाचक अर्थानें या मंत्रांत साक्षात् शिववास्तव्य करीत आहे. प्रमेयानें शिव वाच्य असून मंत्र त्याचा वाचक आहे असें मानिलें आहे. (१३) यांचा हा वाच्यवाचक भाव यांत अनादि आहे. (१४) वेदांत व शिवागमांत हा षडक्षरी मंत्र मुख्य मानिला आहे व लोकांत पंचाक्षरी मंत्र मुख्य मानिला आहे. (१५) ज्याच्या हृदयांत " ॐ नमःशिवाय" हा मंत्र वास्तव्य करीत आहे त्यास अनेक मंत्र व विस्तृत शास्त्रें घेऊन काय करावयाचें आहे? (१६) शिवज्ञान प्रतिपादक जितकीं शास्त्रें अथवा जितक्या विद्या आहेत तीं सर्व षडक्षर मंत्ररूप सूत्राचें संक्षिप्त भाष्य आहे असें समजावें (१७) कोण विद्वान आहे, कोणास वेदज्ञ ह्मणावें, परमदैवताचें कोणास ज्ञान आहे असें ह्मटल्यास ज्यास ह्या मंत्राचें ज्ञान प्राप्त झालें आहे व ज्यानें हेंच परमपद असें जाणलें आहे, तो वरील सर्व विशेषणांस पात्र आहे. (१८) " ॐ नमःशिवाय" हें षडक्षरी वाक्य ज्यानें जाणिलें त्यास हें शिवस्वरूपी विधिवाक्य आहे, अर्थ-

॥१८॥ पंचाक्षरः सप्रणवो मंत्रोऽयं हृदयं मम ॥ गुह्याद्गुह्यतरं साक्षान्मोक्षज्ञानमनुत्तमं ॥१९॥ प्रमाणं वेदवाक्यत्वात्परमार्थप्रकाशितं ॥ वेदानां यजुषां चैव शतरुद्रे व्यवस्थितं ॥२० अखंडं पठितं यस्माच्चेदं वैदिकतांत्रिकं ॥ अखंडवेदवाक्यत्वाद्रहस्यारण्यके तथा॥ २१ ॥ वैदिकानामिदं देयं जप्यं तैरैव शोभने ॥ शूद्राणां वेदबाह्यानां नास्तिकानामधर्मिणां ॥२२॥ कृतघ्नानामभक्तानां नोपदेश्यं कथंचन ॥ दासस्य शिवभक्तस्य हितप्रियकरस्य च ॥ २३ ॥ शूद्रस्यापि प्रदातव्यं नमोऽतं प्रणवं विना ॥ विना प्रणवकं मंत्रं स्त्रीशूद्राणां प्रसाधकं ॥२४॥ प्रणवेन समायुक्तस्तयोर्देवि विषोपमः ॥ नकारश्च मकारश्च शिवाकारौ तथैव च ॥ यकारः पंचमो मंत्रः प्रणवेन षडक्षरः ॥२५॥ अस्य मंत्रस्य वक्ष्यामि ऋषिश्छंदोऽधिदैवतं ॥ बीजं शक्तिं स्वरं वर्णं स्थानं चैवाक्षरं प्रति ॥२६॥ वामदेवो नामऋषिः पंक्तिश्छंद उदाहृतं ॥ देवता शिव एवायं मंत्रस्य च वरानने ॥२७॥ नकारादीनि बीजानि पंचभूतानि तानि च ॥ आत्मानं प्रणवं विद्धि सर्वव्यापिनमव्ययं ॥२८॥ नकारः पृथिवी ज्ञेया मकारस्तो-

---

वादात्मक नाहीं. (१९) प्रणवासहित हा पंचाक्षरमंत्र माझें हृदय आहे. हें सर्वोत्तम व अति गौप्य असें मोक्षज्ञान आहे. (२०) हें वेदवाक्य असल्यामुळें परमार्थाचें स्पष्टीकरण करणारें प्रमाण आहे. व हा यजुर्वेदांत शतरुद्रांत सांगितला आहे. (२१) शिवरहस्यादि तांत्रिक ग्रन्थांत व बृहदारण्यकादि उपनिषद्ग्रन्थांत हा मंत्र अखंड लिहिला असल्यामुळें तो वैदिक व तांत्रिक आहे असें मानितात. (२२) हे पार्वती हा वैदिकांना पढवावें व त्यांनींच त्याचा जप करावा. वेदबाह्य शूद्रांना, नास्तिकांना, अधर्मी मनुष्यांना, (२३) कृतघ्नांना, जे भक्त नाहींत त्यांस ह्या मंत्राचा उपदेश कधींही देऊं नये. हित व प्रिय आचरण करणाऱ्या शिवभक्ताच्या दासास (२४) तो शूद्र असला तरी त्यास प्रणवावांचून 'शिवाय नमः' असा मंत्र पढवावा. स्त्रियांस व शूद्रांस प्रणव सोडून सांगितलेला मंत्र प्रसाददायक होतो. (२५) प्रणवयुक्त मंत्र त्या उभयतांस विषवत् होतो. नकार, मकार, शिकार, वाकार, यकार यांस पंचाक्षरी मंत्र व यांस प्रणव जोडल्यास त्यांसच षडक्षरी मंत्र असें ह्मणतात. (२६) ह्या मंत्राचा ऋषि, छंद, अधिदैवत, बीज, शक्ति स्वर, वर्ण, स्थान हीं सांगतों. (२७) हे शुभानने, या मंत्राचा ऋषि वामदेव; पंक्ति छंद; देवता शिव; (२७) पंचभूतात्मक नकारादि अक्षरें बीजप्रणव हा सर्व व्यापक, अव्यय, आत्मा आहे असें जाणावें. (२९) नकार पृथ्वी जाणावी, मकार

यमुच्यते ॥ शिकारोऽग्निरिति प्रोक्तो वाकारो वायुरुच्यते ॥२९॥ य आकाश इति प्रोक्तः पंचब्रह्मेति च स्मृतं ॥ अकारश्च उकारश्च मकारश्च क्रमेण वै ॥ त्वदीयं प्रणवं केचिन्मदीयं प्रणवं तथा ॥३०॥ प्रथमं तारकारूपं द्वितीयं दंडमुच्यते ॥ तृतीयं कुंडलाकारं चतुर्थं चार्धचंद्रकं ॥३१॥ पंचमं नादविंदुश्च प्रणवं पंचब्रह्मकं ॥ तारकी ब्रह्मणो रूपं दंडको विष्णुरुच्यते ॥३२॥ कुंडली रुद्रसंसक्ता ह्यर्धचंद्रं तदीश्वरः ॥ विंदौ सदाशिवः प्रोक्तः प्रणवं पंचलक्षणं ॥३३॥ त्वदीयं देवि मंत्राणां शक्तिभूतं न संशयः ॥ अकारोकारमकारा मदीयप्रणवे स्थिताः ॥३४॥ छंदो देवी च गायत्री परमात्माधिदेवता ॥ ॐकारस्य स्वरोदात्तो ऋषिर्ब्रह्माऽपि तस्य च ॥३५॥ उदात्तः प्रथमस्तस्य चतुर्थश्च द्वितीयकः ॥ पंचमः स्वरितश्चैव मध्यमो निहितः स्मृतः ॥३६॥ नकारः पीतवर्णश्च स्थानं पूर्वमुखं स्मृतं ॥ इंद्रोऽधिदैवतं छंदो गायत्री गौतमो ऋषिः ॥३७॥ मकारः कृष्णवर्णश्च स्थानं वै दक्षिणं मुखं ॥ विश्वामित्रो ऋषिस्त्रिष्टुप् छंदो विष्णुश्च

---

उदक जाणावें, शिकारास अग्नि मानावें व वाकारास वायु असें ह्मणतात. (३०) यकारास आकाश असें ह्मणतात व सर्व पंचाक्षरास पंचब्रह्म असें ह्मणतात. अकार, उकार, मकार, यांस कोणी तुझा प्रणव कोणी माझा प्रणव असें ह्मणतात. (ह्मणजे ॐकाराचा कोणी शिवपर किंवा कोणी शिवशक्तिपर अर्थ करितात.) (३१) पहिल्यास तारकारूप असें ह्मणतात व दुसऱ्यास दंड असें ह्मणतात. तिसऱ्यास कुंडलाकार असें ह्मणतात. चौथ्यास अर्धचंद्रक असें ह्मणतात. (३२) पांचव्यास नादबिंदु असें ह्मणतात. याप्रमाणें प्रणव पंचब्रह्मात्मक आहे असें ह्मणतात. तारकी यास ब्रह्माचें रूप असें ह्मणतात व दण्डकास विष्णु असें ह्मणतात. (३३) कुण्डलीस रुद्ररूप व अर्धचंद्रास ईश्वर असें ह्मणतात व बिंदूंत सदाशिव आहे. याप्रमाणें प्रणव पंचलक्षणयुक्त आहे. (३४) हे पार्वती, तुझा प्रणवमंत्राची शक्ति आहे यांत संशय नाहीं. माझ्या प्रणवामध्यें अकार, उकार, मकार हे वर्ण आहेत. (३५) हे देवि, याचा छंद गायित्री, व देवता परमात्मा; हीं होत. ॐकाराचा स्वर उदात्त असून ऋषि ब्रह्मा होय. (३६) त्या पंचाक्षरी मंत्राचें प्रथमाक्षर उदात्त आहे व चौथें, दुसरें, पांचवें हें स्वरित आहे व मध्यमाक्षर अनुदात्त आहे. (३७) नकार पीतवर्ण आहे व पूर्वमुख हें स्थान आहे. आधिदैवत इंद्र, गायत्री छंद, ऋषि गौतम अशीं आहेत. (३८) मकाराचा वर्ण कृष्ण दक्षिणमुख स्थान,

देवता ॥३८॥ वाकारो हेमवर्णश्च स्थानं वै चोत्तरं मुखं ॥ ब्रह्माधिदैवतं छंदो बृहती चांगिरा ऋषिः ॥३९॥ यकारो रक्तवर्णश्च स्थानमूर्ध्वमुखं विराट् ॥ छंदो ऋषिर्भरद्वाजः स्कंदो दैवतमुच्यते ॥४०॥ एवं लब्ध्वा परं मंत्रमाज्ञां चैव गुरोस्तथा ॥ जपेन्नित्यं च संकल्प्य पुरश्चरणपूर्वकं ॥ ४१ ॥ यावज्जीवं जपेन्नित्यमष्टोत्तरसहस्रकं ॥ अनश्नन् तत्परो भूत्वा नित्यजापी स उच्यते ॥४२॥ जपेदक्षरलक्षं वै चतुर्गुणितमादरात् ॥ उक्त आसीत्संयमी यः पौरश्चरणिकः स्मृतः ॥४३॥ कृते लक्षजपं कुर्यात्त्रेतायां द्विगुणं भवेत् ॥ द्वापारे त्रिगुणं प्रोक्तं कलौ लक्षचतुष्टयं ॥४४॥ शिवज्ञानविद्यायां ॥ सपुरश्चरणो यो वा नित्यजापी भवेन्नरः ॥ अचिंत्यसिद्धिमाकांक्षन् तयोरन्यतरो भवेत् ॥४५॥ यः पुरश्चरणं कृत्वा नित्यजापी भवेन्नरः॥ तस्य नास्ति समो लोके ससिद्धिः सिद्धिदो वशी ॥४६॥ आसनं रुचिरं वध्वा मौनी चैकाग्रमानसः॥ प्राङ्मुखोदङ्मुखो वाऽपि जपेन्मंत्रमनुस्मरेत् ॥४७॥ आद्यंतयोर्जपस्याशु कुर्यात्त्रिः प्राणसंयमं॥ ततोऽन्ते च जपेद्बीजं शतमष्टोत्तरं शुचिः॥४८॥ चत्वारिंश-

---

ऋषि विश्वामित्र, छंद त्रिष्टुप्, देवता विष्णु अशीं होत. (३९) वाकाराचा हेमवर्ण आहे, उत्तरमुख हें स्थान आहे, अधिदैवत ब्रह्मा, बृहती छंद, आंगिरस ऋषि हीं होत. (४०) यकाराचा वर्ण रक्त, ऊर्ध्वमुख हें स्थान, छंद विराट्, भरद्वाज हा ऋषि, स्कन्द हें दैवत, हीं होत. (४१) याप्रमाणें गुरूजवळून मंत्र मिळवून आज्ञा घेतल्यानंतर संकल्प करून पुरश्चरणपूर्वक जप करावा. (४२) जो कोणी कांहीं एक न खातां नित्य १००८ जप करितो त्यास नित्यजापी असें ह्मणतात. (४३) दर अक्षरास चार लक्ष ( चतुर्गुणितं ) ह्याप्रमाणें आदरपूर्वक वीस लाख पंचाक्षरी जप करणाऱ्यास संयमी किंवा पुरश्चरण करणारा असें ह्मणतात. (४४) कृतयुगांत लक्ष जप करावा, त्रेतायुगांत दुप्पट करावा, द्वापारांत तिप्पट करावा, व कलियुगांत चार लक्ष करावा. (४५) शिवज्ञानविद्येंत सांगितलें आहे कीं-जो मनुष्य पुरश्चरण करणारा किंवा नित्य जप करणारा असतो त्यास चिंतनावांचून सिद्धि प्राप्त होते. (४६) जो पुरश्चरण करून नित्य जप करणारा असतो त्यासारखा सिद्धिदायक सिद्ध व वशी असा दुसरा कोणीहि जगांत नाहीं. (४७) सुखकर आसन घालून मौन धारण करून एकाग्र मनानें पूर्वेकडे तोंड करून किंवा उत्तरेकडे तोंड करून जप करावा. (४८) जपाचे आरंभीं व अंतीं त्रिवार प्राणायाम करावा. जपांतीं त्या शुद्ध मनुष्यानें १०८ बीजाक्षरांचा जप करावा. (४९) मनांत

त्समावृत्य प्राणानायम्य मानसे ॥ पंचाक्षरस्य मंत्रस्य प्राणायाम उदाहृतः ॥४९॥ प्राणायामाद्भवेत्क्षिप्रं सर्वपापपरिक्षयः ॥ इंद्रियाणां वशित्वं च तस्मात्प्राणान् स संयमेत् ॥५०॥ कौशेयं चर्म वा कुर्यात्तौलं चैकमथापि वा ॥ दारवं तालपर्णं वा चासनं परिकल्पयेत् ॥५१॥ वंशासने दरिद्रत्वं पाषाणे व्याधिसंभवः ॥ धरण्यां दुःखसंभूतिर्दौर्भाग्यं दारुकासने ॥५२॥ तृणासने यशोहानिः पल्लवे चित्तविभ्रमः ॥ यथोचितेष्वासनेषु निषिद्धानि परित्यजेत् ॥५३॥ फलं वैशेषिकं प्रोक्तं वंशादिष्वासनेषु वै ॥ मंत्रग्लानिस्तपोहानिस्तेषु सामान्यतो मताः ॥५४॥ कृष्णाजिने ज्ञानसिद्धिर्मोक्षश्रीर्व्याघ्रचर्मणि ॥ स्यात्पौष्टिकादिकौशेये शांतिकं वेत्रविष्टरे ॥५५॥ वस्त्रासने व्याधिनाशः कंबले दुःखमोचनं ॥ अभिचारादिकं नीले रक्ते वश्यादिकं भवेत् ॥ धवले शांतिदो मोक्षः सर्वार्थश्चित्रकंबले ॥५६॥ गृहे जपं समं विद्याद्गोष्ठे शतगुणं भवेत् ॥ नद्यां

---

चाळीस वेळ प्राणायाम करावा. पंचाक्षरी मंत्राला प्राणायाम सांगितला आहे. (५०) प्राणायामानें तात्काल पापक्षय होतो व इंद्रियें वश होतात, ह्मणून प्राणायाम करावा. (५१) कुशांचें, कृष्णाजिनाचें किंवा व्याघ्राजिनाचें, कापसाचें, रेशमाचें, लांकडाचें किंवा ताडपत्राचें आसन करावें. (५२) वेळूच्या आसनावर बसल्यानें दारिद्र्य येतें, दगडावर बसल्यास रोग संभवतो. जमिनीवर बसून जप केल्यास दुःखोत्पत्ति होते व लांकडाचे आसनावर बसल्यास दुर्भाग्य येतें. (५३) गवताचे आसनावर बसल्यास यशोहानि होते; पानाचे आसनावर बसल्यास चित्तभ्रम होतो. ह्या सांगितलेल्या आसनांत जीं निषिद्ध आहेत त्यांचा त्याग करावा. (५४) वेळूच्या वगैरे वर सांगितलेल्या निषिद्ध आसनांसंबन्धीं विशेष फल सांगितलें आहेच. आतां या आसनावर जप केल्यास मंत्रग्लानि किंवा तपाची हानि होते, असें सामान्यतः सांगितलें आहे. (५५) कृष्णाजिनावर बसल्यास ज्ञानसिद्धि, व्याघ्रचर्मावर बसलें असतां मोक्षलक्ष्मी, कुशासनावर जप केल्यास पुष्टि व वेताचें आसनावर बसल्यास शांति हीं प्राप्त होतात. (५६) वस्त्रासनावर बसल्यास व्याधिनाश, कांबळीवर बसल्यास दुःखमुक्ति, नीळ्या आसनावर बसल्यास अभिचारसिद्धि, व रक्तासनावर बसल्यास वशीकरणसिद्धि, शुभ्रासनावर बसल्यास शांतिदायक मोक्ष, चित्रविचित्र कांबळ्यावर बसल्यास सर्वार्थसिद्धि हीं होतात. (५७) घरांतला जप समफलदायक आहे, व गोठ्यांतील शंभरपट फल देणारा आहे.

शतसहस्रं च ह्यनंतं शिवसन्निधौ ॥५७॥ समुद्रतीरे प्रासादे गिरौ देवालयेषु च ॥ पुण्याश्रमेषु सर्वेषु जपः कोटिगुणो भवेत् ॥५८॥ शिवस्य संनिधौ चापि सूर्यस्याग्नेर्गुरोरपि ॥ दीपस्यापि जपस्यापि जपकर्म प्रशस्यते ॥५९॥ तत्पूर्वाभिमुखं वश्यं दक्षिणं चाभिचारिकं ॥ पश्चिमं धनदं विद्यादुत्तरं शांतिकं भवेत् ॥६०॥ माहात्म्यं वाचिकस्यैव जपयज्ञस्य कीर्तितं ॥ तस्माच्छतगुणोपांशुः सहस्रं मानसः स्मृतः ॥६१॥ यदुच्चनीचस्वरितैः शब्दैः स्पष्टपदाक्षरैः ॥ मंत्रमुच्चारयेद्वाचा जपयज्ञः स वाचिकः ॥६२॥ शनैरुच्चारयेन्मंत्रमीषद्धोष्ठौ प्रचालयन् ॥ किंचित्कर्णगतं विद्यादुपांशुः स जपः स्मृतः ॥६३॥ धिया यदक्षरश्रेण्यां वर्णाद्वर्णं पदात्पदं ॥ शब्दार्थं चिंतयेद्भूयः स उक्तो मानसो जपः॥६४॥ त्रयाणां जपयज्ञानां श्रेयः स्यादुत्तरोत्तरं ॥ भवेद्यंत्रविशेषेण वैशेष्यं तत्फलस्य च ॥६५॥ मनः संहरणं शौचं मौनं मंत्रार्थचिंतनं ॥ अत्युग्रत्वमनिर्वेदो जपसिद्धेस्तु हेतवः ॥६६॥ एवं लब्ध्वा शिवज्ञानं ज्ञात्वा

---

नदींतला एक लक्षपट फलदायक आहे, व शिवासमोर जप केल्यास अनंत फल देणारा आहे. (५८) समुद्रतीर, राजवाडा, पर्वत, देवालय पुण्याश्रम ह्या सर्व ठिकाणीं जप केल्यास तो कोटिगुण होतो. (५९) शिवाजवळ, सूर्यापुढें, गुरु किंवा दीप ह्यांपुढें जप करणें प्रशस्त मानिलें आहे. (६०) तोच जप पूर्वेकडे तोंड करून केल्यास वश्य होतो, दक्षिणेकडे तोंड करून केल्यास अभिचारक होतो, पश्चिमेकडे तोंड करून केल्यास धनदायक होतो, व उत्तरेकडे तोंड करून केल्यास शांतिदायक असा होतो. (६१) वाचिक जपयज्ञाचें जें माहात्म्य सांगितलें आहे त्याहून उपांशू जपाचें शंभरपट अधिक आहे, व उपांशू जपापेक्षां मानसिक जपाचें माहात्म्य सहस्रपट आहे. (६२) पदांचा व अक्षरांचा स्पष्ट शब्दानें व उदात्त, अनुदात्त, व स्वरित ह्या स्वरांनीं जो मंत्रोच्चार त्यास वाचिक जपयज्ञ असें ह्मणतात. (६३) हळूच, किंचित ओठ हलवून, आपल्याच कानाला ऐकूं जाईल असा जप करणें यास उपांशु जप असें ह्मणतात. (६४) मनांतल्या मनांत अक्षरपंक्तीवरून एका अक्षरावरून दुसऱ्यावर दृष्टि फेंकून जें शब्दार्थ चिंतन करणें त्यास मानसजप असें ह्मणतात. (६५) ह्या तीन प्रकारच्या जपांत एकापेक्षां दुसरा अधिक श्रेयस्कर असें समजावें. परंतु यंत्रविशेषानें त्याच्या फलांतही वैशेष्य दिसून येतें. (६६) मनाचें संहरण, शुद्धता, मौन, मंत्राचा अर्थ चिंतन करणें, उग्रता, शांति हीं जपाच्या सिद्धीचीं कारणें आहेत. (६७) याप्रमाणें शिव-

जपविधिक्रमं ॥ जितेंद्रियो जितक्रोधः शिवज्ञानपरायणः ॥६७॥ सदाचारो जपञ्जुव्हन् ध्यायन् भद्रं समश्नुते ॥ शृणुध्वं सर्वयज्ञेषु जपयज्ञो विशिष्यते ॥६८॥ हिंसयान्ये प्रवर्तंते जपयज्ञस्त्वहिंसया ॥ यावंतः सर्वयज्ञास्तु व्रतानि च तपांसि च ॥ सर्वे ते जपयज्ञस्य कलां नार्हंति षोडशीं ॥६९॥ जपेन देवता नित्यं स्तूयमाना प्रसीदति ॥ प्रसन्ना विपुलान्भोगान् दद्यान्मुक्तिं च शाश्वतीं ॥७०॥ रक्षोयक्षपिशाचाश्च ग्रहाः सर्पा विभीषणाः ॥ जापिनं नोपसर्पंति भयभीताः समंततः ॥७१॥ जपेन पापं च क्षयेदशेषं यद्यत्कृतं जन्मपरंपरासु ॥ जपेन रोगाञ्जयते च मृत्युं जपेन सिद्धिं लभते च मोक्षं ॥७२॥ वायवीयसंहितायां ॥ सत्यमेतत्त्वया प्रोक्तं तथापि शृणु सुंदरि ॥ रहस्यमिति ज्ञात्वैतद्गोपितं यन्मया पुरा ॥७३॥ अमन्त्रः कर्मपतितः पूजयेद्यदि मोहितः ॥ नारकी स्यान्न संदेहो मम पंचाक्षरं विना ॥७४॥ अब्भक्षा वायुभक्षाश्च ये चान्ये व्रतकर्शिताः ॥ तेषामेतैर्व्रतैर्नास्ति मम लोकसमागमः ॥७५॥ भक्त्या

---

ज्ञान प्राप्त करून व जपविधिक्रम जाणून व जितेंद्रिय व अक्रोधि होऊन शिवज्ञानीं रत व्हावें. (६८) जो सदाचारी ह्या मंत्राचा जप करितो, हवन करितो, किंवा ध्यान करितो तो कल्याण पावतो. तुह्मी असें जाणावें कीं, सर्व यज्ञांमध्यें जपयज्ञ विशेष आहे. (६९) दुसऱ्या यज्ञांत हिंसा करावी लागते परंतु ह्या यज्ञांत हिंसा करावी लागत नाहीं. जेवढें ह्मणून यज्ञ, व्रतें किंवा तपें आहेत त्यांस या जपयज्ञाच्या सोळाव्या अंशाची बरोबरी करितां येत नाहीं. (७०) ह्या जपानें स्तुति केली असतां दैवत प्रसन्न होतें व तें प्रसन्न झालें ह्मणजे अनेक भोग व शाश्वत मुक्ति देते. (७१) राक्षस, यक्ष, पिशाचें, ग्रह, भयंकर सर्प, हीं भयभीत होऊन जप करणाऱ्याजवळ येत नाहींत. (७२) अनेक जन्मांत केलेलें पातक जपानें निःशेष नाश पावतें व जपानेंच रोगापासून येणाऱ्या मृत्यूवर जय मिळतो व सिद्धि व मोक्ष हीं प्राप्त होतात. वायवीयसंहितेंत सांगितलें आहे कीं--(७३) हे सुंदरी हें तुझें ह्मणणें खरें आहे तथापि ऐक; मी हें रहस्य जाणूनही तुझ्यापासून गुप्त ठेविलें होतें. (७४) माझ्या पंचाक्षरी मंत्रावांचून जो अमंत्रित व कर्मपतित असून माझी पूजा मोहानें करितो तो निःसंशय नरकवासी होतो. (७५) जलपान करून किंवा वायुभक्षण करून किंवा दुसऱ्या व्रतांनीं जे कृश झाले त्यांना त्या व्रतांनीं माझ्या लोकाची प्राप्ति होत नाहीं. (७६) पंचाक्षरी मंत्रानें जो भक्तिपूर्वक एकवार माझी पूजा

पंचाक्षरेणैव योऽपि मां सकृदर्चयेत् ॥ सोऽपि गच्छेन्महास्थानं मंत्रस्यैव तु गौरवात् ॥७६॥ तस्मात्तपांसि यज्ञाश्च व्रतानि नियमास्तथा ॥ पंचाक्षरार्चनस्यैते कोट्यंशेनापि नो समाः ॥७७॥ अशुद्धो वापि शुद्धो वा सकृतत्पंचाक्षरेण यः ॥ पूजयेत् पतितो वापि मूढो वा मुच्यते नरः ॥७८॥ षडक्षरेण वा देवि तथा पंचाक्षरेण वा ॥ अलब्धाल्लब्ध एवैष कोटिकोटिगुणाधिकः ॥७९॥ तस्माल्लब्ध्वैव मां देवि मंत्रेणानेन पूजयेत् ॥ लब्ध्वा पूजयते यस्तु मैत्र्यादिगुणसंयुतः ॥८०॥ ब्रह्मचर्यरतो भक्त्या मत्सायुज्यमवाप्नुयात् ॥ किमत्र बहुनोक्तेन भक्ताः सर्वेऽधिकारिणः ॥८१॥ मम पंचाक्षरे मन्त्रे तस्माच्छ्रेष्ठतरो हि सः ॥ त्रियंबकेण वा मूलविद्यया प्रणवेन वा ॥८२॥ पूजां कुर्यात्प्रयत्नेन त्रिकालं नित्यमेव वा ॥ त्रियंबकं यजेद्देवं सुगंधिं पुष्टिवर्धनं ॥ किं करिष्यति मां मृत्युर्मृत्योर्मृत्युरहं तथा ॥८३॥ ॐ अस्य मृत्युंजयमंत्रस्य वसिष्ठऋषिः ॥ मृत्युंजयो देवता ॥ अनुष्टुप् छंदः ॥ मृत्युंजयार्थे जपे विनियोगः ॥ क्रियासारे ॥ ईश्वरः॥ अथ वक्ष्येऽक्षमालाया लक्षणं घटनाक्रमं ॥ जपे फल-

---

करितो तो त्या मंत्रसामर्थ्यानें महास्थानाला जातो. (७७) ह्मणून तपें, यज्ञ, व्रत, नियम, हीं पंचाक्षरी पूजेची कोट्यांशानें सुद्धां बरोबरी करूं शकत नाहींत. (७८) जो कोणी पंचाक्षरी मंत्रानें माझें पूजन करितो तो मग शुद्ध असो, अशुद्ध असो, पापी असो वा मूढ असो तो मनुष्य मुक्त होतो. (७९) षडक्षरी मंत्राचा किंवा पंचाक्षरी मंत्राचा उपदेश ज्यास नाहीं त्यापेक्षां उपदेश घेतलेलाच कोटि कोटि गुणांनीं अधिक आहे. (८०) ह्मणून मंत्र, प्राप्त झालेल्यानेंच हे देवि, या मंत्रानें माझी पूजा करावी. मंत्रप्राप्ति करून मैत्र्यादि गुणांनीं युक्त होऊन जो पूजा करितो (८१।८२) तो ब्रह्मचर्य आचरण करणारा माझ्याशीं सायुज्य पावतो. या विषयीं फार काय सांगावें; माझ्या पंचाक्षरी मंत्राच्या ठिकाणीं माझे सर्व भक्त अधिकारी होतात. परंतु त्या भक्तांपेक्षांही तो श्रेष्ठ आहे. त्रियंबक मंत्रानें, मूलमंत्रानें किंवा प्रणवानें (८३) प्रयत्नपूर्वक त्रिकाल किंवा नित्य पूजा करावी. सामर्थ्य देणाऱ्या त्रिनयन शिवाची नित्य पूजा करावी. मला मृत्यु काय करणार आहे ? मी कालाचा काल आहे असें पूजकानें मानावें. (८४) ह्या मृत्युंजय मंत्राचा ऋषि वशिष्ठ व देवता मृत्युंजय; अनुष्टुप् छंद असून मृत्युंजयाकरितां जप करण्याकडे ह्याचा उपयोग करावा. क्रियासारांत सांगितलें आहे कीं—ईश्वर (शंकर) ह्मणतात आतां रुद्राक्षमाला कशी असावी, व ती कशी करावी हें सांगतों. तसेंच

 ७

विशेषश्च स्थापनं कमलासन ॥८४॥ घुटिका मालिका या सा प्रशस्ता सशिखामणिः ॥ शिखामणिरयं ब्रह्मन् सीमाभूतो न संख्यया ॥८५॥ सह जप्यो विधिस्तस्याः स्मृतस्याद्यंतयोः स्रजः ॥ रुद्राक्षस्य विशेषोऽस्ति मणिमालाकृतौ मनाक् ॥ ८६ ॥ तथैवांबुरुहाक्षस्य कुशग्रंथेश्च सुव्रत ॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रश्चेति चतुर्विधः॥८७॥ श्वेतो रक्तः सुवर्णाभः कृष्णवर्णः क्रमाद् भवेत् ॥ एतेषु ब्राह्मणः श्रेष्ठो जपमालाकृतौ भृशं ॥ ८८ ॥ अलाभस्तु त्रिजातीनामपि वा स्वस्य जातयः ॥ अतिस्थूलोऽतिसूक्ष्मश्च स्फुटितो भंगुरो लघुः ॥८९॥ भिन्नः पुरा धृतो जीर्णो रुद्राक्षो न वरः स्मृतः ॥ भूयोंऽगुल्या जपं कुर्याच्च त्स्थूला मणयोऽखिलाः ॥९०॥ दृढा दृष्टिप्रिया स्निग्धा वृत्ताः श्रेष्ठा इति स्मृताः ॥ मणौ यदुन्नतं स्थानं मुखं पृष्ठं तु निम्नकं ॥९१॥ कमलाक्षस्य सूक्ष्मांशं सबिंदुद्वितयं मुखं ॥ सबिंदुकं च स्थूलाक्षं पृष्ठभागमिति

---

हे ब्रह्मदेवा, जपाचें विशेष फल तसेंच ती कोठें ठेविली असतां कोणतें विशेष फल प्राप्त होतें तें सांगतों. (८५।८६) हे ब्रह्मदेवा हा शिखामणि ( मेरुमणि ) मालेची सीमा आहे, तो जपसंख्येबरोबर जपावयाचा नाहीं. ह्मणजे त्या मालेच्या आदीं व अंतीं त्यावर जप करावा परंतु तो जप संख्येंत धरूं नये. मणिमालेमध्यें रुद्राक्षमाला विशेष गणिली आहे. (८७) हे सच्छील ब्रह्मदेवा त्याचप्रमाणें कमल मण्यांची माला व दर्भग्रन्थींची माला ह्याहि युक्त मानिल्या आहेत. रुद्राक्षांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार जाती आहेत. (८८) पांढरा, तांबडा, सोनेरी, काळा असे त्यांचे अनुक्रमें रंग आहेत. जपमाला करण्यास ह्या सर्व प्रकारच्या रुद्राक्षांत ब्राह्मण जातीचें रुद्राक्ष प्रशस्त होत. (८९) चातुर्वर्ण्यानें आपल्या जातीला अनुसरून आपल्या जातीचे रुद्राक्ष घ्यावेत ते न मिळाल्यास मिळतील ते घ्यावेत. अति मोठे, अति लहान, चिरलेले, फुटणारे, हलके (९०) फुटलेले, पूर्वीं वापरलेले, जुने असे रुद्राक्ष बरे नव्हत असें मानितात. मालेचे मणी सर्व स्थूल असतील तर बोटानें जप करावा (९१) बळकट, दिसण्यांत चांगले, सुंदर, वाटोळे असे रुद्राक्ष श्रेष्ठ होत. मण्यांत जें उच्च स्थान असेल तें त्याचें मुख व जें सखल स्थान असेल तें पृष्ठ असें मानितात. (९२) कमलमण्याचें जे अत्यंत सूक्ष्म अंश तें त्याचें दोन बिंदुयुक्त मुख असें समजावें व बिंदुयुक्त

स्मृतं ॥९२॥ एवं ज्ञात्वाननं पृष्ठं रुद्राक्षांभोरुहाक्षयोः ॥ घटयेदेकदिग्वक्त्रान्मणीन् सद्दंतपंक्तिवत् ॥९३॥ सर्वेषामंतरे ग्रंथिः कर्तव्याऽऽवर्तनद्वया॥ अन्योन्याघर्षः सिध्द्यर्थं घर्षो जपविनाशकृत् ॥९४॥ त्रिवृच्छुद्धेन सूत्रेण संप्रोत्य जपमालिकां ॥ बद्धानामथ संस्कारं यथाविधि समाचरेत् ॥९५॥ प्रक्षाल्य पंचगव्येन तथा पंचामृतेन च ॥ संस्नाप्य तीर्थतोयेन शिवकुंभस्थितेन च ॥९६॥ सकूर्चं मूलमंत्रेण गंधपुष्पाक्षतादिभिः ॥ धूपदीपनैवेद्यादि दत्वाथाष्टशतं स्पृशेत् ॥९७॥ मूलमंत्रं जपेत्पश्चाद्दण्डवत्प्रणमेद्बुधः ॥ एवं या संस्कृता माला जपकर्मणि सर्वदा ॥९८॥ अभीष्टफलदात्यर्थं सा सर्वाघविनाशिनी ॥ मध्यमानामिकांगुष्ठैरक्षमालामणीन् स्पृशेत् ॥९९॥ एवं जपस्य चैकस्य क्रमोऽयं चालयेज्जपे ॥ अंगुष्ठेन तु मोक्षाय तर्जनी शत्रुनाशिनी ॥१००॥ मध्यमा धनदा शातिकरीतीष्टा ह्यनामिका ॥ कनिष्ठा रक्षणे शस्ता जपकर्मणि

---

मोठा डोळा तो त्याचें पृष्ठ समजावें. (९३) ह्याप्रमाणें रुद्राक्ष व कमलमणी यांचें तोंड व पृष्ठभाग जाणून उत्तम दंतपक्तीप्रमाणें तोंडाला तोंड लावून माला तयार करावी. (९४) प्रत्येकाच्या पुढें दोन फेर देऊन गांठ द्यावी. परस्परास मणी न घासणें हें सिद्धीला कारण आहे. घर्षण झालें असतां जपनाश होतो(९५) तीन पदरी शुद्ध सूत्रानें जपमालेचे मणी ओंवावेत व ओंवून झाल्यानंतर त्यांचा यथाविधि संस्कार करावा (९६) पंचगव्यानें तसेंच पंचामृतानें ते धुवावेत व शुभकलशांतील तीर्थोदकानें कुंचल्यानें घासून त्यांस स्नान घालावें. (९७) मूलमंत्रानें गंध, पुष्पें, अक्षता, धूप, दीप, नैवेद्य वगैरे देऊन त्यांस १०८ वेळां स्पर्श करावा. (९८) नंतर मूलमंत्रानें जप करून नंतर शहाण्यानें साष्टांग नमस्कार करावा. ह्याप्रमाणें संस्कृत केलेली माला जपकर्माचें (९९) अभीष्ट फल देणारी होते व ती सर्व पापांचा नाश करिते. मध्यमा, अनामिका, व अंगुष्ठ, यांनीं रुद्राक्ष मालेच्या मण्यांस स्पर्श करावा. (१००) ह्याप्रमाणें जपक्रम चालवावा. आंगठ्यानें केलेला जप मोक्षास कारण आहे. तर्जनीनें (आंगठ्या जवळच्या बोटानें) जप केला असतां शत्रुनाश होतो. (१०१) मधल्या बोटानें जप केला असतां धनप्राप्ति होते व अनामिकेनें जप केला असतां शांतिकारक होतो. तसेंच कनिष्ठिकेनें जप केला असतां संकटांपासून रक्षण होतें ह्याप्रमाणें शुभ जपकर्मांत अंगुलींचें तार-

शोभने ॥१०१॥अंगुष्ठेन जपेज्जप्यं मध्यमांगुलिना सह ॥ अंगुष्ठेन विना कर्म कृतं यदफलं च यत् ॥१०२॥ मोक्षार्थं पंचविंशत्स्यात्सप्तविंशति पौष्टिके ॥ त्रिंशच्च धनसंपत्तौ पंचदश्याभिचारिके ॥१०३॥ जप्त्वाक्षमालां सकलां भ्रामयेदाशिखामणेः ॥ प्रदक्षिणं पुनर्वक्त्रं प्रारभ्यैवं समाचरेत् ॥१०४॥ स्वयं वामेन हस्तेन जपमालां न संस्पृशेत् ॥ अदीक्षितो द्विजो वापि स्पृष्टश्चेच्छुद्धिमाचरेत् ॥१०५॥ न धारयेत्करे मूर्ध्नि कंठे च जपमालिकां ॥ जपकाले जपं कृत्वा सदा शुद्धस्थले क्षिपेत् ॥१०६॥ अलाभे जपमालाया: करशाखासुपर्वभिः ॥ मध्यांगुल्यग्रपर्वादिप्रादक्षिण्यक्रमेण तु ॥१०७॥ अथवा करशाखाभिर्जप्तव्यो जापकैर्जपः ॥ अंगुल्या जपसंख्यानमेकमेकमुदाहृतं ॥ १०८ ॥ रेखयाष्टगुणं विद्यात्पुत्रजीवैर्दशाधिकं ॥ शतं स्याच्छंखमणिभिः प्रवालैस्तु सहस्रकं ॥१०९॥ स्फाटिकैर्दशसहस्रं मौक्तिकैर्लक्षमुच्यते ॥ दशलक्षं राजताक्षैः

---

तम्य सांगितलें आहे. (१०२) मधलें बोट व आंगठा ह्यांनीं नित्य जप करावा. अंगुष्ठ लाविल्यावांचून केलेलें कर्म निष्फळ होतें. (१०३) पंचवीस संख्याक जप मोक्षास कारण आहे. सत्तावीस संख्याक जप पुष्टिदायक आहे. तीस संख्याक जप धनसंपत् देणारा आहे व पंधरा संख्याक जप आभिचारासिद्धिदायक आहे. (१०४) सर्व रुद्राक्षमाला जपून मेरुमण्यासह ती फिरवावी, व पुनः प्रदक्षिणक्रमानें जपक्रमास आरंभ करावा. (१०५) स्वतः डाव्या हातानें जपमालेस स्पर्श करूं नये. दीक्षा न घेतलेल्या द्विजाचा स्पर्श झाल्यास पुनः शुद्धिसंस्कार करावा. (१०६) जपमाला हातांत, डोक्यावर किंवा गळ्यांत धारण करूं नये तर जपाचे वेळीं जप करून शुद्धस्थळीं ठेवावी. (१०७) जपमाला न मिळाल्यास हाताच्या बोटांच्या पेरांनीं जप करावा. तो असा—मधल्या बोटाच्या शेवटच्या पेरापासून दक्षिण क्रमानें (१०८) किंवा बोटांनींच जापकानें जप करावा. अंगुलींनीं केलेल्या जपाचें फल एकपट (१०९) तर अंगुलिरेखांनीं केलेल्याचें आठपट आहे असें समजावें. पुत्रजीवमण्यांनीं केलेला जप पूर्वोक्ताहून दशपट अधिक आहे. शंखमण्यांनीं केलेल्या जपाचें फल शंभरपट तर प्रवाळाच्या मण्यांनीं केलेल्या जपाचें फल हजारपट आहे. (११०) स्फटिकाच्या मण्यांनीं केलेल्या जपाचें फल दहाहजारपट आहे व मोत्यांच्या मालेनें केलेल्या जपाचें फल लक्षपट सांगितलें आहे. रुप्याच्या

सौवर्णैः कोटिरुच्यते ॥११०॥ कुशग्रंथ्या च रुद्राक्षैरनंतगुणितं भवेत् ॥ प्रदक्षिणनमस्कारौ जपश्चेति त्रयो मया ॥ १११ ॥ संख्याहीनकृतं सर्वं रक्षोभ्यस्तन्मयार्पितं॥ अतश्च संख्यया विद्वान् जपेत्सुफलसिद्धये॥११२॥ संख्याफलविशेषश्च जपस्रजि जपाद्भवेत् ॥ जपमालाविधिस्त्वेवं प्रोक्तः कमलसंभव ॥ एवं सर्वं परिज्ञाय फलार्थी सततं जपेत् ॥११३॥

इति श्रीशैवरत्नाकरे पंचाक्षरीमाहात्म्यैकादशोऽध्यायः ॥

---

मण्यांनीं केलेल्या जपाचें दहालक्षपट व सोन्याच्या मण्यांनीं केलेल्या जपाचें फल तर कोटिपट सांगितलें आहे. (१११) कुशग्रंथींनीं केलेला व रुद्राक्षांनीं केलेला जप अनंतपट होतो. प्रदक्षिणा, नमस्कार, जप हीं तिन्हीं (११२) संख्येवांचून केलीं तर तीं मला अर्पण न होतां राक्षसांस अर्पण होतात. करितां विद्वान् मनुष्यानें फलसिद्धि चांगली व्हावी ह्मणून (११३) संख्यापूर्वक जप करावा. जपमालेमध्यें जपाहून संख्याफल विशेष आहे. हे ब्रह्मदेवा ह्याप्रमाणें जपमालाविधि सर्व सांगितला. तो नीट जाणून फलाची इच्छा करणाऱ्यानें नित्य जप करावा.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकरग्रंथांतील पंचाक्षरीमाहात्म्य नांवाचा अकरावा अध्याय पूर्ण झाला.



# अथ द्वादशोऽध्यायः

श्रीगणेशाय नमः ॥ अथ अंतर्यागः ॥ शिवधर्मशास्त्रे ॥ सर्वेषामेव यज्ञानां ज्ञानयज्ञः परः स्मृतः ॥ नित्यशुद्धः प्रसन्नश्च सर्वदोषविवर्जितः ॥१॥ शुक्लकृष्णपरः सूक्ष्मः सुविशुद्धः समाधिजः ॥ ज्ञानयज्ञः परो यज्ञः स्थूलशुद्धश्च कर्मिणां ॥ २ ॥ विशुद्धसाधनैः सूक्ष्मैर्ज्ञानयज्ञः प्रसाध्यते ॥ यस्मात्तस्माद्विशुद्धोऽयमपवर्गफलप्रदः ॥३॥ अंतर्यागोपचारेण यः पूजयति शंकरं ॥ ध्यानयज्ञेन सततं स याति परमां गतिं ॥४॥ वायवीयसंहितायां ॥ कर्मयज्ञस्तपोयज्ञो जपयज्ञस्तदुत्तरः ॥ ध्यानयज्ञो ज्ञानयज्ञः पंचयज्ञाः प्रकीर्तिताः ॥ ५ ॥ कर्मयज्ञरताः केचित्तपोयज्ञरताः परे ॥ जपयज्ञरताश्चान्ये ध्यानयज्ञरतास्तथा ॥ ६ ॥ ज्ञानयज्ञरताश्चान्ये विशिष्टादुत्तरोत्तरं ॥ कर्मयज्ञात्तपोयज्ञो विशिष्टो दशभिर्गुणैः ॥७॥ जपयज्ञस्तपोयज्ञाध्यानयज्ञः शताधिकः ॥ ज्ञानध्यानात्मकः सूक्ष्मः शिवयोगो मखः स्मृतः ॥ कर्मयज्ञो द्विधा प्रोक्तः कामाकामविभेदतः ॥८॥ कामान् कामितरो भुक्त्वा कामासक्तः पुनर्भवेत् ॥ अकामो रुद्रभवने

---

(१) यानंतर अंतर्याग सांगतों, शिवधर्म शास्त्रांत सांगितलें आहे कीं, सर्व यज्ञांमध्यें ज्ञानयज्ञ श्रेष्ठ होय; कारण तो नेहमीं शुद्ध, प्रसन्न व सर्व दोषरहित आहे. (२) तो शुक्लकृष्णपर, सूक्ष्म, अत्यंत शुद्ध व समाधीपासून उत्पन्न होणारा आहे. कर्मठ लोकांना स्थूल व शुद्ध असा ज्ञानयज्ञ हा श्रेष्ठ यज्ञ होय. (३) तो ज्ञानयज्ञ शुद्ध व सूक्ष्म साधनांनीं साध्य होतो. मोक्षफल देणारा हा ज्ञानयज्ञ कोणत्याही यज्ञांहून शुद्ध आहे. (४) अंतर्यागसाहित्यानें व नित्य ज्ञानयज्ञानें जो शंकराची पूजा करितो तो उत्तम गतीला जातो. वायवीयसंहितेंत सांगितलें आहे कीं— (५) कर्मयज्ञ, तपोयज्ञ, जपयज्ञ, ध्यानयज्ञ, ज्ञानयज्ञ, असे पांच प्रकारचे यज्ञ सांगितले आहेत. (६) कोणी कर्मयज्ञ आचरणारे, कोणी तपोयज्ञ पाळणारे, कोणी जपयज्ञाचरण करणारे, तसेंच कोणी ध्यानयज्ञरत असतात. (७) व दुसरे कोणी ज्ञानयज्ञांत मग्न असतात हे सर्व यज्ञ एकाहून एक श्रेष्ठ आहेत. जसें कर्मयज्ञापेक्षां तपोयज्ञ दसपट श्रेष्ठ आहे, (८) तपोयज्ञापेक्षां जपयज्ञ श्रेष्ठ त्याहून ध्यानयज्ञ शंभरपटीनें श्रेष्ठ, ज्ञानध्यानयज्ञात्मक जो सूक्ष्म यज्ञ त्यास शिवयोगयज्ञ असें ह्मणतात. काम व अकाम असे कर्मयज्ञाचे दोन भाग आहेत. (९) कामी मनुष्य सर्व कामांचा उपभोग घेऊन पुनः कामासक्त होतो. इच्छारहित मनुष्य रुद्रलोकांत भोग

भोगान् भुक्त्वा ततश्च्युतः ॥९॥ तपोयज्ञरतो भूत्वा जायते नात्र संशयः ॥ तपस्वी च पुनस्तस्मिन् भोगान् भुक्त्वा ततश्च्युतः॥१०॥ जपध्यानरतो भूत्वा जायते भुवि मानवः ॥ जपध्यानरतो मर्त्यस्तद्वैशिष्टयवशादिह ॥११॥ ज्ञानं लब्ध्वाऽचिरादेव शिवसायुज्यमाप्नुयात् ॥ तस्मान्मुक्तेश्चिराद्धेतुः कर्मयज्ञोऽपि देहिनां ॥१२॥ सकामः कामसंयुक्तो बंधायैव भविष्यति ॥ तस्मात्पंचसु यज्ञेषु ध्यानयज्ञरतो भवेत् ॥ १३ ॥ ध्यानं ज्ञानं च यस्यास्ति तीर्णस्तेन भवार्णवः ॥ हिंसादोषविनिर्मुक्तो विशुद्धश्चित्तसाधनः ॥१४॥ ज्ञानयज्ञपरस्तस्मादपवर्गफलप्रदः ॥ पूजया विपुलं राज्यमग्निकार्येण संपदः ॥ १५ ॥ जपेन पापसंशुद्धिर्ज्ञानध्यानेन मुच्यते ॥ प्रक्षीणाशेषपापस्य ज्ञाने ध्याने भवेन्मतिः ॥१६॥ पापोपहतबुद्धीनां तद्वार्ताऽपि सुदुर्लभा ॥ बहिः कर्मरता यद्वन्नातीव फलभागिनः ॥ १७ ॥ दृष्ट्वा नरेंद्रभवने तद्वदत्रापि कर्मिणः ॥ ध्यानिनां हि वपुः सूक्ष्मं भवेत्प्रत्यक्षमैश्वरं ॥ १८ ॥ यथेह कर्मिणां स्थूलं मृत्काष्ठाद्यैः प्रक-

---

भोगून तेथून पतन पावतो, (१०) व नंतर तपोयज्ञाचरण करून निःसंशय तपस्वी होतो. पुनः रुद्रलोकांत भोगभोगून तेथून पतन पावतो (११) व जपयज्ञ व ध्यानयज्ञ यांचें आचरण करून या पृथ्वीवर मनुष्य रूपानें संचार करितो व हा जपध्यानरत मनुष्य जपध्यानाच्या योगानें या लोकीं (१२) ज्ञान प्राप्त करून घेऊन थोड्याच काळांत शिवसायुज्य पावतो. या दीर्घकाल मुक्तीचें कारण मनुष्यांचा कर्मयज्ञ होय. (१३) सकामी मनुष्य कामयुक्त होऊन बंधाला कारण होतो. ह्मणून पंचयज्ञांमध्यें मनुष्यानें ध्यानयज्ञरत व्हावें. (१४) ज्यास ध्यान व ज्ञान हीं लाभलीं तो भवसागरांतून पार पडला, तो हिंसादोषांतून मुक्त झाला; तो विशुद्ध व चित्तसाधन होय. (१५) ह्मणून ज्ञानयज्ञरत मनुष्य मोक्षफल देणारा होय. शिवपूजेनें विपुल राज्य व अग्निकार्यानें संपदा लाभते,(१६)जपानें पापांचा नाश होतो व ध्यानानें मुक्ति होते. ज्याच्या सर्व पापांचा क्षय झाला आहे त्यासच ज्ञानध्यानाचे ठिकाणीं बुद्धि उत्पन्न होते. (१७।१८) पापानें ज्याची बुद्धि नष्ट झाली आहे त्याचे मनास यांचा गंधही नसतो. ज्याप्रमाणें राजगृहीं काम करणारे लोकांस अत्यंत फलप्राप्ति होत नाहीं त्याप्रमाणें बाह्यकर्म करणाऱ्यांस अत्यंत फलाची प्राप्ति होत नाहीं. ध्यानी लोकांचें शरीर सूक्ष्म असून तें साक्षात् शंकरस्वरूपी असतें. (१९) येथें कर्मठ लोकांना मातीचें व काष्ठाचें वगैरे शिवस्वरूप कल्पिलेलें असतें व तें

लिप्तं॥ ध्यानयज्ञपरस्तस्माद्देवान् पाषाणमृण्मयान् ॥१९॥ नात्यंतं तं प्र-
पद्येत पश्चादेवात्मवेदनात् ॥ सर्वत्रावस्थितं शांतं यो न पश्यति शंकरं
॥२०॥ ज्ञानचक्षुर्विहीनत्वादंधः सूर्यं यथोदितं ॥ *अग्नौ क्रियावताम-
प्सु व्योम्नि सूर्ये मनीषिणां ॥२१॥ काष्ठादिष्वेव मूर्खाणां हृदि लिंगं तु
योगिनां ॥ + आत्मस्थं यः शिवं त्यक्त्वा बहिरभ्यर्चयेन्नरः ॥ हस्तस्थं
फलमुत्सृज्य लिहेत्कूर्परमात्मनः ॥२२॥ वृ० ॥ एवं कनिष्ठानि तपांसि य-
ज्ञान् क्लेशात्मकानल्पफलप्रदांश्च ॥ संत्यज्य सर्वानिह योगमेकं ध्याये-
त्परं मुक्तिकरं विशुद्धं ॥२३॥ तस्मादशुद्धं स्वर्नैयमनित्यं बाह्यसाधनं॥
यज्ञाद्यं कर्म संत्यज्य योगं मुक्त्यर्थमभ्यसेत् ॥२४॥ नित्यानि यानि क-
र्माणि विहितानि शरीरिणां ॥ तेषामात्मन्यनुष्ठानं मनसा यद्बहिर्विना॥
॥२५॥ गच्छन् तिष्ठन् स्वपन् जाग्रन्नुन्मिषन्निमिषन्नपि ॥ शुचिर्वाप्यशु-

---

दगडमातीच्या प्रतिमांचें ध्यान करितात. (२०) परंतु आत्मज्ञान झाल्यावर त्यांची
यत्किंचितही कल्पना करूं नये. सर्वव्यापी शांतस्वरूपी शंकर ज्यास दिसत नाहीं
(२१) तो ज्ञानचक्षु नसल्यामुळें सूर्योदय झाला असतांही आंधळ्याप्रमाणें होय.
कर्मठांचा देव अग्नीमध्यें व पाण्यांत असतो व बुद्धिमानांचा आकाशांत किंवा
सूर्यमंडळावर असतो. (२२) काष्ठादि वस्तूंमध्यें मूर्खांचा देव असतो. परंतु यो-
ग्याचें शिवलिंग हृदयांत असतें. आपल्या ठिकाणीं असलेल्या शिवाचा आव्हेर
करून जो बाहेरच्यांची पूजा करितो त्याचें तें करणें एखाद्या मूर्खानें हातांतील फळ
टाकून कोंपर चाटावें यासारखें आहे. (२३) ह्याप्रमाणें तपें कनिष्ठ आहेत,
यज्ञ क्लेशदायक व अल्प फल देणारे आहेत ह्मणून त्यांचा सर्वांचा त्याग करून
उत्कृष्ट, विशुद्ध व मुक्तिदायक अशा योगाचें ध्यान करावें. (२४) स्वर्गप्राप्ति क-
रून देणारें बाह्य यज्ञादि कर्मसाधन अनित्य, अशुद्ध ह्मणून त्याचा त्याग करावा व मुक्ति
मिळण्याकरितां योगाचा अभ्यास करावा. (२५) मनुष्यांना जीं नित्य कर्मे सांगि-
तलीं आहेत त्यांचें मनानें आत्म्याचें ठायीं ध्यान करावें. (२६) जातांना, उभे
राहतांना, निजतांना, जागतांना, पापण्या उघडतांना व पापण्या मिटतांना शुचिर्भू

---

* अग्नौ क्रियावतां देवा दिवि देवा मनीषिणां ॥ प्रतिमास्वल्पबुद्धीनां योगि-
नामात्मनि स्थिताः ॥ पाठांतरं ॥

+ आत्मस्थं यः शिवं त्यक्त्वा बहिःस्थं यजते शिवं ॥ स्वहस्ते पिंडमुत्सृज्य
लिहेत्कूर्परमात्मनः ॥ पाठांतरं ॥

चिर्वापि शिवलिंगं सुचिंतयेत् ॥२६॥ ध्यै तु सर्वत्र चिंतायां धातुरेव हि पठ्यते ॥ या तत्वे निश्चला चिंता शैवध्यानं प्रवर्तते ॥२७॥ द्विधा भवति तध्यानं सगुणं निर्गुणं तथा ॥ सगुणं वर्णभेदेन निर्गुणं केवलं विदुः ॥२८॥ अश्वमेधसहस्राणि वाजपेयशतानि च ॥ एतस्य ध्यानयोगस्य कलां नार्हंति षोडशीं ॥२९॥ अंतश्चित्तं वहिश्चक्षुरधिष्ठाय सुखासनं ॥ समत्वं च शरीरस्य ध्यानमुद्रेति सिद्धिदा ॥३०॥ वृत्तं ॥ बद्धासनो नित्यमवक्रकायो यो मानसं प्राणसमं नियम्य ॥ उद्बुद्धहृत्पंकजकर्णिकायां ध्यायन्यजेत्तत्परमं स मुक्तः॥३१॥ तथैव वृहस्पतिस्तोत्रे॥ प्राणायामनियंत्रितानिलगणादुत्तानितानाहतांऽभोजेभ्यंतरनादषट्पदरवे वायादिहंसावृते ॥ यन्निर्भाति निवातदीपसुभगं ज्योतिःषडंगान्वितं तत्तेजोमयमंडलत्रयपरं तन्नौमि तत्वं शिवं ॥३२॥ योगशास्त्रे ॥ आराधयामि मणिसन्निभमात्मलिंगं मायापुरे हृदयपंकजसंनिविष्टं ॥ श्रद्धा-

---

त असो वा नसो मनुष्यानें शिवलिंगाचें ध्यान करावें ( सर्व काळ सर्वावस्थेंत मनुष्यानें शिवलिंग चिंतन करावें ). (२७) ध्यै धातूचा अर्थ चिंतन करणें असा नेहमीं असतो, असें सांगितलें आहे. शिवतत्वाचे ठिकाणीं स्थिर झालेलें जें चिंतन त्यास शैवध्यान असें ह्मणतात. (२८) तें ध्यान सगुण व निर्गुण असें दोन प्रकारचें आहे. वर्ण भेदानें जें ध्यान त्यास सगुण असें ह्मणतात व केवलवस्तूविषयींचें जे ध्यान त्यास निर्गुण असें ह्मणतात. (२९) हजारो अश्वमेधयज्ञ किंवा शेकडो वाजपेययज्ञ ह्या ध्यानयोगाच्या सोळाव्या अंशाचीहि बरोबरी करूं शकत नाहींत. (३०) अंतरभागीं मन लावून व बहिर्दृष्टि होऊन व शरीर ताठ ठेवून सुखासन घालून बसणें यास ध्यानमुद्रा असें ह्मणतात. ती सिद्धि देणारी आहे. (३१) सुखासनावर बसलेला, नित्य शरीर ताठ (सरळ) धरून प्राणादि वायूंसह मनाचें नियमन करणारा व हृत्कमलकर्णिकेंत परशिवाचें ध्यान करून पूजन करणारा तोच मुक्त असें ह्मणतात. (३२) ह्याचप्रमाणें वृहस्पतिस्तोत्रांत असें सांगितलें आहे कीं—प्राणायामानें प्राणादि वायूंचें नियमन झालें असतां उताण्या व अनाहत ( कांहीं उपाधि न झालेल्या ) व षट्पद--( भुंगा )--रव -( ध्वनि ). युक्त व वायादिहंसांनीं वेष्टिलेल्या कमलामध्यें निर्वात (निश्चल) दीपशिखेप्रमाणें स्थिर व तेजोमय मंडलत्रयानें युक्त असें षडंगयुक्त जें शिवतत्व प्रकाशमान असतें त्यास मी नमस्कार करितों. (३३) योगशास्त्रांत सांगतात कीं, मायापुरांतील हृत्कमलांत असलेल्या रत्नमण्याप्रमाणें तेजस्वी आत्मलिंगाचें मी ध्यान करितों. श्रद्धारूपी

नदीविमलचित्तजलाभिषेकं नित्यं समाधिकुसुमैरपुनर्भवाय॥३३॥ योगशास्त्रे ॥ ज्ञानाद्ध्यानं भवेत्ध्यानात् ज्ञानं भूयः प्रवर्तते ॥ तदुभाभ्यां भवेन्मुक्तिस्तस्माध्यानरतो भवेत् ॥३४॥ शिवधर्मशास्त्रे ॥ चिंतयेद्धृदये पूर्वं क्रमाद्वापि गुणत्रयं ॥ तमः प्रच्छाद्य रजसा सत्वेनाच्छादयेद्रजः ॥३५॥ ध्यायेत्तत्तथा शुद्धं त्यक्त्वा शुद्धं विचिंतयेत् ॥ ऐश्वर्यपंकजं दिव्यं पुरुषोपरिसंस्थितं ॥३६॥ ध्यायेत्रिमंडलं पूर्वं कृष्णं रक्तं सितं क्रमात्॥ सत्वोपरिगुणातीतं पुरुषं पंचविंशकं ॥३७॥ द्वादशांगुलविस्तीर्णं शुद्धं विकसितं सितं ॥ नालमष्टांगुलं तस्य नाभिकंदसमुद्भवं ॥३८॥ पद्मपत्राष्टकं ज्ञेयमणिमादिगुणाष्टकं ॥ कर्णिकाकेसरं ज्ञानं नालवैराग्यमुत्तमं ॥३९॥ शिवधर्मस्तु तत्कंदमिति पद्मं विचिंतयेत् ॥ ज्ञानैश्वर्यं च वैराग्यं शुद्धं धर्ममयं परं ॥४०॥ ज्ञात्वा पद्मासनं सर्वं सर्वदुःखांतमाप्नुयात् ॥ तत्पद्मकर्णिकामध्ये शुद्धं दीपशिखाकृति ॥ अंगुष्ठमात्रमतुलं ध्यायेद्धोंकारमीश्वरं ॥४१॥ कदंबगोलकाकारं नानारूपसमन्वितं ॥ ध्यायेद्वा

---

नदीच्या शुद्ध मानसरूप जलानें अभिषेक घालितों, व मोक्षप्राप्तीकरितां समाधिरूप पुष्पांनीं त्याचें पूजन करितों. (३४) योगशास्त्रांत सांगितलें आहे कीं, ज्ञानापासून ध्यान संभवतें. व ध्यानापासून पुनः ज्ञानोत्पत्ति होते. व त्या दोहोंपासून मोक्ष संभवतो. ह्मणून मनुष्यानें नेहमीं ध्यानांत निमग्न असावें. (३५) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं-क्रमशः सत्व, रज, व तम ह्या गुणत्रयांचें हृदयांत ध्यान करावें; रजोगुणानें तमोगुणास आच्छादन घालून सत्वगुणानें रजोगुणास आच्छादन घालावें. (३६) नंतर अशुद्धाचा त्याग करून ऐश्वर्यकमलसंभूत दिव्य अशा शुद्ध परशिवतत्वाचें ध्यान करावें. (३७) प्रथमतः काळ्या, तांबड्या, व पांढऱ्या अशा तीन मंडलांचें क्रमशः ध्यान करावें. नंतर सत्वगुणातीत पंचवीस तत्वात्मक परशिवाचें ध्यान करावें. (३८) बारा अंगुलें विस्ताराचें, शुद्ध, प्रफुल्लित, शुभ्र; आठ अंगुल नालाचें; नाभिकंदापासून उत्पन्न झालेलें; (३९) अणिमादि आठ पाकळ्यांचें कमल जाणावें; ज्ञान हें त्या कमलकर्णिकेंतील केसर जाणावा. व उत्तम वैराग्य हें त्याचा नालदंड आहे असें समजावें. (४०) शिवधर्म हा त्याचा कंद(कांदा, गड्डा) आहे अशा प्रकारच्या कमलाचें चिंतन करावें; ज्ञानैश्वर्य व वैराग्य यांनीं युक्त, शुद्ध, धर्ममय व (४१) पद्मासनस्थ असें परतत्व जाणिल्यानें मनुष्याच्या सर्व दुःखांचा अंत होतो. त्या पद्मकर्णिकेमध्यें दिव्याच्या ज्योतीच्या आकाराचें शुद्ध, अंगुष्ठमात्र, अतुल अशा ओंकारस्वरूपी ईश्वराचें ध्यान करावें. (४२) अथवा तो ओंकारस्वरूपी नानारूपधारी, कदंबाच्या फुलाप्रमाणें वर्तुलाकार, गवाक्षांतून पड

रश्मिजालेन दीप्यमानं समंततः ॥४२॥ ध्यायेद्वा सततं शांतं वक्ष्यमाणैकरूपकं ॥ जपेद्ध्यायेच्च सततमोंकारं शिवरूपिणं ॥४३॥ ध्यानं निर्मथनाभ्यासाद्देवं पश्यति गूढवत् ॥ तैलधारामिवाच्छिन्नं दीर्घघंटानिनादवत् ॥४४॥ अवाच्यं प्रणवस्यांगं यस्तु वेद स वेदवित् ॥ वेदः शिवः शिवो वेदो वेदाध्यायी सदाशिवः ॥ तस्माद्वेदपरं नित्यं वेदाध्यायिनमर्चयेत् ॥४५॥ अंगुष्ठोदरमात्रस्तु विशिष्टः पद्मजो मणिः ॥ स मणिः सुखवाह्यश्च महदर्थस्य साधकः ॥४६॥ अहिंसा प्रथमं पुष्पं पुष्पमिंद्रियनिग्रहः ॥ सर्वभूतदयापुष्पं क्षमापुष्पं चतुर्थकम् ॥४७॥ ध्यानपुष्पं तपःपुष्पं ज्ञानपुष्पं तु सप्तमं ॥ सत्यं चैवाष्टमं पुष्पमेभिस्तुष्यति शंकरः ॥४८॥ एवमष्टविधं ज्ञात्वा मानसं शिवमर्चयेत् ॥ य इहांतश्चरा राज्ञां प्रियाः स्युर्न बहिश्चराः ॥४९॥ तथांतर्ध्याननिरताः प्रियाः शंभोर्न कर्मणिः ॥ यथांतरुपचारेण नरःस्त्रीषु प्रसीदति ॥ तथांतर्ध्यानविधिना

---

लेल्या सूर्यकिरण समूहाप्रमाणें आसमंतभागीं प्रकाशमान असा जाणून त्याचें ध्यान करावें (४३) अथवा पुढें सांगितलेल्या रूपाचा, नित्य शांत अशा शिवरूपी ओंकाराचें ध्यान व जप करावा. (४४) सतत ध्यानाच्या अभ्यासानें मनुष्याला गूढ परमेश्वर स्वरूपाचें दर्शन होतें. तेलाच्या धारेप्रमाणें अव्याहत किंवा मोठ्या घंटानादाप्रमाणें (४५) ओंकाराचें अवाच्य स्वरूप जो जाणतो तोच ज्ञानी होय. वेद ह्मणजे शिव व शिव ह्मणजे वेद; सदाशिव वेदाध्ययन करणारा आहे, ह्मणून वेदाध्ययननिमग्न अशा वेदाध्ययन करणाऱ्याचें मनुष्यानें पूजन करावें. (४६) अंगुष्ठोदरमात्र ( आंगठ्या एवढा ) विशिष्ट असा पद्मसंभव जो मणि तो सुखवाह्य असूनहि मोठा अर्थसाधक आहे. (४७) प्राणिवध न करणें हें पहिलें पुष्प; इंद्रियनिग्रह करणें हें दुसरें पुष्प; सर्व प्राणिमात्राचे ठिकाणीं दयापर होणें हें तिसरें पुष्प; सर्वांची क्षमा करणें हें चवथें पुष्प; (४८) ध्यान हें पांचवें पुष्प; तप हें सहावें पुष्प; ज्ञान हें सातवें पुष्प; व सत्य हें आठवें पुष्प; अशा ह्या आठ पुष्पांनीं पूजन केलें असतां शंकर संतुष्ट होतो. (४९) ह्याप्रमाणें आठ प्रकारचें मानसपूजन जाणून शिवार्चन करावें; कारण राजवाड्यांत राजाच्या संनिध जे कामदार असतात ते राजास जितके प्रिय असतात तितके राजवाड्याबाहेरील असत नाहींत. (५०) त्याप्रमाणेंच अंतरध्यान करणारेच शंकरास प्रिय असतात; केवल बाह्यकर्म करणारे कर्मठ शिवास प्रिय होत नाहींत; ज्याप्रमाणें पुरुष अंतरुपचारांनीं स्त्रियांच्या ठिकाणीं प्रसन्न होतो त्याचप्रमाणें अंतर्ध्यानानें महादेव प्रसन्न

प्रसीदति महेश्वरः ॥५०॥ वायवीयसंहितायां ॥ अंतर्यागरतः पुंसां ब-हिःकुर्वीत वा न वा ॥ रतिरंभ्यरे यस्य न बाह्यः पुण्यगौरवात् ॥ ५१॥ ज्ञानामृतेन तृप्तस्य भक्त्या च विवशात्मनः ॥ नांतरं न बहिः कृष्णकृ-त्यमस्ति कदाचन ॥ ५२ ॥ तस्मात्क्रमेण संत्यज्य बाह्यमभ्यंतरं तथा ॥ ज्ञानेन ज्ञेयमालोक्य ज्ञानं चापि परित्यजेत् ॥ ५३ ॥ नैकाग्रं चेच्छिवे चित्तं किं कृतेनापि कर्मणा ॥ एकाग्रं चेच्छिवे चित्तं किं कृतेनापि क-र्मणा ॥५४॥ तस्मात्कर्माणि कृत्वा वा कृत्वा वांतर्बहिः क्रमात् ॥ येन केनाप्युपायेन शिवे चित्तं निवेदयेत् ॥५५॥ शिवे निविष्टचित्तानां प्र-तिष्ठितधियां सतां ॥ परत्रेह च सर्वत्र निर्वृत्तिः परमा भवेत् ॥ ५६ ॥ अथ वा ॥ बाह्ये वाभ्यंतरे वापि यत्र स्यान्मनसो रतिः ॥ प्राग्वासना-वशादेव तत्र निष्ठां समाचरेत् ॥५७॥ बहिर्यागोपचारेण देवं देवीं च पूजयेत् ॥ अथवांतर्बहिश्चैव पूजयेत्परमेश्वरं ॥५८॥ अशक्तः शिवपूजायां भक्त्या दृष्ट्वैव शंकरं ॥ इतःप्रभृति संस्थानं वक्ष्येऽहं नियमादिति ॥५९॥

इति श्रीशैवरत्नाकरे अंतर्यागनिरूपणं नाम द्वादशोऽध्यायः ॥

---

होतात. वायवीयसंहितेंत असें सांगितलें आहे कीं (५१) अंतर्ध्यान करणाऱ्यानें बहिर्योग करावा किंवा करूं नये. ज्याला अंतर्यामीं प्रीति आहे त्यास बाह्यकर्म केवळ पुण्यगौरवार्थ आहे. (५२) ज्ञानामृतानें जो तृप्त झाला व भक्तीनें जो स्वाधीनात्म झाला त्याला हे कृष्णा, आंत व बाहेर करण्याचें कृत्य कोणतेंच राहिलें नाहीं (५३) ह्याकरितां हळू हळू प्रथमतः बाह्यकर्मांचा नंतर अंतःकर्मांचा त्याग करून ज्ञानानें ज्ञेय वस्तु ( परशिवतत्व ) जाणून नंतर त्या ज्ञानाचाही त्याग करावा. (५४) शिवाचे ठिकाणीं जर चित्त एकाग्र नाहीं तर त्यानें कर्म करूनही त्यास कोणता उपयोग? व जर शिवाचे ठिकाणीं चित्त एकनिष्ठ झालें तरीहि त्यास कर्म करून कांहींच फायदा नाहीं. (५५) ह्मणून अंतर्बाह्य कर्म करून किंवा टाकून, कोणत्या तरी उपायानें शिवाचे ठिकाणीं चित्त लावावें. (५६) ज्यांचें शिवाचे ठिकाणीं चित्त लागलें आहे व ज्यांची बुद्धि स्थिर झाली आहे अशा साधूंना इहपरलोकीं उत्तम सुखाची प्राप्ति होते. (५७) अथवा आंत किंवा बाहेर जेथें आपलें मन रमेल तेथें प्रालब्ध वासनेनें मनोनिष्ठा ठेवावी. (५८) बाह्य योगोपचारानें उमामहेश्वराची पूजा करावी. अथवा अंतर्बाह्य परमेश्वराचें पूजन करावें. (५९) शिवपूजा करण्यास अशक्त असलेल्या मनुष्यानें भक्तीनें शिवदर्शन घेऊन पूजन करावें. यापुढें नियमानुसार संस्थिति सांगेन.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रंथांतील अंतर्यागनिरूपण नांवाचा बारावा अध्याय संपूर्ण.

## ॥ अथ त्रयोदशोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अथ शिवपूजाक्रमः ॥ बाह्योपासनमनीषया बुध्या बुद्धिपूर्वकं जिव्हासनं गृण्हाति ॥ बुद्धिपूर्वकं हृदयाकाशस्थितमुपासते ॥ अंतराराधनपूर्वकं गत्वाप्युपलक्षणमाह ॥ यद्धिमनसा ध्यायति तद्वाचा वदति तत्कर्मणा करोतीति वेदवाक्यप्रमाणेन अंतराराधनादूर्ध्वं जपं जपादूर्ध्वं बहिराराधनं करोतीति वीरमाहेश्वरार्चाया निर्णयः ॥ तद्यथा क्रियासारे ॥ ईश्वरः ॥ लिंगार्चनविधिं वक्ष्ये शिवस्य परमात्मनः ॥ सर्वपापक्षयकरं सर्वतीर्थफलप्रदं ॥१॥ समस्तदानफलदं सर्वयज्ञफलप्रदं ॥ समस्तभोगफलदं साक्षान्मुक्तिप्रदायकं ॥२॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन शिवैकाहितमानसः ॥ शिवपूजाविधिः कार्यो यदिच्छेच्छिद्धिमात्मनः ॥ ३ ॥ स्वगृहं वा शिवावासं सरित्तीरं गृहं वनं ॥ मठस्तटाकश्च सरोमंडपो गव्हरो गुहा ॥४॥ आरामः पर्वतश्चान्यत् रहस्थानं मनोहरं ॥ चरार्चनस्य स्थानानि प्रशस्तानि चतुर्दश ॥५॥ गृहस्येशानदिग्भागे पूजास्थानमिति स्मृतं ॥ आलये वेदिकां तत्र पूजार्थं कारये-

---

(१) बाह्योपासना करण्याच्या इच्छेनें बुद्धिपूर्वक जिव्हासन ग्रहण करितों; बुद्धिपूर्वक हृदयाचें ठिकाणीं वास्तव्य करणाऱ्या लिंगाचें पूजन करितों. अंतराराधना सांगून उपलक्षण सांगतात; कारण ज्याचें मनांत ध्यान करितो तच मनुष्य बोलतो व तदनुरूप कर्माचरण करितो असें वेदवाक्यप्रामाण्य आहे. अंतराराधनेनंतर जप, जपानंतर बाह्य उपासना करितो असा वीरमाहेश्वरांच्या पूजेचा नियम आहे. कारण क्रियासारांत सांगितलें आहे कीं, ईश्वर ह्मणतात—परमात्म्या शिवाच्या लिंगपूजनाचा प्रकार सांगतो; तो लिंगार्चनक्रम सर्व पापांचा नाशक, सर्व तीर्थांचें फल देणारा; (२) सर्व दानांचे फल देणारा, सर्व यज्ञफल देणारा; सर्व भोगांचें फल देणारा; केवल मोक्षदाता असा आहे. (३) ह्मणून सर्व प्रयत्नानें केवल शिवाकडे लक्ष्य लावून आत्मसिद्धीची इच्छा करणाऱ्यानें शिवपूजा करावी. (४) आपलें घर, शिवालय, नदीतटाक, घर, वन, मठ, सरोवराचा कांठ, मंडप, गव्हर, गुहा, (५) उपवन, पर्वत किंवा असेंच दुसरें मनोहर एकान्तस्थान हीं चरलिंगाची पूजा करण्यास योग्य अशीं १४ स्थानें होत. (६) घराच्या ईशान्य भागास पूजास्थान मानिलें आहे तेथें विचक्षणानें पूजेक-

द्बुधः ॥६॥ चरलिंगार्चने देव पूर्वाभिवदनं मुखं ॥ स्थिरलिंगे यथा क्लृप्तं मुखमादौ तथार्चयेत् ॥७॥ रत्नसौवर्णरजतपीठे वा चंद्रकांतके ॥ स्फाटिके दारवे वापि स्थापयेल्लिंगरूपिणं ॥८॥ अस्मिन्लिंगे करिष्यामि नियमं श्रुतिचोदितं ॥ इत्यागमेतिहासादिसिद्धं नियममाचरन् ॥९॥ उपचारपरत्वाच्च शिवस्यैतान् प्रकल्पयेत् ॥ गुरूपदिष्टमार्गेण शक्तिसंकल्पितासने ॥१०॥ शिवलिंगेऽविनाभावसंबंधादर्चनं मतं ॥ एकैकानंतरं कुर्यात्कल्पिताचमनीयकान् ॥११॥ विनियोगोपचारेण संतुष्यति सदाशिवः ॥ दीक्षितानां द्विजातीनां स्त्रीशूद्राणां तथैव च ॥१२॥ लिंगे स्वगुरुणा दत्ते पूजा नान्यत्र चोदिता ॥ देवलव्रात्यदुःशीलखरस्थानादिदुर्जनैः ॥१३॥ स्थानान्युपहतान्यत्र पूजां यत्नेन वर्जयेत् ॥ प्रक्षाल्य चरणौ हस्तौ सपवित्रकरद्वयः ॥१४॥ श्वेतवस्त्रश्चोपवीतः सुसंयतशिखंडकः ॥ आचम्य विधिवत्सम्यक् त्रिपुंड्रमथ धारयेत् ॥१५॥ मूर्धाद्यंगेषु रुद्राक्षं दद्यादुक्तेष्वनुक्रमात् ॥ देवदक्षिणदिग्भागे सासनश्च उदङ्मुखः

---

रितां ओटा घालावा. (७) चरलिंगाची पूजा करितांना, स्थिरलिंगाची पूजा करितांना जसें पूर्वाभिमुख असावें, तसें होऊन पूर्वीप्रमाणें पूजन करावें. (८) रत्न, सुवर्ण, रुपें, चंद्रकांत, स्फटिक, किंवा लांकूड यांपासून निर्मिलेल्या आसनावर लिंगरूपी परमात्म्या शिवाची स्थापना करावी. (९) व या लिंगाचे ठिकाणीं वेदोक्त नियमाचें आचरण करीन असें ह्मणून आगम, इतिहास यांनीं सिद्ध असलेल्या नियमाचें आचरण करावें. (१०) व शंकर उपचारप्रिय असल्यामुळें त्याचे ठिकाणीं पुढील उपचारयुक्त पूजन करावें. आपल्या शक्त्यनुसार तयार केलेल्या आसनावर गुरूनें सांगितलेल्या रीतीनें (११) एक भावानें शिवपूजन करावें, त्या लिंगावर आचमनीयादि एकामागून एक उपचार करावेत. (१२) कारण शंकर उपचारांनीं संतुष्ट होतो. दीक्षित अशा द्विजातींना तसेंच स्त्रियांना, शूद्रांना (१३) गुरूनें दिलेल्या लिंगाशिवाय इतरत्र पूजा सांगितलेली नाहीं. पुजारी, जातिभ्रष्ट, दुर्वर्तनी मनुष्य, व दुर्जन (१४) यांचे सांनिध्य असलेलीं स्थळें व सौळ जागा हीं स्थानें पूजेला होईल तितकेंकरून वर्ज्य करावींत. हात पाय धुवून व दोन्ही हातांत पवित्रकें घालून, (१५) पांढरें वस्त्र नेसून, उपवीत होऊन, व शेंडी बांधून आचमन करावें, व यथाविधि त्रिपुंड्र धारण करावें. (१६) डोकें वगैरे सांगितलेल्या स्थानीं अनुक्रमानें रुद्राक्ष धारण करावें, देवाच्या उजवीकडे आसन-

॥ ततः प्रसरपीठस्थः प्राणायामं समाचरेत् ॥ १६॥ स्नपने चरलिंगस्य पंचाढकमितं जलं ॥ गंधप्रसवकैरत्नमंत्रतोयान्यमूनि च ॥१७॥ एतानि ताम्रकुंभेषु पंचप्रस्थमितेषु च ॥ वस्त्रपूतानि तोयानि समापूर्य विनिक्षिपेत् ॥१८॥ गंधपुष्पाक्षतैः साकं तत्तद्द्रव्याणि मंत्रतः ॥ सामान्यमंबुसंस्कारं यथैवैषु तथाचरेत् ॥१९॥ अष्टोत्तरशतं मूलमंत्रेणैवाभिमंत्रयेत् ॥ तन्मंत्रसलिलं प्रोक्तं पंचमं स्नपने त्विदं ॥ २० ॥ सामान्यपयसा पात्रं व्यवहार्यं प्रपूर्य च ॥ गंधादीनि विनिक्षिप्य तत्र प्राग्वन्निमंत्रणं ॥२१॥ स्थानद्रव्याणि चास्त्रेण प्रोक्षयेत्तेन वारिणा ॥ स्थानद्रव्यविशुद्धिः स्यात्पद्मजानेन कर्मणा ॥ २२ ॥ अर्घ्याचमनपाद्यानां पात्राण्यद्भिः प्रपूरयेत् ॥ ततः सामान्यपात्रं च ततः क्षालनपात्रकं ॥२३॥ पूरयित्वैषु पात्रेषु गंधपुष्पाक्षतान्क्षिपेत् ॥ यत्र नैवेद्यनिर्माल्यसंकीर्णकलशादिभिः ॥२४॥ स्नानं तु क्रियते भक्त्या न तद्गृण्हाति शंकरः ॥ स्थंडिले शिवलिंगे च गंधपुष्पाक्षतादिभिः ॥ २५ ॥ द्रव्यैरभ्यर्चयेद्देवं यथाविभवविस्तरं ॥ मध्यमानामिकामध्ये पुष्पं संगृह्य पूजकः ॥ २६ ॥ अंगुष्ठतर्जन्य-

---

सहित उत्तराभिमुख प्रसरपीठावर वसून प्राणायाम करावा. (१७।१८) चरलिंगाचे स्नानास पांच आढक ( पायली ) प्रमाण पाणी असावें; गंध, फुलें, रत्नें, व मंत्र यांनीं युक्त व फडक्यानें शोधिलेलें असें पाणी पांच प्रस्थप्रमाण तांब्याच्या गडव्यांत भरावें, व लिंगावर घालावें. (१९) गंध, पुष्पें, अक्षता यांसह प्रत्येक द्रव्य मंत्रानें संस्कृत करून सामान्य पाण्याबरोबर शिवाला अर्पण करावें. (२०) मूलमंत्राच्या १०८ आवृत्तींनीं अभिमंत्रित जलाला पंचम असें ह्मणतात. (२१) सामान्य पाण्यानें पात्र भरून त्यांत गंध वगैरे घालून पूर्ववत् मंत्रित करावें. (२२) व त्या पाण्यानें पूजाद्रव्यांचें अस्त्रानें प्रोक्षण करावें. हे ब्रह्मदेवा, अशा कर्मानें सर्व पूजासामुग्रीची शुद्धि होते. (२३) अर्घ्य, आचमन, पाद्य यांचीं पात्रें, पाण्यानें भरावीं, नंतर सामान्यपात्र व नंतर क्षालनपात्र पाण्यानें भरावें. (२४) नंतर या पात्रांमध्यें गंधपुष्पाक्षता टाकाव्यात. निर्माल्य, नैवेद्य वगैरेंनीं संकीर्ण झालेल्या कलश वगैरे पात्रांनीं (२५) भक्तिपूर्वक देवास स्नान घातलें असतां शंकर त्याचा स्वीकार करीत नाहीं. स्थंडिलावर शिवलिंगाची गंध अक्षता पुष्पं वगैरे (२६) द्रव्यांनीं यथासामर्थ्य पूजन करावें. पूजा करणाऱ्यानें मध्यमा व अनामिका यांत फूल धरून (२७) आंगठा व तर्जनी ह्यांच्या अग्रानें देवावरील

ग्राभ्यां निर्माल्यमपनोदयेत् ॥ अशून्यमस्तकं लिंगं सदा कुर्वीत पूजकः ॥ २७ ॥ अरणिस्थो महावन्हिर्मथनेनैव दृश्यते ॥ तथैव लिंगे मंत्रेण दृश्यते परमेश्वरः ॥२८॥ ज्योतीरूपं सर्वगतमद्वितीयमनौपमं ॥ ध्यात्वौंकारेण तल्लिंगे प्रक्षिपेत्कुसुमांजलिं ॥२९॥ पाद्यमाचमनं चार्घ्यं वस्त्रं यज्ञोपवीतकम् ॥ गंधाक्षतप्रसूनानि धूपदीपमनुक्रमात् ॥३०॥ दत्वाथ मूलमंत्रेण यथाशक्ति जपं जपेत् ॥ सपुष्पशीर्षं तल्लिंगं ततः स्नपनमाचरेत् ॥३१॥ पयोदध्याज्यमध्विक्षुरसैर्मूलेन पंचभिः ॥ ततो गोधूमचूर्णेन घृष्ट्वा कोष्णेन वारिणा ॥३२॥ स्नापयेदनिषिद्धैर्वा मुद्गचूर्णैरलाभतः ॥ स्नापयेदथ गंधाद्भिः पुष्पाद्भिः स्नापयेदथ ॥३३॥ स्नापयेदथ हेमाद्भिः रत्नाद्भिः स्नापयेदतः ॥ स्नापयेदथ मंत्राद्भिः क्रमेणैव समाचरेत् ॥३४॥ सर्वाण्यमूनि स्नानानि मूलेन ब्रह्मभिश्चरेत् ॥ एवं संस्नाप्य विधिवद्दत्वाप्याचमनं ततः ॥३५॥ तत्प्रधानासने देवं कल्पिते संनिवेशयेत् ॥ उक्तद्रव्येषु दशसु यल्लब्धं पात्रपावनं ॥ विनिक्षिप्याऽथ तद्रूपं सुसंस्कृत्य निवेदयेत् ॥३६॥ प्रथमाभिहिते पात्रे स्थापितं दीपसंचयं ॥

---

निर्माल्य काढावा. कारण शिवलिंगास शून्य मस्तक कधींहि करूं नये. (२८) अरणीमध्यें असणारा अग्नि ज्याप्रमाणें मंथनानें स्पष्ट होतो तसाच लिंगाचें ठायीं असणारा परमेश्वर मंत्रानें दृग्गोचर होतो. (२९) प्रकाशरूप, सर्वव्यापी अद्वितीय अनुपमेय अशा परमेश्वराचें ॐकारपूर्वक ध्यान करून त्या लिंगावर ओंजळभर फुलें टाकावीं. (३०) पाद्य, आचमन, अर्घ्य, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, अक्षता, फुलें, धूप, दीप, हीं अनुक्रमानें (३१) अर्पण करून नंतर मूलमंत्रानें यथाशक्ति जप करावा. लिंगाचें मस्तकावर फूल ठेवून स्नान घालावें. (३२) दूध, दधि तूप, मध साखर, यांनीं मूलमंत्रानें स्नान घालावें. नंतर गव्हाच्या पिठानें तें लिंग चोळून किंचित् उष्ण पाण्यानें (३३) स्नान घालावें. प्रसंगीं गव्हांचें पीठ न मिळालें तर मुगाच्या शुद्ध चूर्णानें घासून स्नान घालावें, नंतर गंधोदकानें, नन्तर पुष्पोदकानें स्नान घालावें. (३४) नन्तर सुवर्णोदकानें, रत्नोदकानें व नन्तर मंत्रोदकानें ह्याप्रमाणें क्रमशः स्नान घालावें. (३५) हीं सर्व स्नानें मूलमंत्रपूर्वक पंचमहामंत्रांनीं घालावीं. ह्याप्रमाणें यथाविधि स्नान घातल्यानंतर आचमन देऊन (३६) नंतर तयार केलेल्या मुख्यासनावर देवाला बसवावें व पूर्वोक्त दश द्रव्यापैकीं जीं मिळालीं असतील तीं पात्रानें पुनीत झालेलीं व मंत्रसंस्कृत करून लिंगाला अर्पण करावीं. (३७) पूर्वोक्त पात्रांत ठेवलेला दीपसंग्रह प्रोक्षण करून देवाला अर्पण

पूर्वोक्तसाधनोत्क्षिप्तं तच्च प्रोक्ष्यं समर्चयेत् ॥३७॥ पूर्वोक्तविधिना सिद्धान्यन्नान्याज्येन भक्षणैः ॥ वहुभिर्वहुधाभक्ष्यैः सह दध्ना गुडेन च ॥३८॥ सौवर्णे राजते ताम्रे पात्रे कांस्येऽथवा शुभे ॥ दर्शनीयं यथास्थाप्य तन्निवेद्यं निवेदयेत् ॥३९॥ मूलमंत्रजपं कुर्यादष्टाविंशतिसंख्यया ॥ पानीयं च ततो दद्यात्सुगन्धमतिशीतलम् ॥४०॥ तत आचमनं दद्यात्करवासानुलेपनम् ॥ दत्वा पात्रेऽथ तांवूलं सन्निधाय समर्पयेत् ॥४१॥ ततो दद्याद्भूषणानि किरीटाद्यखिलान्यपि ॥ प्रदद्याद्दर्पणं छत्रं तालवृंतं च चामरं ॥ ४२ ॥ ईश्वरस्य यथापूर्वमुपचारान् कृतान् हि तान् ॥ तथा देव्याः प्रकुर्वीत तन्मंत्रेणैव चाखिलान् ॥४३॥ एवं संपूज्य देवेशं कुर्यादावरणार्चनं ॥ पंचब्रह्मषडंगानि गर्भावरणदेवतां ॥ ४४ ॥ देवस्य पश्चिमे सद्यं वामं सौम्ये समर्चयेत् ॥ दक्षिणे घोरवक्रं च प्राच्यां तत्पुरुषं यजेत् ॥४५॥ ईशानमीशदिग्भागे यथाविधि समर्चयेत् ॥ दक्षिणे घोरवक्रं च प्राच्यां तत्पुरुषं यजेत् ॥४६ ईशानमीशदिग्भागे यथाविधि समर्चयेत् ॥ अथाग्नीशासुरमरुत्कोणेष्विंद्रे च वारुणे ॥४७॥ च-

---

करावा. (३८) पूर्वोक्त विधीनें तयार केलेलीं अन्नें तूप, दहि, गूळ व दुसरे अनेक भक्ष्य पदार्थ यांसह (३९) सुवर्णाच्या, रुप्याच्या, तांब्याच्या, कांशाच्या, अथवा दुसऱ्या शुभ व सुंदर पात्रांत घालून तो नैवेद्य निवेदन करावा. (४०) अठ्ठावीस वेळां मूलमंत्राचा जप करावा नंतर देवाला सुगंधित व अत्यंत थंड असें पाणी द्यावें (४१) नन्तर आचमन घालावें; करवासार्थ सुगंध द्रव्य अर्पण करावें व पात्रांत विडा ठेवून समर्पण करावा. (४२) नन्तर किरीट वगैरे सर्व अलंकार अर्पण करावेत. तसेंच आरसा, छत्री, पंखा, चौरी हीं अर्पण करावीं (४३) याप्रमाणें मागें सांगितलेले सर्व उपचार जसे शंकरास अर्पण केले तसेच पार्वतीस त्याच मंत्रानें अर्पण करून तिचें पूजन करावें. (४४) याप्रमाणें शंकराची पूजा झाल्यानंतर पंचब्रह्ममंत्रांनीं व षडंगांनीं गर्भावरणदेवतांचें आवरणार्चन करावें. (४५) शंकराचे पश्चिम भागीं सद्याचें पूजन करावें, उत्तरेस वामाचें पूजन करावें, दक्षिणेस घोरमुखाचें पूजन करावें, व पूर्वेस तत्पुरुषाचें पूजन करावें, (४६) शंकराचे ईशान्य दिशेस ईशानाचें विधिवत् पूजन करावें. दक्षिणभागीं घोरवक्त्राचें व पूर्वेस तत्पुरुषाचें अर्चन करावें. (४७) ईश्वराच्या ईशान्य दिशेस ईशानाचें पूजन करावें. नन्तर आग्नेय, ईशान्य, नैऋत्य, वायव्य, पूर्व व पश्चिम (४८) ह्या

तुर्विदिक्षु चांगानि षट्क्रमेण समर्चयेत् ॥ गर्भावरणमेवं स्यात्पूजयेद्दे शिकः सदा ॥४८॥ ईश्वरस्य पुरस्तात्तु ततो नाट्यादिकं चरेत् ॥ मूलमंत्रं जपेत्पश्चादष्टोत्तरसहस्रकं ॥ अष्टोत्तरशतं वापि यथाशक्ति प्रसन्नधीः ॥ ४९ ॥ सुगन्धाक्षतपुष्पार्घ्यं जलमादाय पाणिना ॥ तद्दानं देवपादाब्जे एतदात्मार्पणं स्मृतं ॥ ५० ॥ चुलुकोदकप्रदानेन प्रीत्या तद्भाषितं बुधैः ॥ एवं यः कुरुते भक्त्या तीर्णस्तेन भवार्णवः ॥ ५१ ॥ एवं स्वात्मार्पणं कृत्वा स्तोत्रौघैर्भक्तितो जपेत् ॥ प्रदक्षिणनमस्कारं यथाशक्त्या प्रसन्नधीः ॥५२॥ कृत्वा तु प्रार्थयेद्देवं मंत्रेणानेन भक्तितः ॥ अपराधसहस्राणि क्रियंतेऽहर्निशं मया ॥ दासोऽहमिति मां मत्वा क्षंतव्यं भक्तवत्सल ॥५३॥ एवं संप्रार्थ्य विधिवत् देवदेवं महेश्वरं ॥ तत्पादपद्मप्रसवप्रसादं धारयेद्बुधः ॥५४॥ दद्याच्च चरणांभोजे भक्त्या पुष्पांजलित्रयं ॥ आदिशैवेन कर्तव्यं प्रतिष्ठाद्यर्चनादिकं ॥५५॥ अन्यथा कारयेद्यस्तु निष्फलत्वमवाप्नुयात् ॥ लिंगे मंत्रेण यद्वस्त्ररत्नहेम विनेतरत् ॥५६॥ समर्प्यापगतं द्रव्यं निर्माल्यमिति कीर्तितं ॥ संपूज्याथ शिवं भ-

---

सहा दिशांस, क्रमशः पूजन करावें. याप्रमाणें असलेल्या गर्भावरणाची देशिकानें नेहमीं पूजा करावी; (४९) नन्तर देवापुढें नाच वगैरे करावा, नन्तर १००८ आवृत्ति मूलमंत्राचा जप करावा अथवा प्रसन्न बुद्धीच्या मनुष्यानें शक्त्यनुसार १०८ वेळां मूलमंत्राचा जप करावा. (५०) परिमळ, अक्षता, पुष्पें यांचें अर्घ्यजल हातांत घेऊन देवपादावर सोडिलें असतां त्यास आत्मार्पण असें मानितात. (५१) चुलुकोदकदानासही विद्वान हेंच नांव देतात. ह्याप्रमाणें जो कोणी मनुष्य भक्तिपुरःसर करितो तो भवसागर तरून गेला असें समजावें. (५२) याप्रमाणें आत्मार्पण केल्यावर भक्तीनें स्तोत्रपाठ करावा व प्रसन्न अंतःकरणानें मनुष्यानें यथाशक्ति प्रदक्षिणा व नमस्कार घालावेत. (५३) असें करून नन्तर देवाची प्रार्थना करावी कीं, मी अहोरात्र हजारो अपराध करितों, करितां हे भक्तकामप्रभो, मी आपला दास आहे असें समजून मला क्षमा करावी. (५४) ह्याप्रमाणें देवाधिदेव महादेवाची यथाशास्त्र प्रार्थना करून त्याच्या पदकमलप्रसादाचा मस्तकावर स्वीकार करावा. (५५) भक्तीनें चरणकमलांवर पुष्पांच्या तीन ओंजळी घालाव्या. प्रतिष्ठाद्यर्चन आदिशैवानें करावें. (५६) अन्यथा जो कोणी करील त्याचें तें करणें निष्फल होईल. लिंगावर मंत्रानें जें वस्त्र, रत्न, सुवर्ण यांहून इतर (५७) द्रव्य समर्पण करून काढिलें असेल तें निर्माल्य असें समजावें. शिवाची

क्त्या गुरुपंक्तिं समर्चयेत् ॥ स्वगुरुं परमगुरुं परमाचार्यसंज्ञितं ॥५७॥ प्रारंभाद्यवसानांतं प्रतिकर्म पुनः पुनः ॥ जलं क्षालनपात्रस्थं स्पृष्ट्वा स्पृष्ट्वा समाचरेत् ॥५८॥ प्रारंभाद्यवसानांतं सर्वं मौनेन कारयेत् ॥ भाषणं भावि चेत्तत्र वदेत्संस्कृतया गिरा ॥५९॥ अर्चनादौ यवनिकां दत्वेशार्चनमाचरेत् ॥ दत्वा देवाय तांबूलं दत्वा यवनिकां हरेत् ॥ ६० ॥ कदाचिदपि लिंगस्य नोपरि भ्रामयेत्करं ॥ लिंगे हस्तमवष्टभ्य नासिकारोधकस्तथा ॥६१॥ अत्रोक्तपूजाद्रव्याणामलाभे वापि संकटे॥ पुष्पप्रदानमात्रं वा कुर्याद्भावपुरःसरं ॥६२॥ एककालं द्विकालं वा त्रिकालं सर्वदापि वा ॥ भक्त्या त्वहरहः कुर्यान्नियमेनेश्वरार्चनम् ॥६३ ॥ सर्वपापविनिर्मुक्तः सर्वपुण्यफलान्वितः ॥ भोगानिहाखिलान् भुक्त्वा प्राप्नोत्यंते सदाशिवं ॥६४॥ अयं मंत्रपरो धर्माचारेण सकृतो भवेत् ॥ अनभ्यर्च्य न भुंजीत देवमाप्राणसंचरात् ॥६५॥ अज्ञानादथवाऽऽलस्यान्न करोतीश्वरार्चनं ॥ तिर्यग्योनिशतं गत्वा संसारे वर्तते चिरं ॥६६॥ शि-

---

भक्तिपुरःसर पूजा करून नन्तर गुरुमण्डळाची पूजा करावी. आपला गुरु, परमगुरु व ज्यास परमाचार्य असें ह्मणतात, ह्या सर्वांची (५८।५९) प्रारंभापासून शेवटपर्यंत पुनः पुनः प्रत्येक कर्म करून वरचेवर पाणी सांडण्याच्या भांड्यांत पाण्यास स्पर्श करून न बोलतां आरंभापासून अंतापर्यंत पूजा करावी. बोलणें जरूर वाटल्यास गीर्वाणभाषेंत भाषण करावें. (६०) पूजा करण्याचे पूर्वी पडदा लावून ईश्वराची पूजा करावी व देवाला तांबूल देऊन पडदा काढावा. (६१) लिंगावर कधींहि हात फिरवूं नये; लिंगावर हस्तानें अवष्टंभ करून नाक धरून प्राणायाम करावा. (६२) पूर्वोक्त पूजाद्रव्यें प्रसंगीं न मिळाल्यास संकटसमयीं भक्तिभावानें देवाला केवळ पुष्पार्पणच करावें. (६३) एकवार, दोनदां, किंवा त्रिकाल किंवा सर्वदां प्रत्यहीं भक्तिपुरःसर नियमानें ईश्वरपूजन करावें; (६४) असें केलें असतां मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होऊन व सर्व पुण्यफल प्राप्त करून घेऊन इहलोकीं सर्व भोग भोगून अंतीं सदाशिवाची प्राप्ति करितो. (६५) मनुष्यानें धर्मशील होऊन धर्माचरणानें पुण्यवंत व्हावें; देवाची पूजा केल्याविना जिवांत जीव आहे तोंपर्यंत अन्नग्रहण करूं नये. (६६) अज्ञानानें किंवा आलस्यानें जो कोणी ईश्वरपूजन करीत नाहीं, तो शंभर जन्मपर्यंत पशुपक्ष्यांच्या योनींत राहून संसारांत दीर्घकाल भ्रमण करितो. शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, (६७) वीरशैव दीक्षितांना योग्य असें ईश्वराचें गर्भावरण सूक्ष्मरूपानें सांगतात.

वरहस्ते ॥ वीरशैवाभिषिक्तानां भक्तानामर्हणास्पदं ॥ गर्भावरणमीश- स्य सूच्यते सूक्ष्मरूपतः ॥६७॥ अनादिशैवमार्गेण दीक्षितः परमं शिवं ॥ ईशानाद्यस्त्रपर्यंतमेकावरणमर्चयेत् ॥६८॥ सिंहासनं च प्रथमं पद्मा- सनं द्वितीयकं ॥ विमलासनं तृतीयं स्यादासनत्रयमाचरेत् ॥६९॥ पंच- ब्रह्मशिवांगैश्च पूजयेत्पूर्ववत्ततः ॥ एकावरणमेवोक्तं पूजयेद्देशिकस्तथा ॥७०॥ स्वगुरुं पूजयेत्तत्र गन्धपुष्पाक्षतादिभिः ॥ स वीरतंत्रमार्गोक्त- नियमो नियतेंद्रियः ॥७१॥ अप्रमत्तः शिवाचारे लिंगाराधनको भवेत् ॥ एकस्मिन्जगदाधारे लिंगे विश्वात्मके पुनः ॥ ७२ ॥ स्वर्गादिचिन्हैः संसारैर्बहुत्वमुपपद्यते ॥ अविद्यया तथा लिंगं बहुसंस्कारसंयुतं ॥ यः पूजयति वैषम्याद्बहुलिंगार्चकः स्मृतः ॥७३॥ स्कांदे ॥ उमामहेश्वरसं- वादे ॥ साधु साधु महाभागे भक्तानां भक्तिवत्सले ॥ शृणु देवि प्रव- क्ष्यामि लिंगार्चनविनिर्णयं ॥७४॥ शुद्धं मिश्रं तु संकीर्णं त्रिविधं लिंग- पूजनं ॥ शुद्धं तु लिंगतन्मात्रं मिश्रं चैव सदाशिवं ॥७५॥ संकीर्णं प्र- तिमाकारं लिंगत्रयमिदं शृणु ॥ योऽर्चायामर्चयेद्रुद्रं पूर्णं वर्षशतं नरं

---

(६८) अनादि शैवमार्गानें दीक्षित झालेल्या मनुष्यानें ईशानादि मुखापर्यंत एका- वरण समजून परमशिवाचें पूजन करावें. (६९) प्रथम सिंहासन, नन्तर दुसरें पद्मा- सन, नन्तर तिसरें विमलासन याप्रमाणें आसनक्रम पाळावा. (७०) पूर्वीप्रमाणें पंचब्रह्ममंत्ररूपी शिवांगाचें पूजन करावें. नन्तर देशिकानें एकावरण समजून पूजन करावें. (७१) तेथें गंध, पुष्प, अक्षता, यांनीं स्वगुरूची पूजा करावी. त्यानें वीर- तंत्रांत सांगितलेला नियम पाळणारा, इंद्रियसंयमी, (७२) निरवलेप, शिवाचार- तत्पर असून लिंगाराधन करणारा व्हावें. जो जगताचा आधार आहे व जो वि- श्वव्यापी आहे अशा एकलिंगाचे ठिकाणीं (७३) पुनः स्वर्गादि चिन्हांनीं संसा- रिक लोक अनेकत्वाची कल्पना करितात, व अज्ञानानें अशा प्रकारें अनेक संस्कारयुक्त आहे असें मानून जो लिंगपूजन करितो त्यास त्याच्या अज्ञानास्तव बहुलिंगार्चक ( अनेक लिंगाची पूजा करणारा ) असें ह्मणतात. स्कांदपुराणांत महादेवाच्या संवादांत सांगितलें आहे कीं, (७४) हे भाग्यशालिने, भक्तवत्सले पार्वती, फार उत्तम प्रश्न केलास, लिंगपूजेचा निर्णय सांगतों तो तूं लक्षपूर्वक ऐक. (७५) शुद्ध, मिश्र व संकीर्ण असें तीन प्रकारचें लिंगपूजन आहे. लिंगतन्मात्र पूजन तें शुद्ध होय; सदाशिवाचें पूजन तें मिश्र होय. (७६) व प्रतिमाकार लिंगाचें जें पूजन तें संकीर्ण होय. जो मनुष्य पूर्ण शंभर वर्षें पूजेमध्यें रुद्राचें पूजन करितो

॥७६॥ एकं च दिवसं लिंगे स ममैतन्न संशयः ॥ अन्यार्चनेन न तुष्यामि तथा देवि नगात्मजे ॥७७॥ लिंगेऽर्चिते यथात्यर्थं परितुष्यामि पार्वति ॥ यत्पुण्यं प्रतिमार्चायां युगकोटिशतैरपि ॥ ७८ ॥ तत्फलं लभते देवि लिंगे तु घटिकार्धके ॥ लिंगं पूजयते नित्यं सर्वदेवनमस्कृतं ॥७९॥ पूजितेन तु लिंगेन सर्वे देवाः प्रपूजिताः ॥ स्थावरे जंगमे वापि भूग्रामे च चतुर्विधे ॥ ८० ॥ स्वर्गेऽप्यथ च पाताले त्रैलोक्ये स चराचरे ॥ नास्ति लिंगात्परं दैवं मूढाः क्लिश्यंति चान्यथा ॥ ८१ ॥ ग्रामे वा यदि वारण्ये जले वापि स्थलेऽपि वा ॥ यत्र वा दृश्यते लिंगं सर्वतीर्थानि तत्र वै ॥ ८२ ॥ चंडालश्वपचागारे लिंगं तिष्ठेन्महत्तरं ॥ तद्ग्रामं शिवलोकं स्यात्तद्गृहं शिवमंदिरं ॥८३॥ लिंगमध्ये महादेवः साक्षादेव व्यवस्थितः ॥ अनुग्रहाय लोकानां तस्माल्लिंगं प्रपूजयेत् ॥८४॥ देवदानवगन्धर्वसिद्धकिन्नरगुह्यकाः ॥ लिंगमेकं परं नास्ति तस्माल्लिंगं प्रपूजयेत् ॥८५॥ ऋषयो योगिनो विप्रा ज्ञानिनो ब्रह्मवादिनः ॥ पूजयंति सदाका

---

(७७) त्यापेक्षां एकच दिवस तो जर लिंगाचें पूजन करील तर तो निःसंशय माझा दिवस असें मी समजतों, हे पार्वती दुसऱ्या कशाचेंही अर्चन केलें असतां मी तसा संतुष्ट होत नाहीं. (७८) ज्याप्रमाणें लिंगाची पूजा केली असतां अत्यंत संतुष्ट होतों तसें. शंभर कोट युगें प्रतिमेचें पूजन केलें असतां जें पुण्य लागतें (७९) तेंच पुण्यफल, हे देवि, अर्धघटका लिंगाचें पूजन केलें असतां मिळतें. तें लिंग सर्व देवांनीं वंदिलें आहे व पूजिलें आहे. (८०) लिंगाचें पूजन केलें असतां सर्व देवांचें पूजन केल्याप्रमाणें होतें. स्थावरजंगम यच्चावत् भूलोकांतील सर्व वस्तूंमध्यें (८१) त्याचप्रमाणें स्वर्ग, पाताल वगैरे सर्व त्रैलोक्यांतील चराचर वस्तूंमध्यें शिवलिंगाहून अन्य दैवत नाहीं. यांहून अन्य भावनेनें मूर्ख लोक दुःख पावतात. (८२) ग्रामांत, अरण्यांत, पाण्यांत किंवा स्थळीं जेथें शिवलिंग दिसेल तेथ सर्व तीर्थांचें वसतिस्थान आहे असें समजावें. (८३) चंडाल किंवा श्वपच यांचे घरीं जरी लिंग असलें तरी तो गांव शिवलोकासमान जाणावा व त्यांचें घर शिवमंदिराप्रमाणें समजावें. (८४) लिंगामध्यें साक्षात् महादेवाचें सांनिध्य लोकांवर अनुग्रह करण्याकरितां झालें आहे असें समजावें, ह्मणून लिंगाचें पूजन करावें, (८५) देव, राक्षस, गंधर्व, सिद्ध, किन्नर, गुह्यक हे सर्व लिंगस्वरूपी आहेत. त्याहून भिन्न नाहींत, ह्मणून लिंगाचें पूजन करावें; (८६) ऋषि, योगी, ब्राह्मण, ज्ञानी,

लमीशानं सुरनायकं ॥८६॥ सदा यजति यज्ञेन सदा दानं प्रयच्छति॥ सदा वै वायुभक्षः स्यात्सकृदभ्यर्चयेच्छिवं ॥८७॥ अग्निहोत्राश्च वेदाश्च यज्ञाश्च बहुदक्षिणाः ॥ शिवलिंगार्चनस्यैते कोट्यंशेनापि नो समाः ॥८८॥ यानि कानि च तीर्थानि आसमुद्रात्सरांसि च ॥ स्नानात्फलमवाप्नोति सकृदभ्यर्चयेच्छिवं ॥८९॥ प्रयागसंगमे चैव गंगासागरसंगमे ॥ तपस्तप्तं भवत्येव यस्तु लिंगार्चने रतः ॥ ९० ॥ धन्यो देशपुरग्रामो लोको गोत्रं गृहं च तत्॥ यत्र त्वं देवदेवेश पूज्यते सुकृतात्मभिः॥९१॥ न तत्र देशे दुर्भिक्षा न च मारी प्रवर्तते ॥ नाकाले म्रियते राजा पूज्यते यत्र शंकरः ॥ जन्मकोटिसहस्राणि सूकरांतानि योनिजः ॥९२॥ सकृदभ्यर्चनाल्लिंगे मुक्तः संसारबन्धनात् ॥ सकृत्कृतार्चने लिंगे गर्भजन्म न विद्यते ॥९३॥ सततं चार्चयेद्यस्तु स याति परमां गतिं ॥ सकृत्पूजयते लिंगं वर्षकोटिशतत्रयम् ॥९४॥ कैलासशिखरे रम्ये मातृजाः पितृजाः स्थिताः ॥ अर्चयंति सदा रुद्रं न ते प्रकृतिमानुषाः ॥९५॥ रुद्रलोकात्परिभ्रष्टास्ते रुद्रा नात्र संशयः ॥ मेरुमंदरमात्रोऽपि राशिः

---

ब्रह्मवेत्ते हे सर्व देवाधिदेव जो शंकर त्याची नित्य पूजा करितात. (८७) नेहमीं यज्ञ करणें, नित्य दान करणें, सर्वकाल वायु भक्षण करणें, यां सर्वांचें पुण्य व एकवार लिंगार्चनाचें पुण्य हीं समान आहेत. (८८) अग्निहोत्रें, वेद, बहु दक्षिणापूर्वक यज्ञ हे शिवलिंगार्चनाच्या कोट्यंशाची बरोबरी करूं शकत नाहींत. (८९) समुद्रापासून सरोवरापर्यंत जीं कांहीं तीर्थें त्या सर्वांचें फल एकवार शिवार्चन केल्याचें फलही तुल्य होत. (९०) जो लिंगपूजापरायण आहे त्यानें प्रयागसंगमावर, गंगासागरसंगमावर तपाचरण केल्याप्रमाणें होय. (९१) हे देवाधिदेवा, ज्या देशांत, नगरांत, खेड्यांत, लोकांत, कुलांत अगर घरीं पुण्यशीलांकडून तुझें पूजन केलें जातें तीं धन्य होत. (९२) ज्या देशांत शंकराचें पूजन होतें तेथें दुर्भिक्ष्य, महामारी, यांचे भय नाहीं व राजाला अकाल मरण नाहीं. सूकरयोनीपर्यंत कोट्यावधि जन्म घेतलेला प्राणीहि (९३) एकवार शिवलिंग पूजन केल्यानें संसारबन्धनापासून मुक्त होतो. एकवार लिंगार्चन केल्यानें गर्भवास टळतो. (९४) जो सतत शिवार्चन करितो तो उत्तम गतीला जातो. जो एकवार लिंगपूजन करितो तो तीनशें कोटी वर्षें उत्तम गतीला जातो. (९५) रम्य कैलासपर्वतशिखरावर मातृकुलोत्पन्न, पितृकुलोत्पन्न, लोक वस्ति करितात व ते नेहमीं रुद्राचें पूजन करितात. ते मानुषप्रकृति नव्हत; (९६) रुद्रलोकांतून प्रच्युत झालेले ते रुद्रच होत. यांत सं-

पापस्य कर्मणः ॥ ईश्वरं वैद्यमासाद्य नश्यंते दुष्टरोगवत् ॥९६॥ ब्रह्मादिस्तंबपर्यंतं शिवयोग उदाहृतः ॥ लिंगार्चनविहीनानां कुतो मोक्षः कुतो दिवं ॥९७॥ श्मशानं तद्गृहं घोरं ते देशाः प्रेतभूमिकाः ॥ म्लेंच्छाः सर्वेऽपि ते लोकाः शिवो यत्र न पूज्यते ॥९८॥ श्वपचोऽपि मुनिश्रेष्ठो ब्राह्मणः श्वपचाधमः ॥ संसारदुःखकांतारे निमग्नः स्यान्महातपाः॥९९॥ चक्रवद्भ्रमते देवि लिंगार्चनविवर्जितः ॥ किं तेन जातमात्रेण भूभारेणान्नशत्रुणा ॥१००॥ अपूजयित्वा चेशानं मलं भुंक्ते नराधमः ॥ पापानामन्नरूपाणां तस्य भोजनमुच्यते ॥१०१॥ नास्ति लिंगार्चनं यस्य म्लेंच्छयोनिषु जायते ॥ लिंगार्चनमुखं याति रुद्रत्वं गणमुख्यतां ॥१०२॥ तस्मात्सर्वं परित्यज्य शिवैकाहितमानसः ॥ शिवपूजाविधिः कार्यो यदीच्छेच्छिद्धिमात्मनः ॥१०३॥ दुर्लभं प्राप्य मानुष्यं येऽर्चयंति पिनाकिनं ॥ तेषां वै सफलं जन्म कृतार्थास्ते नरोत्तमाः ॥१०४॥ भवभक्ति-

---

शय नाहीं; मेरु किंवा मंदरपर्वताप्रमाणें जरी पापकर्मांचा ढीग असला तरी शंकरस्वरूपी वैद्य प्राप्त केला असतां सामान्य रोगाप्रमाणें तो तात्काल नष्ट होतो. (९७) ब्रह्मादि स्तंबपर्यंत शिवयोग सांगितला आहे, ह्मणून जे लिंगपूजारहित आहेत त्यांस मोक्ष किंवा स्वर्ग कोठून मिळणार? (९८) जेथें शिवपूजन नाहीं तें घर भयंकर श्मशान समजावें; तो देश प्रेतलोकाप्रमाणें जाणावा, व तेथील लोक म्लेंच्छ आहेत असें मानावें; (९९) जेथें शिवार्चन नाहीं तो श्रेष्ठ मुनि असला तरी श्वपच होय. व ब्राह्मण असला तर तो श्वपचाहूनही अधम मानिला जातो, महातप आचरण करणाराही संसाररूपी दुःखारण्यांत निमग्न होतो. (१००) हे पार्वति, लिंगार्चनविहीन मनुष्य चक्राप्रमाणें ज़न्ममरणाच्या फेऱ्यांत भ्रमण पावतो त्याच्या जन्मल्यानें काय फायदा? तो केवळ अन्नाला काळ व भुईला भार. (१०१) शंकरपूजेविना जो अन्न ग्रहण करितो तो अधम मनुष्य मल भक्षण करितो असें समजावें; त्याचें जेवण ह्मणजे अन्नरूपी पापेंच होत. (१०२) ज्यास लिंगपूजा नाहीं तो म्लेंच्छ योनींत जन्म घेतो व लिंगार्चन करणारा गणांमध्यें मुख्य रुद्र होतो; (१०३) याकरितां जर आपल्यास सिद्धि मिळावी अशी इच्छा असेल तर त्यांनीं केवळ शिवाकडे लक्ष्य लावून अन्य सर्व वस्तूंचा त्याग करावा व शिवपूजाविधि आचरावा. (१०४) दुर्लभ मनुष्यजन्म पावून जे शंकराचें पूजन करितात त्यांचाच जन्म सफळ झाला व तेच श्रेष्ठ पुरुष या जगांत कृतकृत्य झाले. (१०५) जे शं-

परा ये च भवप्रणवचेतसः ॥ भवसंस्कारिणोह्युक्ता न ते दुःखविभागिनः ॥१०५॥ भवनानि मनोज्ञानि विभ्रमाभरणाः स्त्रियः ॥ धनं चातृप्तिपर्यंतं शिवपूजाविधेः फलं ॥ १०६ ॥ ये वांच्छंति महाभोगान् राज्यं च त्रिदशालये ॥ तेऽर्चयंति सदाकालं शिवस्य चरणांबुजं ॥१०७॥ सौभाग्यं कांतिमद्रूपं सत्यं त्यागः प्रभावतः ॥ शौर्यं च जगति ख्यातिः शिवमर्चयतो भवेत् ॥१०८॥ व्यापारं सकलं त्यक्त्वा पूजयध्वं सदाशिवं॥ निकटा एव दृश्यंते कृतांतनगरद्रुमाः ॥ १०९ ॥ त्वरितं जीवितं याति त्वरितं याति यौवनं ॥ त्वरितं व्याधिरभ्येति तस्मात्पूज्यः पिनाकधृक् ॥ ११० ॥ यावन्न याति मरणं यावन्नाक्रमते जरा ॥ यावन्नेंद्रियवैकल्यं तावत्पूजय शंकरं ॥ १११ ॥ न शिवार्चनसाम्योऽस्ति धर्मोऽन्यो भुवनत्रये ॥ इति विज्ञाय यत्नेन पूजनीयः सदाशिवः ॥ ११२॥ सत्यं वच्मि हितं वच्मि सारं वच्मि पुनः पुनः ॥ असारे दग्धसंसारे सारं यच्छंभुपूजनम् ॥ ११३ ॥ वृक्षस्य मूलसेकेन शाखाः पुष्णंति वै यथा ॥ शिवस्य पूजया तद्वत्पुष्णाति च वपुर्जगत् ॥ ११४॥

---

कारभक्त होऊन शंकर व ॐकार यांचे ठिकाणीं रत झाले ते भवसंस्कारि[illegible] होत व ते भवदुःखाचे वाटेकरी नव्हत. (१०६) सुंदर हवेल्या, मनोहर अलं[illegible]कारयुक्त स्त्रिया व पाहिजे तितकें धन हीं शिवपूजेचीं फलें होत. (१०७) ज्यांस स्वर्गलोकीं मोठाले भोग व राज्य मिळावें अशी इच्छा असते ते सर्वकाल शि[illegible]वाच्या पदकमलाचें पूजन करितात. (१०८) शिवाचें पूजन करणाऱ्यालाच [illegible] जगतांत ऐश्वर्य, शरीरसौंदर्य, सत्य भाषण, औदार्य, प्रभुता, शौर्य, कीर्ति [illegible] मिळतात. (१०९) अन्य सर्व व्यापारांचा त्याग करून सदाशिवाचें पूजन करा[illegible] कारण यमराजधानींतील झाडें संनिध दिसत असतात; (११०) जीवित त्वरित न[illegible]ष्ट होतें; तारुण्यही भंगुर आहे; व रोग त्वरित देहाला ग्रासतो याकरितां शं[illegible]कराचें पूजन करावें. (१११) जोंपर्यंत मृत्यु आला नाहीं व वार्धक्यानें [illegible] नाहीं व इंद्रियें शिथिल झालीं नाहींत तों शंकराचें अर्चन कर. (११२) [illegible] भुवनामध्यें शिवार्चनासारखा दुसरा धर्म नाहीं. असें समजून यत्नानें सदाशिवाचें पूजन करावें. (११३) या निरस [illegible] संसारामध्यें तथ्य म्हणून जें काय [illegible] तें शिवपूजन होय याकरितां तुला वारंवार सत्य, हितकर व सारभूत असा उ[illegible] करीत आहे. (११४) झाडाच्या बुडाशीं पाणी घातलें असतां जशी फांद्यांना [illegible] तशी पैसे सर्व शिवपूजन केलें असतां शरीराचें व जगताचें पु[illegible]

क्रोधाल्लोभाद्भयान्मोहाद्दंभेन कपटेन वा ॥ येन केन प्रकारेण धन्यः पूजयते शिवं ॥ ११५ ॥ शिवधर्मशास्त्रे ॥ यथा भूः सर्वभूतानां स्थानं साधारणं स्मृतं ॥ तथा च शिवभक्तानां साम्यं शिवपुरं स्मृतम् ॥ ११६ ॥ यथेह सर्वभूतानां भोगेच्छाविषयाः स्मृताः ॥ नानापुण्यविशेषेण भोगाः शिवपुरे तथा ॥११७॥ तत्रार्चयंति ते रुद्रं सकृदुच्छिष्टकर्मणा ॥ तेषां पिशाचलोकेषु भोगानिष्टान् प्रयच्छति॥११८॥ प्रपूजयंति ये रुद्रं क्रूराः क्रुद्धविलोचनाः ॥ रक्षोलोके शिवस्तेषां महाभोगं प्रयच्छति ॥११९॥ त्रिरर्चयंति ये रुद्रं मद्यमांसरता नराः ॥ यक्षलोके शिवस्तेषां भोगान्दिव्यान् प्रयच्छति ॥१२०॥ ये गीतनृत्यं कुर्वंति त्रिचतुर्वा यदृच्छया ॥ शिवाग्रतस्तु ते यांति गंधर्वभुवनं गताः॥१२१॥ लोके ख्यातिं समुद्दिश्य पंचार्चयति यः शिवं ॥ तस्यैंद्रभवने रुद्रः कामान् दिव्यान् प्रयच्छति ॥ १२२ ॥ कामासक्तेन चित्तेन यः समर्चयते शिवं ॥ सोमस्थाने शिवस्तस्य दिव्यान् भोगान् प्रयच्छति ॥ १२३ ॥ सप्तकृत्वो यजंते ये गन्धपुष्पाक्षतादिभिः ॥ प्राजापत्ये शिवस्तेषां लोके भोगान्प्रयच्छति ॥१२४॥ अष्टकृत्वो यजंतेऽग्नौ गायत्र्या वेदपारगाः॥

---

(११५) क्रोधानें, लोभानें, भयानें, मोहानें, ढोंगानें, कपटानें, कशानें जरी शंकराचें कोणी पूजन केलें तरी तो धन्य होय. शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, (११६) जसें सर्व प्राणिमात्रांचें पृथ्वी हें साधारण स्थान होय तसें शिवभक्तांचें शिवनगरी हें सामान्य स्थान होय (११७) जसें सर्व प्राणिमात्रांच्या भोगेच्छा विषय मानिले आहेत तसें शिवनगरीमध्यें भक्तांना त्यांच्या पुण्यानुसार भोग प्राप्त होतात.(११८) तेथें जे शंकराचें उच्छिष्ट कर्मानें अर्चन करितात त्यांस पिशाचलोकांत इच्छित भोगप्राप्ति होते. (११९) क्रुद्धदृष्टीनें जे क्रूर रुद्राचें पूजन करितात त्यांस राक्षसाच्या लोकांत महाभोगांची प्राप्ति करवितो. (१२०) मद्यमांस यांचे ठिकाणीं आसक्त झालेले जे लोक त्रिवार रुद्राचें पूजन करितात त्यांस यक्षलोकांत दिव्य भोगांची प्राप्ति करवितो. (१२१) तीनदां किंवा चारदां जे शिवापुढें गायन, नर्तन करितात ते गंधर्व लोकास जातात. (१२२) लोकामध्यें लौकिक व्हावा ह्मणून जो पांच वेळ शिवपूजन करितो त्यास इंद्रलोकांत रुद्र दिव्य भोगांची प्राप्ति करवितो. (१२३) कामासक्त चित्तानें जो शंकराची पूजा करितो त्यांस शिव चंद्रलोकीं दिव्य भोग देतो. (१२४) गंध, पुष्पें, अक्षता याहीं करून जे सात वेळ शिवपूजन करितात त्यांस शंकर प्राजापत्य लोकांत भोग देतो. (१२५) वेद जा-

सद्भावितः शिवस्तेषां ब्रह्मलोकं प्रयच्छति ॥१२५॥ न वार्चयंति ये रु-द्रमेकत्वं समुपाश्रिताः ॥ ते यांति विष्णुभुवनं दिव्यैर्भोगै रमंति च ॥१२६॥ ज्ञेयं विष्णुपदादूर्ध्वं दिव्यं शिवपुरं महत् ॥ तद्भोगस्थानमतुलं कर्मयागरतात्मनां ॥१२७॥ तत्राष्टगुणमैश्वर्यं पार्थिवं पिशिताशिनां ॥ तत्सायुज्यगतानां च नराणां तत्समं स्मृतं ॥१२८॥ स्त्रियोऽपि लिंगमा-राध्य भक्तिभावेन भाविताः ॥ विभवान् मम भोगाद्यैर्विशेषैरनुभुज्यते ॥१२९॥ प्राप्नुवंतीह कामानि मनसा चिंतितानि तु ॥ कामासक्ताश्च ये देवि लिंगाराधनभाविताः ॥ १३० ॥

## ॥ अथ दर्शनस्पर्शनमाहात्म्यम् ॥

उमामहेश्वरसंवादे ॥ दृष्टं पापहरं देवि स्पृष्टं शिवपुरं नयेत् ॥ अ-र्चितं भक्तिभावेन दद्यान्मोक्षं न संशयः ॥१३१॥ कायशुध्द्यात्मशुद्धिश्च ह्यंगन्यासः करस्य च ॥ सर्वशुद्धिर्भवेन्नित्यं लिंगस्पर्शनदर्शनात् ॥१३२॥ मेरुकांचनदत्तानां गवां कोटिशतैरपि ॥ पंचकोटितुरंगानां तत्फलं लिं-

---

णणारे गायत्री मंत्रानें अग्निमध्यें आठ वेळ सद्भावानें शिवपूजन करितात त्यांस शंकर ब्रह्मलोक देतो. (१२६) एकत्र जमून नऊ वेळां जे शिवपूजन करितात त्यांस विष्णु लोकाची प्राप्ति होते व तेथें ते दिव्यभोगांचा उपभोग घेतात. (१२७) या विष्णुलोकाहून वर शिवपुर आहे असें समजावें. कर्म व यज्ञ यांविषयीं जे परायण असतात त्यांचें तें अनुपमेय भोगस्थान आहे. (१२८) तेथें अष्ट गुणविशिष्ट ऐश्वर्ययुक्त राक्षसांचें राज्य आहे. सायुज्य गतीला गेलेल्या मनुष्यांना तसेंच राज्य प्राप्त होतें असें समजावें. (१२९) भक्तियुक्त अंतःकरणानें स्त्रियांनीं लिंगाची पूजा केली असतां माझे विशेष भोगांनीं वैभवाचा उपभोग घ्यावयास मिळतो. (१३०) लिंगाराधनाचे ठिकाणीं भक्ति ठेवणाऱ्या व कामासक्त असलेल्या जनांस सर्व मनो-रथांची येथें प्राप्ति होते.

यानंतर दर्शनस्पर्शन माहात्म्य सांगतात. उमाशंकराचे संवादांत ह्मटलं आहे कीं, (१३१) हें पार्वति, देवाचें दर्शन पापहारक आहे. स्पर्शन घडलें असतां मनुष्य शिवपुरास जातो. भक्तिभावनेनें पूजन केलें असतां निःसंशय मोक्षप्राप्ति होते. (१३२) अंगन्यास व करन्यास करणाऱ्यास शरीरशुद्धि व आत्मशुद्धि ला-भते. लिंगाचा स्पर्श व त्याचें दर्शन घडल्यास सर्व शुद्धि होते. (१३३) मेरुपर्वता-प्रमाणें सुवर्णदान किंवा कोटिशः गोदान केल्यास किंवा पांच कोटि घोडे दान

गदर्शनात् ॥१३३॥ ब्रह्मघ्नो वा सुरापो वा स्तेयी वा गुरुतल्पगः॥ मातृहा पितृहा चैव वीरहा भ्रूणहापि वा ॥ अमंत्री वा शिवं स्पृष्ट्वा सर्वपापैः प्रमुच्यते ॥१३४॥

अथ नमस्कारविधिः॥ उरसा शिरसा दृष्ट्या मनसा श्रद्धया गिरा ॥ पद्भ्यामुभाभ्यां बाहुभ्यां प्रणामोऽष्टांग उच्यते ॥१३५॥ उत्संगांशं शरीरस्य सर्वस्पर्शं यथाविधि ॥ दंडवत्पतनं यत्स्याद्दंडप्रणतिरुच्यते ॥ १३६ ॥ अवष्टभ्यावनिं भालं करैर्जानुपदाग्रकैः॥ प्रणामः क्रियते योऽसौ प्रव्हाप्रणतिरीरिता ॥ पद्मकुड्मलवद्धस्तौ कृत्वा द्वावूर्ध्वसंस्थितौ ॥१३७॥ शिरस्यारोपणं यत्तत्करः संपुटकाव्हयः॥ एवं त्रिधानमस्कारः कथितः कमलासन ॥१३८॥ श्रेष्ठो मध्यः कनिष्ठश्चेत्ययं सम्यग्यथाक्रमात् ॥ ईश्वरस्याग्रतः श्रेष्ठो नमस्कार उदाहृतः ॥ १३९॥ मात्रादीनां नमस्कारो मध्यमः परिकीर्तितः॥इतरेषां नमस्कारः कनिष्ठः संप्रकीर्तितः ॥१४०॥ एवं नमस्कारविधिः प्रत्येकमुदितः क्रमात् ॥ सर्वेषामीश्वरादीना कनिष्ठः संकटस्थले ॥१४१॥ नमस्कारः प्रकर्तव्य-

---

केलें असतां मनुष्यास जें फल लाभतें तेंच फल लिंगाचें दर्शन केलें असतां प्राप्त होतें. (१३४) ब्रह्मघातकी, मद्यपी, चोर, गुरुपत्नीशीं गमन करणारा, मातृवध करणारा, पितृवध करणारा, वीरघात करणारा, गर्भहत्या करणारा, अमंत्रि यांनीं शिवस्पर्श केला असतां ते सर्व पापांपासून मुक्त होतात.

आतां नमस्कार विधि सांगतों. (१३५) उरानें, डोक्यानें, दृष्टीनें, मनानें, श्रद्धेनें, वाणीनें, दोन्ही पायांनीं, दोन्ही हातांनीं, जो नमस्कार करणें त्यास अष्टांग प्रणाम असें ह्मणतात. (१३६) मांड्या वगैरे सर्व शरीराचा यथाविधि ज्यांत स्पर्श होऊन काठीप्रमाणें जमिनीवर जें लांबचेलांब पडणें त्यांस दण्डप्रणति असें ह्मणतात. (१३७)कपाळ हात, गुडघे, पायांचीं बोटें, या सर्वांनीं जो नमस्कार केला जातो तो प्रव्हाप्रणत नांवाचा होय. पद्माचे कळीप्रमाणें दोन्ही हात जोडून (१३८) डोक्यावर ठेवणें यास करसंपुटक असें ह्मणतात. याप्रमाणें हे ब्रह्मदेवास तीन प्रकारचे नमस्कार सांगितले आहेत. (१३९)श्रेष्ठ, मध्यम, कनिष्ठ असा यांचा क्रम आहे. देवापुढें श्रेष्ठ नमस्कार सांगितला आहे. (१४०) मात्रादि देवतांना मध्यम नमस्कार सांगितला आहे व इतरांना कनिष्ठ नमस्कार सांगितला आहे. (१४१) याप्रमाणें प्रत्येकास नमस्कारविधि क्रमानें सांगितला आहे. ईश्वरादि सर्व देवतांना संकट प्रसंगीं कनिष्ठ (१४२)नमस्कार करावा कीं, जेणेंकरून त्या दैवतांचा अनुग्रह होईल. सर्व उपचारांमध्यें

स्तदनुग्रहकारकः ॥ सर्वेषामुपचाराणां प्रणामोऽत्यंतमुत्तमः ॥ १४२ ॥ तं विनाऽन्योपचारा ये कृतास्ते निष्फला यदि ॥ तस्मात्प्रणामं कुर्वीत सततं गुरुदेवयोः ॥१४३॥ दण्डप्रणामं यः कुर्यात्सोऽपि याति परां गतिं ॥ सोऽध्वराणां सहस्रस्य फलं लब्ध्वा सुखी भवेत् ॥१४४॥ पशवः पशुपत्यग्रे दण्डवत्पतिता भुवि ॥ पतंति पातकाः सर्वे नोत्तिष्ठंति पुनः सह ॥१४५॥ सर्वावस्थां गतो वापि युक्तो वा सर्वपातकैः ॥ शिवं दृष्ट्वा नमस्कुर्यात्सोऽपि याति परां गतिं ॥ १४६ ॥ स्वगुरुं वा महेशं वा प्रणमेदेकपाणिना ॥ यदि पूर्वार्जितं पुण्यं तस्याशेषं विनश्यति ॥१४७॥ तात्पर्यसंग्रहे ॥ वाज्रिण्या मुद्रया शक्रं पद्मिन्या दर्शयेद्विधिं ॥ शंखिन्या केशवं रुद्रं शिरस्यांजलिमुद्रया॥१४८॥वृत्तं॥देवत्वदेवविषयाणि नमांसि पुंसां तस्मै नमः श्रुतिवलादवधारयामः ॥ देवांतरेषु विहितान्यपि तान्यमूनि स्रोतांसि सागर इव त्वयि संपतंति ॥ १४९ ॥ पदे पदांतरन्यस्तं करौ चलनवर्जितौ ॥ स्तुतिर्वाचा हृदि ध्यानं चतुरंगं प्रदक्षिणम्

---

प्रणाम हा उपचार अत्युत्तम होय. (१४३) याशिवाय केलेले दुसरे उपचार व्यर्थ होत. करितां गुरु व देव यांस प्रणाम नांवाचा नमस्कार निरंतर करावा. (१४४) दण्डप्रणाम जो करितो तो उत्तम गतीला जातो; त्यास सहस्र यज्ञाचें फल मिळून तो सुखी होतो. (१४५) पशुपतीपुढें ह्मणजे शंकरापुढें जे पशू ह्मणजे प्राणी जमिनीवर दण्डप्रणाम घालतात त्यांचीं सर्व पातकें खालीं पडतात, तीं त्यांजबरोबर पुनः वर उठत नाहींत. (१४६) कोणत्याही अवस्थेंत असला अगर सर्व पापांनीं गांजला असला तरी मनुष्य शिवाला पाहून नमस्कार करील तर तोहि उत्तम गतीला जातो. (१४७) आपल्या गुरूला किंवा शिवाला एका हातानें जो नमस्कार करील त्याचें पूर्वार्जित असलेलेंही सर्व पुण्य नष्ट होतें. तात्पर्यसंग्रहांत सांगितलें आहे कीं, (१४८) वज्रिणी मुद्रेनें इन्द्रास, पद्मिनी मुद्रेनें ब्रह्मदेवास, शंकिनी मुद्रेनें विष्णूस व डोक्यावर अंजली मुद्रेनें रुद्रास नमस्कार करावा. (१४९) हे देवा, देवासंबंधानें ह्मणून मनुष्यें जितके नमस्कार करितात तितके सर्व 'तस्मै नमः' या वेदाधारानें तुझ्या ठिकाणींच संभवतात असें आह्मी समजतों. कारण अन्य दैवतांना केलेले नमस्कारही अनेक नद्या जशा निरनिराळ्या दिशेनें समुद्रालाच मिळतात, तसें ते तुझ्या ठिकाणींच पोंचतात. (१५०) पावलावर पाऊल टाकणें, हात न हलविणें, तोंडानें स्तुति करणें, हृदयीं ध्यान करणें ह्यांस चतुरंग प्रदक्षिणा

॥१५०॥ परिक्रमास्त्रिधा सृष्टिस्थितिसंहारभेदतः ॥ प्रदक्षिणं प्रवामं तदुभयं च पृथक् पृथक् ॥१५१॥ प्रकृष्टं दक्षिणं पार्श्वे गमने परितो भृशं ॥ यस्य यस्य च यच्छ्रेष्ठैः प्रदक्षिणमिति स्मृतं ॥१५२॥ परिक्रमे वामपार्श्वे प्रकृष्टं यस्य कस्य च ॥ प्रवाममभितः प्रोक्तमत्यर्थं नियतात्मभिः ॥१५३॥ प्रदक्षिणं सृष्टिमार्गः प्रवामं संहृतिः क्रमात् ॥ प्रदक्षिणं प्रवामं तत्तदाख्यातः स्थितिक्रमः ॥१५४॥ प्रदक्षिणं प्रवामं च प्रवर्त्याश्रमस्थयोः ॥ उभयः प्रक्रमः प्रोक्तो गृहस्थस्यैव सर्वदा ॥१५५॥ पूर्वं पदाभ्यां साष्टांगं प्रणिपत्य ततस्ततः ॥ दंडप्रणत्या परितः प्रक्रमस्त्रिविधः स्मृतः ॥१५६॥ पूर्वप्रकाराद्वपुषा देवपार्श्वे शिवो यथा ॥ भूमौ लुठित्वा गमनं तत्स्यादंगपरिक्रमः ॥१५७॥ स्वस्वाश्रमोक्तमार्गेण प्रकर्तव्यः फलेप्सुभिः ॥ परिक्रमोऽयं कर्तव्यो नियमेनानुवासरं ॥१५८॥ संख्यासमन्वितः सोऽयं नित्य इत्यभिधीयते ॥ अष्टम्यां च चतुर्दश्यां पक्षयोरुभयोरपि ॥ १५९ ॥ वैधृतौ च व्यतीपाते विषुवायनयोरपि ॥ चन्द्रसूर्यग्रहणयोः

---

असें ह्मणतात. (१५१) सृष्टि, स्थिति, संहार या भेदानें तीन प्रकारचा परिक्रम समजतात. प्रदक्षिण व प्रवाम या दोहोंचा समावेश केल्यानें निरनिराळा परिक्रम होतो. (१५२) उजवी बाजू देवाकडे करून देवाच्या अत्यंत दक्षिणभागीं जाणें त्यास श्रेष्ठ प्रदक्षिण असें ह्मणतात. (१५३) डावी बाजू देवाकडे करून देवाच्या अत्यंत वामभागीं गेलें असतां त्यास प्रवाम असें ह्मणतात. (१५४) प्रदक्षिण हा सृष्टिमार्ग होय व प्रवाम यास संहार असें मानितात, व प्रदक्षिण व प्रवाम या उभयतांस मिळून स्थितिक्रम असें ह्मणतात. (१५५) प्रदक्षिण व प्रवाम हीं आश्रमीं मनुष्यांस सांगितलीं आहेत व उभयप्रक्रम गृहस्थानें पाळावा असें सांगितलें आहे. (१५६) पूर्व पावलांनीं सांष्टांग प्रणाम करून नन्तर पुढें दण्डप्रणतीनें सभोंवार हिंडणें हे तीन प्रकारचे प्रक्रम आहेत. (१५७) पूर्वी सांगितल्या प्रकारानें देवाच्या पार्श्वभागीं शरीरानें लोटांगण घालीत जाणें यास अंगपरिक्रम असें ह्मणतात. (१५८) आपापल्या आश्रमांत सांगितल्याप्रमाणें फलांची इच्छा करणाऱ्यानें हा परिक्रम दररोज नियमानं करावा. (१५९) संख्यायुक्त जो परिक्रम त्यास नित्य असें ह्मणतात. दोन्ही पक्षांतील अष्टमी व चतुर्दशी ह्या दिवशीं (१६०) वैधृति, व्यतीपात, विषुव, संक्रमणकालीं चंद्रसूर्य ग्रहणसमयीं, आपल्या जन्म नक्षत्रीं, विशेषैक-

स्वजन्मर्क्षे विशेषतः ॥१६०॥ परिक्रमोऽयं कर्तव्यः स नैमित्तिक उच्यते ॥ महारोगभयोत्पाते उल्कादुःस्वप्नदर्शने ॥१६१॥ परिक्रमोऽयं कर्तव्यः स च नैमित्तिकः स्मृतः ॥ परिक्रमेषु सर्वेषु सोमसूत्रं न लंघयेत् ॥ १६२ ॥ लंघनात्सोमसूत्रस्य नरके पतनं ध्रुवं ॥ यावत्प्रासादविस्तारं तावदूर्ध्वं प्रणालिकं ॥१६३॥ उदस्थलं प्रणाल्यादि सोमसूत्रमिति स्मृतं ॥ प्रथमं द्वारमारभ्य द्वारावधि परिक्रमेत् ॥१६४॥ प्रदक्षिणकृतौ धीमान्स्तु दीर्घपदं न्यसेत्॥न गच्छेत्त्वरितं जल्पन्नेतरैर्मानुषैः सह॥१६५॥ छायां न लंघयेदंतः शिवधाम्नः सुबुद्धिमान् ॥ प्रजपन् शिवसूक्तानि ऋग्यजुःसामजानि च ॥१६६॥ स्तोत्राणि वा पुराणेषु विदधीत परिक्रमं ॥ प्रदक्षिणत्रयं कृत्वा नमस्कारैश्च पंचभिः ॥ १६७ ॥ पुनः प्रदक्षिणं कृत्वा शिवलोके महीयते ॥ शैवं पाशुपतं सोमं लाकुलं तु चतुर्विधं ॥१६८॥ शैवभेदमिति ज्ञात्वा संकरं न समाचरेत् ॥ तत्र संकरदोषेण राजा राष्ट्रं च नश्यति ॥१६९॥ मम देवार्चनं द्रष्टुमेह्येहीति जनं सदा ॥ आवाह

---

रून (१६१) जो हा परिक्रम करणें त्यास नैमित्तिक असें ह्मणतात. महारोग किंवा भय उत्पन्न झालें असतांना, उल्कापात पाहिला असतां, वाईट स्वप्नदर्शन झालें असतां (१६२) हा परिक्रम केला असतां त्यास नैमित्तिक असें ह्मणतात. सर्व परिक्रमांमध्यें सोमसूत्राचें उल्लंघन करूं नये. (१६३) सोमसूत्राचें उल्लंघन केलें असतां खात्रीनें नरकपात होतो. जेवढा प्रासादविस्तार असेल तितकीच वर प्रणालिका असते. (१६४) प्रणालीच्या उत्तर बाजूस सोमसूत्र असें ह्मणतात. पहिल्या दरवाज्याशीं आरंभ करून पुनः द्वारापर्यंत परिक्रम करावा.(१६५) प्रदक्षिणा करितांना बुद्धिमानानें दूर दूर पावलें टाकूं नयेत. घाईघाईनें चालूं नये दुसऱ्या मनुष्याशीं बोलत चालूं नये. (१६६) बुद्धिमान मनुष्यानें शिवमंदिराची छाया उल्लंघूं नये. ऋग्यजुःसामवेदांतर्गत शिवसूक्तांचा जप करीत (१६७) किंवा पुराणांतील शिवस्तोत्रें ह्मणत परिक्रम करावा. पांच नमस्कारांनीं तीन प्रदक्षिणा करून (१६८) पुनः प्रदक्षिणा केली असतां तो मनुष्य शिवलोकांत महत्व पावतो. शैव, पाशुपत, सोम, व लाकुल असे चार शैवभेद आहेत (१६९) हें जाणून संकर करूं नये. यांत संकर केला असतां त्या संकर दोषानें राजाचा व राज्याचा नाश होतो. (१७०) माझें शिवपूजन पहावयास या या असें ह्मणून जो लोकांस

दर्शयेद्योऽसौ पूजाविक्रयिकः स्मृतः ॥१७०॥ धनिनां पुरतो भुक्त्यै पूजादिकसमाचरन् ॥ स पापात्मा शिवद्रोही पतत्येवोग्रदुर्गतौ ॥१७१॥ योऽष्टधाभक्तिसंयुक्तः परिचर्यां शिवस्य तु ॥ आचरेद्द्विजनैः सर्वैः शिवभक्तो ममानिशं ॥१७२॥ अभ्यर्चनप्रतिज्ञानं वृत्तमूलमिति ॥ स्मृतं इत्याह ॥ तात्पर्यसंग्रहे ॥ भावोपपन्नमनसा त्वदुपासकानां पुंसाममोघमशनं भगवन् ब्रुवाणः ॥ मंत्रोऽयमंतरिति नः प्रतिभाति मूलं प्राग्भुक्तमर्चनविधेरनुवासरं ते ॥ १७३ ॥ शिवधर्मशास्त्रे ॥ वरं प्राणपरित्यागश्छेदनं शिरसोऽपि वा ॥ न त्वनभ्यर्च्य भुंजीत भगवंतं त्रिलोचनं ॥१७४॥ एवं निर्वहते यस्तु यावज्जीवं प्रतिज्ञया ॥ मनुष्यचर्मणा बद्धः स रुद्रो नात्र संशयः ॥१७५॥ अपहास्यंति ये मूढा निंदंति च शिवार्चनं ॥ शतजन्मार्जितं पुण्यं भस्मीभवति तत्क्षणात् ॥१७६॥ दासीगर्भेषु जायंते ते तथा सप्तजन्मसु ॥ कुष्ठी तु सप्तजन्मानि सप्तजन्मक्षयी भवेत् ॥१७७॥ आजन्मसंचितं धर्ममिष्टापूर्तं सदक्षिणं ॥ शिवस्य निंदा-

---

बोलावून दाखवितो तो पूजाविक्रय करणारा होय. (१७१) श्रीमंतापुढें पोट भरणाकरितां पूजादिकांचें जो आचरण करितो तो शिवद्रोही होऊन तो पापात्मा अत्यंत भयंकर दुर्गतीला जातो. (१७२) जो अष्ट प्रकारच्या भक्तिभावानें शंकराची एकटा परिचर्या करितो तो माझा भक्त होय. (१७३) अभ्यर्चनप्रतिज्ञानाला वृत्तमूल असें ह्मणतात असें सांगितलें आहे. तात्पर्यसंग्रहांत सांगितलें आहे कीं, हे भगवन् भावयुक्त मनाच्या तुझ्या पूजकांना भोजन सफल होतें असें प्रतिपादणारा " अंतः " हा मंत्र प्रत्यहीं भोजनापूर्वी करण्यांत येणाऱ्या पूजाविधिपर आहे असें आह्मांस वाटतें ( भोजनापूर्वी पूजा करून देवास नैवेद्य दाखवावा असें तात्पर्य आहे ). शिवधर्मशास्त्रांत ह्मटलें आहे कीं, (१७४) प्राणत्याग करणें किंवा शिरःछेद करणें हें वरें परंतु भगवान शंकराचें पूजन केल्याविना भोजन करणें नको; (१७५) ह्याप्रमाणें प्रतिज्ञेनें जीवांत जीव आहे तोपर्यंत जो आचरण करितो तो मनुष्य चर्मधारी असला तरी निःसंशय रुद्र होय. (१७६) जे मूर्ख शिवपूजनाची थट्टा करितात किंवा निंदा करितात त्यांचें शंभर जन्मीं मिळविलेलें पुण्य तात्काल भस्म होतें; (१७७) ते सप्तजन्म दासीपुत्र होतात व सप्तजन्म कुष्ठी होतात. व सप्तजन्म क्षयरोगी होतात. (१७८) दक्षिणापूर्वक इष्टापूर्वक जन्मापासून मिळवि-

मात्रेण सर्वं भवति निष्फलं ॥१७८॥ अपहास्येन दारिद्र्यं जायते नात्र संशयः ॥ शिवस्य पुरतो नृत्यं गीतवाद्यं करोति यः ॥१७९॥ तं निंदंति च ये मूढास्तथा नरकगामिनः ॥ संपर्कात् कौतुकाल्लोभाद्भयाद्वापि च यः स्मरेत् ॥ कीर्तयेदर्चयेद्रुद्रं सोऽप्यवश्यं गणो भवेत् ॥ १८० ॥

इति शैवरत्नाकरे शिवपूजाक्रमं नाम त्रयोदशोऽध्यायः ॥

---

लेलें धर्मपुण्य शिवनिंदा केली असतां सर्व निष्फल होतें. (१७९) निंदेनें दारिद्र्यांत जन्मतो यांत संशय नाहीं. शंकरापुढें जो नृत्य, गीत, वाद्य करितो (१८०) त्याची जे मूर्ख निंदा करितात ते नरकास जातात. संपर्कानें, कौतुकानें, लोभानें किंवा भयानें जो शंकराचें स्मरण किंवा पूजन किंवा कीर्तन करील तो निःसंशय गण होतो.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रंथांतील शिवपूजाक्रम नांवाचा तेरावा अध्याय संपूर्ण झाला.



## ॥ अथ चतुर्दशोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अथ लिंगधारणं ॥ व्यासजैमिनिसंवादे ॥ जैमिनिरुवाच ॥ व्यासं सर्वागमावासं मुनिं मुनिगणावृतं ॥ नीलोत्पलदलाभासं नीलकंठमिवापरं ॥१॥ कृतपूर्वाण्हिकाचारं कृतासनपरिग्रहं ॥ प्रसन्नं प्रांजलिः प्राह प्रणम्य किल जैमिनिः ॥२॥ धन्यस्त्वं सर्वभावेन वकुर्मासि मे गुरो ॥ को देवः परमः पूज्यः पूजा तस्य च किं वद ॥ ध्यानं च कीदृशं तस्य किं रूपं जपनं मुने ॥३॥

व्यास उवाच ॥ सुरासुरेंद्रसन्मौलिनिर्माल्यचरणांबुजं॥ गंगाधरं प्रणम्याहं कलानिधिकलाधरं॥४॥ इतिहासेषु वेदेषु पुराणेषु पुरातनैः ॥ महर्षिभिर्महादेवो महनीयः प्रतिष्ठितः ॥५॥ पूजा तस्य च देवस्य मया संकथ्यतेऽधुना ॥ रत्नसौवर्णरजतपीठे वा चंद्रकांतके॥६॥ स्फाटिके दारवे वापि स्थापयेल्लिंगरूपिणं ॥ उपचारपरत्वाच्च शिवस्यैतान् प्रकल्पयेत् ॥ उपचारान्समर्प्याथ स्तुत्वा नत्वा च धारयेत् ॥७॥ तथागस्त्यादिमुनयो दूर्वासो नंदिकेश्वरः॥ महाकालो दधीचिश्च पाणिनिश्च कणादकः ॥८॥ स्कंदो भृंगिरिटी वीरभद्रस्तु प्रमथादयः ॥ अजो हरिः सह-

---

व्यासजैमिनीच्या संवादांत सांगितलें आहे कीं, (१) जैमिनी ह्मणाला—जो सर्व वेदांचें स्थान आहे, जो मुनिसमुदायानें वेढिला आहे, व ज्याचें निळ्या कमलाप्रमाणें तेज आहे व जो जणुंकाय दुसरा नीलकंठच दिसत आहे अशा त्या व्यासानें (२) आपले पूर्वाण्हिक आचार संपविले होते व तो आसनावर बसला होता, त्या प्रसन्न व्यासाला जैमिनी हात जोडून ह्मणाला. (३) हे माझ्या गुरो तूं धन्य आहेस, आपण कृपा करून सांगावें कीं, देवांमध्यें अत्यंत पूज्य देव कोणता व पूजा कोणाची करावी; त्याचें ध्यान कसें, रूप कसें, जप कसा, हें सर्व निवेदन करावें.

(४) व्यास ह्मणाला— ज्याच्या चरणकमलीं सुरासुरवर नमन करितात त्या गंगाधरचंद्रमौलेश्वरास माझें नमन असो. (५) इतिहास, पुराण व वेद यांत महर्षींनीं महादेव श्रेष्ठ मानिला आहे. (६) त्याचीच पूजा मी तुला आतां सांगतों. रत्नाच्या, सोन्याच्या, रुप्याच्या, चंद्रकांताच्या, (७) स्फटिकाच्या किंवा लांकडाच्या पीठावर लिंगरूपी शंकराची स्थापना करून त्यास उपचार आवडत असल्यामुळें त्यास उपचार समर्पण करून स्तोत्र व नमस्कार करून धारण करावें. (८) त्याचप्रमाणें अगस्त्यादि मुनि, दुर्वास ऋषि, नंदिकेश्वर, महाकाल दधीचि, पाणिनि, कणादादिक, (९) स्कन्द, भृंगी, रिटी, वीरभद्र, प्रमथादिगण, ब्रह्मदेव, विष्णु,

स्राक्षो बाणासुरदशाननौ ॥९॥ वशिष्ठरुरुवाल्मीकिभरद्वाजात्रिगौतमाः ॥ एते परमशैवाश्च भजंति परया मुदा ॥१०॥ प्रसादसेवनाद्ध्यानादर्चनाद्धारणादपि॥ जाता दर्शनकर्तारः श्रावयंति जगत्त्रयं॥११॥धारयेद्यस्तु हस्तेन लिंगाकारं शिवं सदा ॥ तस्य हस्तस्थितं विद्धि मत्पदं संपदां पदं ॥१२॥ अपवर्गेप्सुरीशानं गळे भक्तिपरायणः ॥ ईश्वरेणाविनाभावसंबंधं कर्तुमात्मनः ॥१३॥ मूर्ध्नि वा धारयेल्लिंगं न कदाचिद्वियोजयेत् ॥ शिवस्य नित्यसंयोगः परया निजनिष्ठया॥१४॥ वक्त्रेऽवधारयेल्लिंगं मत्प्रभावं विभावयेत् ॥ तस्मिन् संनिहिते किंचिन्नोच्छिष्टमिति निश्चितं ॥१५॥ ब्रह्मविष्णुसुरेशादिदेवताः परया मुदा ॥ शिरोभिर्धारयंत्येते शिवलिंगमहर्निशं॥१६॥ अक्षपादादयः सर्वाः शक्तयः परया मुदा॥ धारयंत्यलिकाग्रेषु शिवलिंगं च सादरं ॥१७॥ विनिर्भिद्य तथा गात्रं विवरे लोहपात्रके ॥ शिवलिंगं विनिक्षिप्य पूजयंति च राक्षसाः ॥ १८॥ कंठेषु हरकण्ठादिमुनयो मनवस्तथा ॥ सर्वदा शिवलिंगं तु धारयंति यजंति च ॥१९॥ शिवरहस्ये ॥ गच्छन् तिष्ठन् स्वपन् जाग्रन्नुन्मिषन्नि-

---

सहस्राक्ष, (इंद्र) बाणासुर, दशमुख रावण, (१०) वशिष्ठ, रुरु, वाल्मीकि, भरद्वाज, अत्रि, गौतम हे परमशैव अत्यंत आनंदानें ज्याची पूजा करितात (११) व ज्याच्या प्रसादसेवनानें, ध्यानानें, अर्चनानें, धारणेनें, जे दर्शनशास्त्रकर्ते झाले, ते जगत्रयाला कळवितात कीं, (१२) जो कोणी शिवस्वरूप लिंगाकार नेहमीं हातांत वागवितो त्याचे हातांत संपदेचें स्थान आहे असें समजावें. (१३) मोक्षाची इच्छा करणाऱ्या भक्तिमानानें शिवाशीं कधींही वियोग न व्हावा म्हणून गळ्यांत लिंगधारण करावें (१४) किंवा डोक्यावर लिंगधारण करावें. त्याशीं कधींहि वियोग करूं नये. कारण अत्यंत निष्ठापूर्वक ईश्वराशीं नित्य संबन्धीं व्हावें. (१५) अथवा तोंडांत लिंगधारण करावें व माझा प्रभाव जाणावा. तें लिंग तोंडांत धरिलें असतां मुळींच उच्छिष्ट मानूं नये असें निश्चित झालें आहे. (१६) ब्रह्मा, विष्णु, इंद्र वगैरे देवता मोठ्या आनंदानें रात्रंदिवस डोक्यावर शिवलिंग धारण करितात. (१७) अक्षपादादि सर्व ऋषि व सर्व शक्ति सन्मानपुरःसर शिवलिंग आनंदानें डोक्याच्या अग्रभागीं धारण करितात. (१८) राक्षस आपलें शरीर फाडून त्यांत लोहपात्रांत घातलेलें लिंग ठेवितात, व त्याची पूजा करितात. (१९) हरकण्ठादि मुनि व तसेच मनु शिवलिंग कण्ठांत सर्वदा धारण करितात व पूजितात. शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, (२०) जातांना, उठतांना, निजतांना,

मिषन्नपि ॥ शुचिर्वाप्यशुचिर्वापि लिंगं सर्वत्र धारयेत् ॥ २० ॥ संध्या दानं तपो होमः स्वाध्यायः पितृतर्पणं ॥ वृथा भवति तत्सर्वं तस्माल्लिंगं तु धारयेत् ॥२१॥ अधमाधमयुक्तानां पापिनां चाभिचारिणां ॥ यमलोको न विद्येत सदा वै लिंगधारिणां ॥२२॥ यथा ह्यग्निसमावेशान्नायो भवति केवलं ॥ तथैव मम सांनिध्यान्न ते प्रकृतिमानुषाः ॥ २३ ॥ उत्तमांगे गले कक्षे तथा वक्षःस्थलेऽपि वा ॥ तथा हस्तस्थले वापि प्राणलिंगं धरेत्सुधीः ॥२४॥ ग्रन्थांतरे ॥ उत्तमांगे गले कक्षे सर्वदा धारयेच्छिवं ॥ मूत्राद्युत्सर्जने याने भोजनेऽपि सदा शुचिः ॥ २५ ॥ नाभौ च हृदये वापि सर्वावस्थासु सर्वदा ॥ श्रीलिंगधारणं कुर्याद्देवि नित्यं मम प्रियं ॥२६॥ नाभेरधो लिंगधारी पाप्मना च स युज्यते ॥ नाभ्यूर्ध्वे लिंगधारी च सौभाग्यज्ञानवर्धनः॥२७॥ लिंगेन कायसंबंधो रहितः स्यात्पिशाचवत् ॥ निमिषार्धं वियोगेन विशेषात्पातकी भवेत् ॥ २८ ॥ पापात्मनां हि लोकानां सांनिध्यं न च कारयेत् ॥ यः कुर्यात्स शिवद्रोही गुरुद्रोही बहिष्कृतः ॥२९॥ अवैदिकायाशैवाय रहस्यं तदिदं मु-

---

जागृतावस्थेंत, पापण्यांची उघडझाप करितांनाही, पवित्रावस्थेंत किंवा अपवित्रावस्थेंतही, सर्वावस्थेंत लिंगधारण करावें. (२१) संध्या, दान, तप, होम, स्वाध्याय, पितृतर्पण, हीं सर्व व्यर्थ होतात, करितां लिंगधारण करावें. (२२) अधमाधम लोक पापी लोक, जारणमारण करणारे लोक यांनीं जर लिंगधारण केलें तर त्यांस यमलोक टळतो. (२३) अग्निसंपर्कामुळें जसें केवळ लोखंड होत नाहीं तसेंच माझ्या सांनिध्यानें प्राकृत मनुष्य होत नाहीं. (२४) बुद्धिमानानें. डोक्यावर, गळ्यांत, कांखेंत, तसेंच उरावर त्याचप्रमाणें हाताचे तळावरही प्राणलिंग धारण करावें. दुसऱ्या ग्रन्थांत असें सांगितलें आहे कीं, (२५) डोक्यावर, गळ्यांत, कांखेंत, सर्वदां शिवलिंग धारण करावें. मूत्रादि उत्सर्जन प्रसंगीं, जातांना, जेवतांनाही तो शुद्ध असतो असें समजावें. (२६) नाभीमध्यें, हृदयावर सर्वावस्थेंत सर्वकालीं हे देवी, माझें प्रियलिंग धारण करावें. (२७) नाभीच्या खालीं लिंग धारण करणारा पापी होतो, व नाभीच्या वर लिंगधारण करणारा सौभाग्य पावतो व त्याचें ज्ञान वाढतें. (२८) लिंगानें रहित शरीरधारी मनुष्य पिशाचाप्रमाणें होतो, व निमिषार्ध लिंगवियोग झाला असतां विशेष पातकी होतो. (२९) पापी लोकांचा संपर्क करूं नये. जो कोणी असा संपर्क करील तो शिवद्रोहि व गुरुद्रोही होऊन बहिष्कृत होईल. (३०) जो शैव नसून अवैदिक असेल त्यास हें रहस्य सांगूं नये

ने ॥ न वक्तव्यं न वक्तव्यमिति शंकरभाषितं ॥३०॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गोपनीयमिदं त्वया ॥ वैदिकाय च शैवाय वक्तव्यं भक्तिशालिने ॥३१॥ शिवरहस्ये ॥ अंगे प्रतिष्ठितं लिंगमंगलिंगसमुद्भवं ॥ तत्सुखं त्वनुभोक्तव्यं कदापि सुखमर्चनं ॥३२॥ स्वयं च मज्जनं कृत्वा स्वयमेवार्चनं सदा ॥ स्वयमेवार्पयेद्द्रव्यं स्वयमेव जपेत्सदा ॥३३॥ अतःपरं गुरोर्लिंगादन्यलिंगं न पूजयेत् ॥ अन्यलिंगप्रसादेन गणत्वं न प्रयुज्यते ॥३४॥ बहुलिंगार्चनं चैव बहुभावं गुरोस्तथा ॥ बहुप्रसादं कुर्वंति वेश्यापुत्रा यथैव ते ॥ ३५ ॥ शिवपूजापरो भूत्वा पूर्वकर्माणि वर्जयेत् ॥ अथ वा पूर्वकर्म स्यात्सा पूजा निष्फला भवेत् ॥३६॥ शिवपूजापरो भूत्वा योऽन्यदेवं स्मरेत् सकृत् ॥अष्टाविंशतिकोटींश्च नरकान्यात्यसौ ध्रुवं॥३७॥ लिंगार्चनैकशरणो योऽन्यदेवं तु पश्यति ॥ नरकं नायकं गत्वा शुनिगर्भेषु जायते ॥३८॥ लिंगार्चनरता नारी सूतिका तु रजस्वला ॥ रविरग्निर्यथा वायुस्तद्वत्कोटिगुणः शुचिः ॥३९॥ स्त्री वाथ पुरुषः षंढश्चं·

---

हे ऋषे, हें कधींही सांगूं नये असें शंकराचें सांगणें आहे. (३१) ह्याकरितां तूं हें सर्व प्रयत्नानें गुप्त ठेवावें व केवल भक्तिमान् शैवाला व वैदिकालाच सांगावें. शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, (३२) अंगाचे ठायीं लिंग आहे व अंगलिंगापासून उत्पन्न झालेल्या सुखाचा उपभोग घ्यावा. (३३) स्वतः मज्जन करून सदा स्वतः अर्चन करावें, स्वतः द्रव्यार्पण करावें व सर्वदां स्वतः जप करावा. (३४) यापुढें गुरुलिंगाहून दुसऱ्या लिंगाची पूजा करूं नये. अन्य लिंगप्रसादानें गणत्व प्राप्त होत नाहीं. (३५) जे अनेक लिंगाची पूजा करितात व गुरूचे ठायीं अनेक भाव बाळगितात, व अनेक लोकांचे प्रसाद घेतात ते वेश्यापुत्रांप्रमाणें समजावेत (३६) शिवपूजापर होऊन पूर्व कर्मांचा त्याग करावा अथवा जर पूर्व कर्म राहील तर ती पूजा निष्फल होईल. शिवपूजी होऊन जो दुसऱ्या देवाचें एखादे वेळीं स्मरण करील त्यास अठ्ठावीस कोटि नरक निश्चयें प्राप्त होतील. (३७) लिंगार्चन करणारा जो शरण दुसऱ्या देवाला पाहतो तो नायक नामक नरकाला जातो व कुत्रीच्या पोटीं जन्मतो. (३८) लिंगाचें पूजन करणारी स्त्री जरी बाळंतीण असली किंवा पुष्पवती असली तरी ती सूर्य, अग्नि, वायु, ह्यांप्रमाणें कोटि गुणांनीं पवित्र असते. (३९) लिंगार्चनांत स्त्री, पुरुष, षंढ, चांडाल व द्विजकुलांत उत्पन्न झालेला पुरुष ह्यांत जातिभेद नाहीं; हे सर्व साक्षात रुद्र असें मानिलें आहे. (४०) सूतक असतां किंवा मृतक असतां पूजालोप करूं नये कारण हा देह पाण्याच्या

डालो द्विजवंशजः ॥ न जातिभेदो लिंगार्चे सर्वे रुद्रसमाः स्मृताः॥४०॥ पूजालोपो न कर्तव्यः सूतके मृतकेऽपि वा ॥ जलबुद्बुदवद्देहं तस्मान्नित्यं शिवं यजेत् ॥४१॥ सांगैर्द्रव्यैश्च किं कार्यं गंधपुष्पाक्षतादिभिः ॥ अत्यल्पोदकमात्रेण पूजा संपूर्णतामियात् ॥ ४२ ॥ अंगलोपकृतो लोपस्तस्मादिह न विद्यते ॥ तस्मादेकमना भूत्वा यावज्जीवं प्रतिज्ञया ॥४३॥ अर्चयित्वा महादेवमापन्नोऽपि सदा बुधः ॥ लिंगार्चनस्य काले तु प्रच्छन्नं पटमुत्तमं ॥४४॥ पापी कोपी परिभ्रष्टो नास्तिको वेददूषकः ॥ दुर्जनश्च दुराचारो दुःशीलश्चाप्यदीक्षितः ॥ ४५ ॥ प्रमादाद्दर्शनं कुर्यात्सा पूजा निष्फला भवेत् ॥ ४६ ॥

इति शैवरत्नाकरे लिंगधारणन्नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

---

बुडबुड्याप्रमाणें आहे; ह्मणून नेहमीं शिवपूजन करावें. (४१) सांग द्रव्यें किंवा गंधपुष्पांचीही पूजेस अपेक्षा नाहीं कारण अत्यल्प पाण्यानेंही पूजेची पूर्ति होते. (४२) पूजेच्या एखाद्या अंगाचा लोप झाला असतां त्याकारणास्तव पूजालोप होत नाहीं. याकरितां एकभावानें आमरण प्रतिज्ञेनें (४३) विपदावस्थेंत असतांही विद्वानानें महादेवाची पूजा करून लिंगार्चनकाळीं उत्तम वस्त्राच्छादन करणें हें उत्तम आहे (४४) पापी, कोपी, भ्रष्ट, नास्तिक, वेदनिंदक, दुर्जन, दुराचारी, दुष्ट स्वभावी, अदीक्षित (४५) यांचें चुकून जरी पूजेच्या वेळीं दर्शन झालें तरी ती पूजा निष्फल होते.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकरग्रन्थांतील लिंगधारण नांवाचा चौदावा अध्याय पुरा झाला.

## ॥ अथ पंचदशोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अथ पादोदकमाहात्म्यं ॥ बोधायनशाखायां॥ अथातो महादेवस्य पादोदकविधिं व्याख्यास्यामः ॥ श्रीरुद्रेण पवित्रेण शतधारेण सहस्रधारेणाच्छिद्रमपरिमितमविघ्नमक्षतमभीष्टदमच्युतं॥ परमं पवित्रं भगवंतमेवं स्नापयित्वा॥ सर्वो वै रुद्र इति द्वाभ्यां ऋतꣳ सत्यं परं ब्रह्मेति वा प्राशयेत् ॥ १ ॥ जाबालशाखायां ॥ भगवतः पादौ प्रक्षाल्य शंखं प्रपूर्य ॥ गंधपुष्पाक्षतादिभिरभ्यर्च्य चरुं निवेद्य॥ इमं मे गंगेत्यभिमंत्र्य कद्रुद्रायेति मत्वा रुद्रायेति संमार्जनं कृत्वा ॥ ऋतꣳ सत्यं परं ब्रह्मेति प्राशयेत् ॥ य एवं कुर्यात्सकुलजान् दशपूर्वान्दशापरान्नात्मानं च तारयेत् ॥ २ ॥ कुरुक्षेत्रे नैमिषे च भूमिभागाश्च ये शुभाः ॥ सर्वे तीर्थोदकस्यैते कलां नार्हंति षोडशीं ॥ ३ ॥ अकालमृत्युमथनं सर्वव्याधिविनाशनं ॥ सर्वदोषोपशमनं शंभोः पादोदकं शुभं ॥४॥ सर्वमंगलमांगल्यं सर्वपावनपावनं ॥ सर्वतीर्थफलं सद्यः प्राप्यते मूर्ध्नि धारणात् ॥५॥ सर्वोत्पातप्रशमनं सर्वरोगप्रभेदनं ॥ दुष्टग्रहोप-

---

अथ पादोदकमाहात्म्य सांगतों—बौधायनशाखेंत, यानंतर महादेवाच्या पादोदकविधीचें व्याख्यान करितों. (१) जो अखंड असून ज्याला मापतां येत नाहीं; ज्याच्यापाशीं मलमायादि विघ्नें नसून जो सर्वदा अक्षत (नाशरहित) आहे अशा पूज्य शिवाला श्रीरुद्राच्या आवर्तनानें शंभर व सहस्रधारांनीं अभिषेक घालून "सर्वोपासून ब्रह्म" पर्यंत मंत्र ह्मणून अभिषेकोदक प्राशन करावें. जाबालशाखेंत सांगितलें आहे कीं, (२) भगवंताच्या पायांचें प्रक्षालन करून त्या पाण्यानें शंख भरावा व गंधपुष्पाक्षतांनीं पूजन करून चरु निवेदन करावा. व "इमं मे गंगे" या मंत्रानें अभिमंत्रित करून "कद्रुद्राय" (साक्षात् परब्रह्मस्वरूप हें उदक आहे), असें समजून रुद्रायेति या मंत्रानें संमार्जन करून "ऋतꣳ सत्यं" या मंत्रानें प्राशन करावें, याप्रमाणें जो करितो तो मागच्या पुढच्या दहा दहा पिढ्यांचा उद्धार करून आपला स्वतःचा उद्धार करितो. (३) कुरुक्षेत्रामध्यें, नैमिषारण्यांत जीं पुण्यस्थळें आहेत तीं व सर्व तीर्थोदकें या तीर्थाची सोळाव्या हिश्शानेंहि बरोबरी करूं शकत नाहींत. (४) अकालमृत्यूंचा, सर्व व्याधींचा, व सर्व दोषांचा नाश करणारें हें पवित्र शिवपादोदक आहे. (५) सर्व मंगलांत मंगल, सर्व पावनवस्तूंत पावन असें हें तीर्थ डोक्यावर धारण केलें असतां तात्काल सर्व तीर्थांचें फल देणारें आहे.(६)सर्व उत्पातांचें शमन करणारें,सर्व रोगांचा नाश करणारें,

शमनमिष्टसिद्धिप्रदायकं ॥६॥ अगम्यागमनं चैव पापाचाराश्च येऽशुभाः ॥ तेऽपि पूता भवंत्याशु सद्यः पादांबुधारणात् ॥७॥ अशौचं नैव विद्येत सूतके प्रेतके तथा ॥ गृहे यस्मिन् प्रसूता स्त्रीः संभोगास्पृश्य एव च ॥ दूषितश्चापि पादांबु बिभ्रच्छुद्धिमवाप्नुयात् ॥८॥ पादोदकं पुरभिदः पाशजालहरं परं ॥ पाणिशुक्तिभिरादाय पपुः कामं गणेश्वराः ॥ ९ ॥ शंभोः पादोदकं पीत्वा पश्चादशुचिशंकया ॥ य आचमति मोहेन तं विद्याद्ब्रह्मघातकं ॥ १० ॥ आदित्यपुराणे ॥ पादौ प्रक्षाल्य देवस्य कराभ्यां कमलेक्षण ॥ अभ्युक्ष्य चात्मनो मूर्ध्नि ह्यतिथेश्च गुरोस्तथा ॥११॥ रामायणे ॥ प्रमथप्रवरैः पीतं सुरमुख्यैः शिरोधृतं ॥ शुद्धं तत्वतयादिष्टं वल्मीकप्रभवेन च ॥१२॥ तत्र देवर्षिगंधर्वा वसुधातलवासिनः ॥ भवांगपतितं तोयं पवित्रमिति पस्पृशेत् ॥१३॥ तथा च वैद्यशास्त्रे ॥ निर्माल्यसलिलं प्राश्य देवदेवस्य शूलिनः ॥ क्षयकुष्टज्वरश्वासैर्मुच्यते किल्बिषैरपि ॥१४॥ अभिषिक्तजलं प्रातः पिबेन्नित्यं दिने दिने ॥ शूलकुष्टा-

---

दुष्ट ग्रहांचें शमन करणारें, इच्छित वस्तु देणारें असें हें शिवपादोदक आहे. (७) जिच्याजवळ गमन करूं नये अशा स्त्रीशीं गमन करणारे, पापवर्तन करणारे, जे अपवित्र लोक त्यांनीं शिवपादोदक धारण केल्यास ते तात्काल पवित्र होतात. (८) शिवपादोदक धारण केल्यास सूतकदोष नाहीं, प्रेतदोष नाहीं, घरांतील बाळंतीण स्त्री, रजस्वला स्त्री, व संभोगानें अपवित्र झालेला मनुष्य यांनीं शिवपादोदक धारण केलें असतांही तीं शुद्ध होतात. (९) पाशजाल नाश करणारें शिवपादोदक हातांत घेऊन गणेश्वर विशेष प्राशन करिते झाले. (१०) शिवपादोदक प्राशन करून मागून आपण अशुचि आहों या शंकेनें जो कोणी मोहानें आचमन करितो तो ब्रह्मघातकी असें मानावें. आदित्यपुराणांत सांगितलें आहे कीं, (११) हे कमलनेत्रा, साक्षात् शिवस्वरूपी अतिथीचें गुरूचें पादप्रक्षालन करून आपल्या डोक्यावर त्या पादोदकानें प्रोक्षण करून घ्यावें. (१२) रामायणांत सांगितलें आहे कीं, श्रेष्ठ प्रमथांनीं तें शिवपादोदक प्राशन केलें आहे, व सुरनायकांनीं मस्तकावर धारण केलें आहे व वाल्मीकानें तें शुद्ध असल्याचें उपदेशिलें आहे. (१३) तेथें देवर्षि, गंधर्व, मर्त्यलोक यांनीं शंकराचे अंगावरून पडलेलें पाणी पवित्र ह्मणून धारण केलें. त्याचप्रमाणें वैद्यशास्त्रांत सांगितलें आहे कीं, (१४) देवाधिदेव शंकर त्याचें तीर्थ प्राशन केलें असतां क्षय, कुष्ट, (कोड) ज्वर, श्वास ह्या रोगांपासून तसेंच पापांपासून प्राणी मुक्त होतो. (१५) हे प्रिये, प्रातःकाळीं शंकराला अभि-

द्यपस्मारज्वराणां भेषजं प्रिये ॥१५॥ दासमार्गप्रपन्ना ये श्रौते पाशुपते स्थिताः ॥ तैरेव पेयं धार्यं च घ्रातव्यं च मुमुक्षुभिः ॥१६॥ लिंगाभिषेकं कुर्वीत तल्लिंगोदकमुच्यते ॥ तत्र स्नात्वा च पीत्वा च नाशयत्यखिलामयं ॥१७॥ आरोग्यमस्तु बलमस्तु यशोऽस्तु नित्यं सौभाग्यमस्तु शिवमस्तु शशांकमौले ॥ त्वत्पादपंकरुहमज्जनपुण्यतोयमास्वादयामि परतो न पुनर्भवाय ॥१८॥ शिवरहस्ये ॥ मत्प्रसादोदकं पुष्पं सदा धार्यं मदाश्रितैः ॥ त्र्यक्षा दशभुजाः सर्वे मम साम्यपराक्रमाः ॥ १९ ॥

इति शैवरत्नाकरे पादोदकमाहात्म्यं नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५॥

---

षेक करून तें तीर्थ प्रत्यहीं प्राशन करावें. तें शूल, कुष्ठ, अपस्मार, ज्वर या रोगांचें औषध आहे. (१६) दासमार्गाला गेलेल्या व श्रौतपाशुपतांत असलेल्या लोकांनीं तें तीर्थ प्राशन करावें व धारण करावें व मुमुक्षूंनीं आघ्राण करावें. (१७) लिंगाभिषेक करावा, त्यास लिंगोदक असें ह्मणतात. त्यानें स्नानपान केलें असतां तें सर्व रोग नाश करितें. (१८) हे चंद्रशेखरा, तुझ्या पदकमलाचें पुण्यतीर्थ मी प्राशन करितों, करितां तुझ्या कृपेनें मला आरोग्य, बल, यश, सौभाग्य, कल्याण, हीं निरंतर असोत, पुनः मला पुनर्जन्म नसावा. 'शिवरहस्यामध्यें सांगितलें आहे कीं, (१९) माझें प्रसादोदक व पुष्पें हीं माझ्या आश्रितांनीं सदा धारण केलीं असतां ते दशभुजधारी व त्रिनयनधारी व माझ्यासारखे पराक्रमी होतात.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रंथांतील पादोदकमाहात्म्य नांवाचा पंधरावा अध्याय पुरा झाला.

## ॥ अथ षोडशोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अथ प्रसादस्थलं ॥ प्रसादपूर्विका येयं भक्तिर्मुक्तिविधायिनी ॥ नैवासौ शक्यते प्राप्तुं नरेणैकेन जन्मना ॥१॥ अनेकजन्मसिद्धानां प्रसीदति महेश्वरः ॥ प्रसन्ने सति देवेशे पशुत्वात्स विमुच्यते ॥ २ ॥ भक्तियोगे सदाभ्यासस्ततो भक्तिपरो भवेत् ॥ परया च ततो भक्त्या प्रसादो लभ्यते नरैः ॥३॥ प्रसादः सर्वपापेभ्यो मुक्तिं मुक्तिं प्रयच्छति ॥ महापापोऽपि यो मर्त्यः सोऽपि जन्मत्रयात्परं ॥४॥ न योनियंत्रपीडा च भवेदिति न संशयः ॥ ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्यास्तथा शूद्राश्च ये नराः ॥५॥ न लंघयेयुर्निर्माल्यं धारणे सुमहत्फलं ॥ स्थिरपर्युषितं माल्यं लिंगस्थाने वसंस्त्रिधा ॥६॥ तेषां चंडेश्वरप्रीतिकरं निर्माल्यसंज्ञकं ॥ दग्धदेहमिदं ज्ञानी क्षणाद्ज्ञानाग्निना व्ययेत् ॥७॥ प्रसादादमलं ज्ञानं कर्मबन्धं प्रहास्यति ॥ निर्मलस्य तु निर्माल्यं निर्मलत्वादनिंदितं ॥ तस्मादभोज्यं निर्माल्यं प्राकृतैरशिवात्मभिः ॥ ८ ॥ रुद्रेणात्तमश्नंति रुद्रेण पीतं पिबंति रुद्रेणाघ्रातं जिघ्रंति तस्माद्ब्राह्मणाः प्रशां-

---

आतां प्रसादस्थलमाहात्म्य सांगतों. (१) मुक्ति देणारी शिवभक्ति प्रसादापासून उत्पन्न होणारी आहे. मनुष्याला एका जन्मानेंच ही मिळणें शक्य नाहीं. (२) अनेक जन्मींच्या सिद्धांवर महेश्वर प्रसन्न होतो; व महेश्वर प्रसन्न झाला असतां प्राणी पशुत्वापासून मुक्त होतो. (३) करितां मनुष्यानें भक्तियोगाचे ठायीं नेहमीं अभ्यास करावा; तेणें करून तो भक्तिमान् होईल व नन्तर श्रेष्ठ भक्तीनें मनुष्यास प्रसाद लाभतो. (४) प्रसाद हा भुक्ति व सर्व पापांपासून मुक्ति देऊन ऐश्वर्य देतो. महापापी मनुष्यही तीन जन्मांत मुक्ति पावतो. (५) त्यास गर्भवासाचें दुःख होत नाहीं हें निःसंशय आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, तसेंच शूद्र यांनीं (६) निर्माल्याचें उल्लंघन करूं नये. निर्माल्य धारण केला असतां महत्फल आहे. लिंगस्थानाजवळ राहून त्रिकाल जो शिवनिर्माल्य धारण करितो (७) त्याला हा निर्माल्य शंकराची प्रीति होण्यास कारण होतो. ज्ञानी मनुष्य ह्या भिकार देहाचा ज्ञानाग्निनें क्षणांत नाश करितो. (८) शिवप्रसादानें निर्मल ज्ञान उत्पन्न होऊन कर्मबंधाचा नाश होतो. निष्पाप देवाचा निर्माल्य निष्पापत्वामुळें अनिंदित आहे. ह्मणून जे शिवभक्त नाहींत त्यांनीं निर्माल्य भोजन करूं नये. (९) सर्व लोक रुद्रानें खाल्लेलें खातात, व प्यालेलें पितात, हुंगलेलें हुंगतात

तमनसो विद्वांसो भूत्वा निर्माल्यमेव च सेवंत इत्युपनिषत् ॥९॥ वाजपेयसहस्रेण त्वश्वमेधशतेन च ॥ नास्तीह बहुयज्ञैश्च रुद्रोच्छिष्टसमं फलं ॥१०॥ तिलानां षोडषांशं तु तृणाग्रे बिंदुसंमितं ॥ गन्धमाल्यसमायुक्तं प्रसादमिति शस्यते ॥११॥ ब्रह्महत्याविशुध्यर्थं निर्माल्यस्य च भक्षणं॥तस्य पापमहं शीघ्रं नाशयामि वरानने॥१२॥यस्य प्रसादाद्देवस्य ब्रह्मा ब्रह्मत्वमाप्तवान् ॥ विष्णुत्वमपि विष्णुश्च स शिवः कैर्न सेव्यते ॥१३॥ लिंगार्पितेऽखिले विश्वमर्पितं स्यान्न संशयः॥ साक्षाल्लिंगार्चनोच्छिष्टं स्वदेहे धारयेन्नरः॥ वज्रकायस्तु भवति शिवसायुज्यमाप्नुयात् ॥१४॥ एकपादपुराणे ॥ अन्नपानादिभिः सर्वैर्यस्तु संतर्पयेच्छिवं ॥ तत्फलेनांशतो मोक्षं शिवं परमकारणं ॥ १५ ॥ निर्माल्यं धारयेद्भक्त्या शिरसा पार्वतीपतेः ॥ राजसूयस्य यज्ञस्य फलमाप्नोति नारद ॥ १६॥ शिरसा शिवनिर्माल्यं भक्त्या यो धारयेद्यदि ॥ अशुचिर्वीतमर्यादः सर्वावस्थां गतोऽपि वा॥१७॥ तस्य पापानि घोराणि नाशयत्येव शंकरः॥

---

ह्मणून ब्राह्मण शांतचित्त विद्वान होऊन निर्माल्याचेंच ग्रहण करितात, असें उपनिषदाचें मत आहे. (१०) सहस्र वाजपेय यज्ञ किंवा शंभर अश्वमेध यज्ञ व अनेक यज्ञही रुद्रानें उच्छिष्ट केलेल्या प्रसादाच्या फलाशीं साम्य पाऊं शकत नाहींत. (११) गंधमाल्ययुक्त प्रसाद षोडशांशतिलमात्र किंवा तृणाग्रावरील बिंदु इतका असला तरी तो प्रसाद ह्मणून प्रशस्त मानिला आहे. (१२) हे सुंदरी, ब्रह्महत्तेच्या पापनिरसनार्थ जो शिवनिर्माल्य भक्षण करितो त्याचें पाप मी त्वरित दूर करितों. (१३) ज्या शिवाच्या प्रसादानें ब्रह्माला ब्रह्मत्व व विष्णूला विष्णुत्व प्राप्त झालें त्या शिवाचें सेवन कोण करणार नाहीं. (१४) लिंगाला अर्पण केलें असतां विश्वाला अर्पण केल्यासारखें आहे यांत संशय नाहीं. लिंगपूजोच्छिष्ट जो साक्षात् स्वदेहीं धारण करितो, तो वज्रदेही होऊन शिवसायुज्य मिळवितो. (१५) एकपादपुराणांत सांगितलें आहे कीं, अन्नपानादिकें करून जो शिवास संतुष्ट करितो त्यास त्या फलाच्या अंशमात्रानेंच उत्कृष्ट मोक्षप्राप्ति होते. (१६) शंकराचा निर्माल्य भक्तीनें डोक्यावर धारण करावा. तेणेंकरून हे नारदा, त्यास राजसूययज्ञाचें फल मिळतें. (१७) भक्तिभावानें जो शिवनिर्माल्य डोक्यावर धारण करितो तो पापी असला, मर्यादातिक्रमण केलेला असला, किंवा कोणत्याही अवस्थेंत असला तरी (१८) शंकर त्याचीं भयंकर पापें नष्ट करितो. हे नारदा, शिवनिर्माल्य लोभानें

लोभान्न धारयेच्छंभोर्निर्माल्यं न च भक्षयेत् ॥ १८ ॥ न स्पृशेदपि वा चैतल्लंघयेन्नापि नारद ॥१९॥ निर्माल्यलंघनात्पुंसः सिद्धिभ्रंशोऽपि जायते ॥ निर्माल्यदानान्नरकं पच्यते कालमक्षयं ॥ २० ॥ लिंगे स्वयंभुवि प्राणे बाणे रत्ने रसस्थिते ॥ सिद्धैः प्रतिष्ठिते चैव न चंडोऽधिकृतो भवेत् ॥ २१ ॥ शिवरहस्ये ॥ प्रसादः प्रथमो ग्राह्यः प्रसादाद्गुरुसंभवः ॥ प्रसादान्निर्मलं नित्यं प्रसादात्सत्यसंग्रहः ॥ २२ ॥ प्रसादात्करुणाभावः प्रसादात्सर्वकारणं ॥ प्रसादो गुरुवाक्यं च प्रसादश्च सुभोगदः ॥२३॥ परंज्योतिः परं तत्वं परात्परतरं महत् ॥ परवस्तुसमावाप्तिः परमाणुप्रसादतः ॥२४॥ प्रसादं गिरिजे देवि सिद्धकिन्नरगुह्यकैः ॥ विष्णुप्रमुखदेवैश्च सुदुर्लभमगोचरं ॥२५॥ एक एवेति यो रुद्रः सर्ववेदेषु गीयते ॥ तस्य प्रसादलेशेन भुक्तिर्मुक्तिश्च शांकरि ॥ २६ ॥ वसुरुद्रार्करूपेभ्यो मध्यपिंडस्तु पुत्रदः ॥ वेदोक्तं रुद्रनिर्माल्यं किं पुनर्बहुभाषणैः ॥२७॥ निर्माल्यं परमानंदं निर्माल्यं शुद्धसज्जनं ॥ निर्माल्यं परमं ज्ञानं निर्माल्यं

---

धारण करूं नये, किंवा भक्षण करूं नये. (१९) स्पर्श करूं नये किंवा उल्लंघन करूं नये. (२०) निर्माल्य लंघन केला असतां पुरुषाच्या सिद्धीचा नाश होतो. निर्माल्यदान केलें असतां अक्षय कालपर्यंत दान करणाऱ्यास नरकांत रहावें लागतें. (२१) स्वयंभुलिंग, प्राणलिंग, बाणलिंग, रत्नलिंग, रसस्थितलिंग, सिद्धानें स्थापन केलेलें लिंग ह्यांच्या ठायीं चंडास अधिकार नाहीं. शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, (२२) प्रथम प्रसाद ग्रहण करवा; प्रसादापासून गुरूत्पत्ति आहे; प्रसादानें पापक्षय होतो; प्रसादामुळें सत्यसंचय होतो; (२३) प्रसादानें दयावृत्ति जागृत होते; प्रसाद सर्वांस कारण आहे; प्रसाद हें गुरुवाक्य होय; प्रसाद उत्तम भोग देणारा आहे; (२४) अत्यंत सूक्ष्म प्रसादही श्रेष्ठ तेज असून सर्व श्रेष्ठ आदितत्व आहे व अतिपरमाणुप्रसादानें परमात्मप्राप्ति होते. (२५) हे पार्वति देवि, सिद्ध, किन्नर, गुह्यक, विष्ण्वादि देव यांसही प्रसाद दुर्लभ व अगोचर आहे. (२६) सर्व वेदांमध्यें रुद्र केवळ एकच श्रेष्ठ आहे असा ज्याचा महिमा वर्णिला आहे त्याच्या प्रसादांशानें हे शंकरप्रिये, मनुष्यास भोग व मोक्ष लाभतो. (२७) वसु, रुद्र, अर्क यांतून मध्यमपिंड जसा संतानदायक आहे तसाच वेदोक्त रुद्र निर्माल्य आहे. विशेष सांगणें निष्कारण आहे. (२८) निर्माल्य हाच परमानंद, निर्माल्य हाच सत्पुरुष, व निर्माल्य हेंच श्रेष्ठज्ञान व परमामृत आहे. कालिका-

परमामृतं ॥२८॥ कालिकाखंडे ॥ प्रसादं त्रिविधं प्रोक्तं शुद्धं सिद्धं प्रसिद्धकं ॥ शुद्धं लिंगमुखात्त्यक्तं सिद्धं चरविसर्जितं ॥ प्रसिद्धं गुरुणा त्यक्तं प्रसादं त्रिविधं स्मृतं ॥२९॥ गुरुप्रसादो मुक्त्यर्थं भुक्तिर्लिंगप्रसादतः ॥ गुरुकारुण्यतो लभ्यमखंडितमिदं द्वयं ॥ ३० ॥ वातुलतंत्रे ॥ असमर्प्य यदीशाय वस्तु किंचित्कदाचन ॥ कथंचिन्नोपभुंजीत शिवभक्तिपरो नरः ॥३१॥ स्वच्छंदतोषदा बुद्धिः प्रसादः परिकीर्तितः॥ करणानि च सर्वाणि बाह्यान्यभ्यंतराणि च ॥३२॥ बुद्धिप्रसादतस्तत्र प्रसन्नानि भवंति हि ॥ संतोषैश्वर्ययुक्तानां यत्सुखं शांततेजसां ॥ ३३॥ देवासुरमनुष्याणां कुतः स्वप्नेऽपि तत्सुखं ॥ यः प्रसन्नेंद्रियग्रामः सदा चंद्रांशुनिर्मलः ॥३४॥ प्राप्नोति परमं स्थानं शांतः शांतेन चेतसा ॥ यथा कामप्रदानेन प्रतिष्ठाया गतिर्न च ॥ ३५॥ उत्पन्नार्थेषु यस्तोषः संतोषः सुप्रकीर्तितः ॥ अतीतानागतार्थेषु वर्तमानेषु सर्वदा ॥३६॥ अननुस्मृतिरत्यर्थं संतोषः सर्वदादृतः ॥ तेन सर्वफलप्राप्तिर्योगप्राप्तिश्च तत्फलं ॥३७॥ एतत्त्र्यवस्थदं त्यक्त्वा संतोषः सम्यगाश्रितः ॥ अश्वमेध-

---

खंडांत सांगतात, (२९) प्रसाद तीन प्रकारचा आहे--शुद्ध, सिद्ध व प्रसिद्ध. लिंगमुखापासून घेतलेला तो शुद्ध, जंगमानें दिलेला तो सिद्ध, व गुरुनें दिलेला तो प्रसिद्ध, ह्याप्रमाणें प्रसाद तीन प्रकारचा मानला आहे. (३०) गुरुप्रसादापासून मुक्ति व लिंगप्रसादापासून भुक्ति हीं दोन्हीं गुरुदयेनें निरंतर लाभतात. वातुलतंत्रांत सांगतात कीं, (३१) शिवभक्तानें कोणतीहि वस्तु केव्हांहि शिवार्पण केल्याविना उपभोगूं नये. (३२) प्रसाद ह्मणजे मनमुराद संतोष देणारी बुद्धि होय; अंतर्बाह्य सर्व इद्रियें (३३) बुद्धिप्रसादानें प्रसन्न होतात. संतोषरूपी ऐश्वर्य ज्यांस लाभलें त्या शांतात्म्यांना जें सुख लाभतें तें (३४) देव, दानव, व मनुष्यें यांस स्वप्नींहि दिसत नाहीं. ज्याचा इंद्रियसंघ प्रसन्न झाला आहे तो नेहमीं चंद्रकिरणांप्रमाणें निर्मल असतो. (३५) व त्या शांतात्म्याला शांत चित्तानें उत्तम गति मिळते. मनाच्या वासना पुरवूं लागल्यास त्याची कधींहि तृप्ति होत नाहीं (३६) ह्मणून प्राप्त वस्तूंच्या ठिकाणीं जें समाधान त्यास संतोष असें ह्मणतात; व मागच्या पुढच्या व वर्तमान वस्तूंविषयीं नित्य (३७) व अत्यंत विस्मरण असणें यासही संतोष असें मानिलें आहे. अशा प्रकारच्या संतोषाचें फल ह्मटलें ह्मणजे सर्व कार्यांची सिद्धि व योगप्राप्ति हें होय. (३८) तीन अवस्थादायक कर्मांचा त्याग करून संतोषाचा आश्रय करावा. कारण हे देवि, चित्तप्रसादन हें अश्वमेध-

शताच्छ्रेष्ठं देवि चित्तप्रसाधनं ॥३८॥ मुक्तिसाधनमित्युक्तं कर्मभुक्तिप्रदायकं ॥ प्रसादादेव सा भक्तिः प्रसादान्मुक्तिसंभवः ॥ यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांकुरः ॥३९ ॥ ब्रह्मगीतायां ॥ शिवादिनामहीनस्य ध्यानहीनस्य शूलिनः ॥ शिवभक्तिविहीनस्य त्रिपुंड्रोद्धूलनादिषु ॥४०॥ श्रद्धाहीनस्य रुद्रस्य प्रसादे बुद्धिवर्जनं ॥ साक्षान्मुक्तिश्च हे देवा नैव सिध्यंति देहिनः ॥ ४१ ॥ प्रसादेन विना देवं ये जानंति सुरप्रभो ॥ ते जानंति विना ज्ञानं ग्रंथेनैकेन केवलं ॥४२॥ स्नानोदकाच्छुचिः स्नायाद्गंडूषं च पिबेत् सदा ॥ लिंगग्राह्यमथ ग्राह्यमन्यन्न ग्राह्यमेव यत् ॥४३॥ लिंगसारे ॥ लिंगाभिषेककृत्तोयं यद्यल्लिंगोदकं भवेत् ॥ तत्पिबेल्लिंगशरणो ह्यन्यत्तन्मद्यमांसवत् ॥४४॥ लिंगावगाहनं चांबु लिंगांबु रुचितर्पणे ॥ तेन स्नानं च पानं च ह्यन्यद्विण्मूत्ररेतसी ॥ ४५॥ लिंगप्रक्षालनं तोयं लिंगतोयं तथैव च ॥ तत्तोयं सर्वदा ग्राह्यमन्यच्चंडालतोयवत् ॥ ४६ ॥ शंभोः स्नानोदकं सद्यः सर्वतीर्थसमं महत् ॥ धारणात्पापसंघातैस्तत्क्षणादेव मुच्यते ॥ ४७ ॥ पादोदकं च निर्माल्यं भक्त्या धार्यं

---

शताहूनही श्रेष्ठ आहे. (३९) चित्तप्रसाद मोक्षदायक आहे; व कर्म भोगदायक आहे, प्रसादापासूनच भक्ति उत्पन्न होते, प्रसादापासूनच मोक्षसंभव आहे, जसा बीजापासून अंकुर व पुनश्च अंकुरापासून बीज ह्याचप्रमाणें सर्व आहे. ब्रह्मगीतेंत सांगितलें आहे, कीं (४०) त्रिपुंड्र, भस्मोद्धूलन वगैरेच्या ठिकाणीं श्रद्धाहीन असून जो शिवनामस्मरण करीत नाहीं, शिवध्यान करीत नाहीं, ज्यास शिवभक्ति नाहीं, (४१) शिवप्रसादाची इच्छा नाहीं, अशा मनुष्यास हे देवहो, मुक्ति कधींहि सिद्ध होत नाहीं. (४२) शिवप्रसादावांचून जे शंकरास जाणतों ह्मणतात ते हे सुरश्रेष्ठ ज्ञानावांचून ग्रन्थानेंच केवल जाणतात असें समजावें. (४३) पवित्र माणसानें स्नानोदकानें स्नान करावें व चूळ भरावी. लिंगावरील पाणी ग्राह्य होय; दुसरें ग्राह्य नाहीं; लिंगसारांत सांगतात कीं, (४४) लिंगाभिषेक केलेलें जें पाणी त्यांस लिंगोदक असें ह्मणतात; तेंच लिंगशरणानें प्यावें, दुसरें मद्यमांसाप्रमाणें समजावें; (४५) लिंग बुडविलेलें पाणी तेंच लिंगोदक तर्पणास रुचकर होय. त्यानेंच स्नानपान करावें, दुसरें विष्ठा, मूत्र, व रेत असें समजावें. (४६) लिंग धुतलेलें पाणी तेंच लिंगोदक; तेंच सर्वदा ग्राह्य होय, दुसरें चांडालाच्या पाण्याप्रमाणें समजावें. (४७) शंकराचें स्नानोदक सर्व तीर्थासारखें महनीय होय. तें धारण केलें असतां मनुष्य तात्काल पापांपासून मुक्त होतो. (४८) मनुष्यानें पादोदक व निर्माल्य यत्नपूर्वक

प्रयत्नतः ॥ न तं स्पृशंति पापानि मनोवाक्कायजानि च ॥४८॥ शूद्रान्नं याचकान्नं च नैवेद्यं श्राद्धवर्जितं ॥ शालान्नं समुदायान्नं राजान्नं चैव वर्जयेत् ॥ ४९ ॥ अन्नशुद्धौ सत्वशुद्धिर्न मृदा न जलेन वै ॥ सत्वशुद्धौ भवेच्छुद्धिस्ततोऽन्नं परिशोधयेत् ॥५०॥ अस्नात्वा नैव भुंजीत जप्त्वा लिंगं न पूजयेत् ॥ अन्यान्वाऽभ्यागतान् गेहे ह्यतिथींन्नाभिपूजयेत्॥५१॥ पत्रं पुष्पं फलं तोयमन्नपानाद्यमौषधं ॥ अनिवेद्य न भुंजीत यदाहाराय कल्प्यते ॥५२॥ शिवमंत्रेण शुद्धात्मा संस्कृतः शिवभावितः ॥ पात्रैरपि न भुंजीत सार्धं क्रूरैरधार्मिकैः ॥५३॥ पर्णपृष्ठे न भुंजीत रात्रौ दीपं वि-ना तथा ॥ भिन्नपात्रे पृथिव्यां वा शिलायां दारवे तथा ॥ शूद्रशेषं न भुंजीत तदन्नं च विवर्जयेत् ॥ ५४ ॥ शुद्धान्नं स्निग्धमश्नीयाच्छिवमंत्रेण मंत्रितं ॥ भोक्ता शिव इति स्मृत्वा मौनी चैकाग्रमानसः ॥५५॥ आस-नस्थः पिबेदंभस्तिष्ठन्नांजलिनापि च ॥ वामहस्तेन शय्यायां तथैवान्य-करेण वा ॥५६॥ अनिवेद्य तु भुंजानः प्रायश्चित्ती भवेन्नरः ॥ शिवाष्ट-

---

भक्तीनें धारण करावें; जो धारण करितो त्यास कायिक, वाचिक, व मानसिक, पापें स्पर्श करीत नाहींत. (४९) शूद्राचें अन्न, याजकाचें अन्न, श्राद्धवर्जित नैवेद्य, शालान्न, समुदायांतील अन्न, व राजान्न हीं वर्ज करावींत. (५०) अन्नशुद्धीनें सत्वशुद्धि होते. मातीनें किंवा जलानें होत नाहीं. सत्वशुद्धिनें शुद्धि होते ह्मणून अन्न शोधून ग्रहण करावें. (५१) स्नान केल्यावांचून भोजन करूं नये; जप करून लिंगपूजा करूं नये. घरांत अपरिचित अभ्यागत आले असतां त्यांचें पूजन करूं नये. (५२) पत्र, पुष्प, फल, पाणी, अन्नपानादि व औषध जें कांहीं आहाराकरितां केलें असेल तें शिवार्पण केल्याविना आपण घेऊं नये.(५३) शिवमंत्रानें ज्याचा आत्मा शुद्ध झाला आहे त्या संस्कृत व शिवभाविकानें क्रूर व अधार्मिक लोकांबरोबर पंक्तीस जेऊं नये. (५४) पालथ्या पानावर, रात्रीं दिवा नसतां, फुटक्या भांड्यांत, जमिनीवर, दगडावर, किंवा लांकडी पात्रांत जेऊं नये. तसेंच शूद्राचें शेष अन्न सेवूं नये, तें अन्न वर्ज्य करावें. (५५) शिवमंत्रानें मंत्रिलेलें शुद्ध व पौष्टिक असें अन्न शिवच भोक्ता आहे असें समजून मुकाट्यानें एकाग्र चित्तानें खावें. (५६) आसनावर बसून, उभ्यानें, ओंजळीनें किंवा डाव्या हातानें बिछान्यावर, अथवा दुसऱ्याच्या हातानें पाणी पिऊं नये. (५७) देवाला अर्पण केल्याविना जेवणारा मनुष्य प्रायश्चित्तास पात्र होतो त्यानें अष्टोत्तरशत शिवमंत्र

शतजाप्येन पूजया च विशुध्यति ॥५७॥ (?संस्कृतं शिवभक्तस्य नाया-न्मृतकसूतके ॥ संस्कारेषु च सर्वेषु गृहे वापि कुलान्यतः?) ॥५८॥ सूतके न च भोक्तव्यं मृतके च विवर्जयेत् ॥ भुक्त्वा प्रमादतः स्नेहाच्छिवस्याष्टशतं जपेत् ॥५९॥ शुना सूकरचंडालैर्मार्जारकापिकुक्कुटैः ॥ उदक्यागृध्रकाकाद्यैः स्पृष्टमन्नं न भक्षयेत् ॥ ६० ॥ सौरे ॥ शरीरं सर्वतो रक्षेच्छरीरं धर्मसाधनं ॥ न शरीरं विना शुद्धिः पूज्यते गिरिजापतिः ॥ ६१ ॥ शिवज्ञानविद्यायां ॥ विनियोगं प्रवक्ष्यामि सिद्धमंत्रप्रयोजनं ॥ दौर्बल्यं याति तन्मंत्रं विनियोगविवर्जितं ॥ ६२ ॥ यस्य चैव विधानेन कार्याणि च विशेषतः ॥ विनियोगः स विज्ञेयस्तदेवायुष्मिकं फलं ॥६३॥ कालिकाखंडे ॥ गणत्वे च शरण्यत्वे प्रसादं चैवमाहरेत् ॥ मिश्रितं तु न भुंजीयात्तदेवास्पृश्यकिल्बिषं ॥ ६४ ॥ प्रसादं मिश्रितं भुक्तं गणत्वे नैव युज्यते ॥ यावज्जीवं न भुंजीयान्मिश्रितं निष्फलं भवेत् ॥६५॥ सद्योजाते तु चोष्यं च पानीयं वामदेवके ॥ अघोरवक्त्रे भक्ष्यं तु तत्पुरुषे भोज्यमेव च ॥६६॥ ईशाने लेह्यकं चैव पंचवक्त्रे समर्पयेत् ॥

---

जप करून पूजा केली ह्मणजे तो शुद्ध होतो.(५८)(?अन्य कुलाच्या घरांत मृतक सूतक असतांना गृहसंस्कार केला असतांही ( घर सारवून वगैरे शुद्ध केलें असतांही ) अन्य कुलसंबन्धामुळें शिवभक्तास तेथें शुद्ध असें कांहींहि नाहीं.?) (५९) सूतकाचे घरीं जेऊं नये, व मेलेल्याचे घरीं अन्न वर्ज्य करावें. चुकून किंवा स्नेहानें जेवण केलें तर शिवाष्टोत्तरशत जप करावा. (६०) कुत्रें, डुक्कर, चंडाल, मांजर, वानर, कोंबडा, उदकी, गिधाड, कावळा इत्यादि प्राण्यांनीं स्पर्श केलेलें अन्न भक्षण करूं नये. सौरांत सांगितलें आहे कीं, (६१) शरीराचें सर्वांपासून रक्षण करावें;शरीर हें धर्मसाधन आहे; शरीरावांचून शुद्धि होत नाहीं किंवा पार्वतीपति पूजिला जात नाहीं. शिवज्ञानविद्येंत सांगतात कीं, (६२) सिद्धमंत्राचें प्रयोजन व विनियोग सांगतों. विनियोगविवर्जित मंत्र दुर्बल होतो. (६३) ज्याच्या विधानानेंच विशेषतः कार्यें करितात तो विनियोग जाणिला तरच आमुष्मिक ( पारलौकिक ) फल मिळणार. कालिकाखंडांत सांगितलें आहे कीं, (६४) गणत्वानें किंवा शरणत्वानें प्रसाद घ्यावा. मिश्रित करून खाऊं नये. तेंच अस्पृश्य पाप होय. (६५) मिश्रित प्रसाद भक्षण केला तर गणत्वांत जोडिला जात नाहीं. जन्मभर मिश्रित भोजन करूं नये. कारण तें निष्फल होईल. (६६।६७) सद्योजात मुखांत चोखन खाण्याचा पदार्थ; वामदेव मुखांत पिण्याचा पदार्थ; अघोरमुखांत भक्ष्य ( अपूप ) प-

पंचप्रकारसंयुक्तं षड्रसं जीवसंयुतं ॥६७॥ पृथ्व्यादिभूतसंयुक्तं दशवायुदशेंद्रियं ॥ मनोबुद्धिरहंकारश्चित्तं जीवादिपंचकं ॥ पंचविंशतितत्त्वं च पंचरुद्रात्मकप्रियं ॥ ६८ ॥ लिंगसारे ॥ लिंगार्पिततनुप्राणमर्पितं च पृथक् पृथक् ॥ अर्पितस्य मुखं ज्ञात्वा मुख्यमर्पणमर्पितं ॥६९॥ आत्मानं कारयेच्छ्रेष्ठमनादिमलकुंठितं ॥ अनेनैवार्जितं कर्म दग्धं बीजमिवाणुभिः ॥७०॥ अनर्पितादिकं लिंगे यो भुंक्ते धर्मवर्जितः ॥ स विष्ठासदृशं चान्नं नीरं च सुरया समं ॥७१॥ सर्वं च तृणकाष्ठं च भक्ष्यं चैव सुलेपनं ॥ लिंगार्पितप्रसादं च नान्यद्भुंजीत बुद्धिमान् ॥७२॥ गन्धं मृगमदं चैव कर्पूरं तैलमज्जनं ॥ लिंगार्पितप्रसादं च ह्यन्यद्ज्ञेयं च मूत्रवत् ॥७३॥ लिंगसारे ॥ रत्नाभरणजातं च वस्त्रं सकलवाहनं ॥ प्रसादमेव भोक्तव्यं न चेच्चंडालवद्भवेत् ॥७४॥ भोज्यं लेह्यं च चोष्यं च ये च लिंगार्पितं परे ॥ लिंगोच्छिष्टं तु भुंजीरन् धन्यास्ते समुदाहृताः ॥७५॥ महादेवस्य निर्माल्यं स्वीकार्यमधिकारिभिः ॥ तद्बोधकानि वाक्यानि

---

दार्थ; तत्पुरुष मुखांत भोज्य पदार्थ; ईशान्य मुखांत लेह्य (चाटण्याचा) पदार्थ; ह्याप्रमाणें पांच तोंडांत पांच प्रकारचे जीवसंयुक्त षड्रस अन्न अर्पण करावें. (६८) पृथिव्यादि पंचतत्वें, दशवायु, दशेंद्रियें, जीवादिपंचक, व मन, बुद्धि, अहंकार, चित्त, पंचवीस तत्त्वें हीं सद्योजातादि पंचरुद्रात्मक शिवास प्रिय आहेत. लिंगसारांत सांगतात कीं, (६९) लिंगाला अर्पण करावयाचें शरीर व प्राण हीं अर्पितमुख जाणून निरनिराळीं लिंगाला अर्पण केलीं असतां त्यास मुख्यार्पण असें ह्मणतात. (७०) आणवादि मलरहित आत्म्याला श्रेष्ठ करावें, यायोगें संपादिलेलें कर्म अणूनें दग्ध झालेल्या बीजाप्रमाणें नष्ट होतें. (७१) लिंगाला न अर्पण करितां जो धर्मवर्जित मनुष्य जेवतो त्याचें तें अन्न ती विष्टा, व पाणी ह्मणून पीतो ती सुरा असें समजावें. (७२) तृण, काष्ठ, भक्ष्य, अंगराग, वगैरे सर्व कांहीं लिंगाला अर्पण करून प्रसाद मानून बुद्धिमान मनुष्यानें ग्रहण करावें. अन्यथा भक्षण करूं नये. (७३) गंध, कस्तूरी, कापूर, तैल, अंजन, हीं लिंगाला अर्पण करून प्रसाद ह्मणून भक्षण करावीत; नाहीं तर तीं मूत्राप्रमाणें समजावींत. (७४) रत्नांचा आभरणसमुदाय, वस्त्रें, सर्व वाहनें हीं प्रसाद ह्मणून स्वीकारावींत. अन्यथा आचरण करणारा चंडालाप्रमाणें होईल. (७५) भोज्य, लेह्य, चोष्य, हे सर्व पदार्थ लिंगार्पण करून लिंगोच्छिष्ट असे जे भक्षण करितात ते धन्य असे मानिले जातात (७६) महादेवाचा निर्माल्याधिकारी मनुष्यांनीं स्वीकारावा यांविषयींची वचनें मी सं-

दर्शयामि समासतः ॥ ७६ ॥ तदुक्तं स्कांदे व्यासजैमिनिसंवादे ॥ प्रसाद्ग्राह्यलिंगं च प्रसादाद्गुरुसंचयः ॥ प्रसादान्निर्मलो नित्यः प्रसादात्सत्यसंग्रहः ॥७७॥ तत्प्रसादं पवित्रं च प्रसादं मंगलं शुभं ॥ पादोदकं प्रसादं च शुद्धिः सिद्धिर्न संशयः ॥७८॥ अनन्यदेवतोपास्तिरनर्पितपराङ्मुखः ॥ अनन्यकर्मनिर्माणः प्रसादी भक्तिमान् भवेत् ॥७९॥ शिवरहस्ये ॥ ईश्वरः ॥ मद्भक्तजनवात्सल्यं मत्प्रसादेन जीवनं ॥ मम तत्त्वपरिज्ञानं भवेद्देवि प्रसादतः ॥ ८० ॥ मदीयं भुक्तनैवेद्यं पादांबुकुसुमं दलं ॥ धर्ममर्थं च कामं च मोक्षं च ददति क्रमात् ॥ नित्यं परमशैवेन सेव्यते देवसेवितं ॥ ८१ ॥ व्यासजैमिनिसंवादे जैमिनिरुवाच ॥ शैवसंहितायां ॥ अनर्हं मम नैवेद्यं पादांबुकुसुमं दलं ॥ एकेश्वरेण कथितमिति केचिन्महर्षयः ॥८२॥ वदंति तत्कथं स्वामिन् यथार्थं कथयस्व मे ॥ व्यास उवाच ॥ देवदेवस्य वचसो विषयोऽयं हि जैमिने ॥ ८३ ॥ ये वीरभद्रशपिताः शिवभक्तिपराङ्मुखाः ॥ शंभोरन्यत्र देवेषु ये भक्ता ये

---

क्षेपानें दाखवितों. स्कांदपुराणांत व्यासजैमिनीच्या संवादांत असें ह्मटलें आहे कीं, (७७) प्रसादानें लिंग ग्रहण करावें; प्रसादानें गुरुसंग्रह होतो; प्रसादानें प्राणी नित्य निर्मल असतो; प्रसादानें सत्यसंग्रह होतो; (७८) ह्मणून प्रसाद पवित्र व शुभ मंगल आहे. पादोदक व प्रसाद यांनीं अनुक्रमें शुद्धि व सिद्धि होतात यांत संशय नाहीं. (७९) जो अन्य देवतेचें पूजन करीत नाहीं, जो दुसऱ्या देवतेपासून पराङ्मुख आहे, अन्य कर्माचरण करीत नाहीं, तो भक्तिमान् प्रसादी होतो. शिवरहस्यांत ईश्वर सांगतात कीं, ( ८० ) माझ्या भक्तांच्या ठायीं वत्सलता, माझ्या प्रसादानें जीवन, माझें तत्व जाणणें हीं सर्व हे पार्वति, माझ्या प्रसादानें लाभतात. (८१) माझा नैवेद्य, पादोदक, पत्र, पुष्प, हीं सेवन करणाऱ्यास धर्म, अर्थ, काम व मोक्ष, हीं क्रमशः प्राप्त होतात. परमशैव नेहमीं देवानें सेवन केलेलें सेवन करितो. व्यास जैमिनीसंवादांत जैमिनी शिवसंहितेंत ह्मणतो, (८२) माझा नैवेद्य, पादोदक, पर्ण, पुष्प, हीं अयोग्य आहेत असें ईश्वरानें सांगितलें आहे असें कांहीं ऋषी (८३) ह्मणतात तर तें, हे स्वामी, कसें तें यथार्थ सांग. व्यास ह्मणतो हे जैमिने, देवाधिदेवाच्या बोलण्याचा हा विषय आहे कीं, (८४) ज्यांस वीरभद्रानें शाप दिला आहे, जे शिवभक्ति पराङ्मुख आहेत, शंकराहून अन्य देव-

न दीक्षिताः ॥८४॥ ये शुद्धकर्मिणः शंभोरन्यत्रसमबुद्धयः ॥ तेषामनर्हमीशस्य तत्प्रसादचतुष्टयं ॥८५॥ नैवेद्यं विष्णुना भुक्तममृतं चान्यदैवतैः ॥ निर्माल्यं च निवेद्यं च भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥८६॥ परस्परविरोधित्वात्प्रसादस्य च कर्मणः ॥ एकत्र न निवासः स्यात्तेजस्तिमिरयोरिव ॥८७॥ निर्माल्यं निर्मलं शुद्धं निर्मलत्वादनिंदितं ॥ तस्मादभोज्यं निर्माल्यं प्राकृतैरशिवात्मभिः ॥८८॥ ईश्वरः ॥ मल्लिंगधारिणो लोके देशिका मत्परायणाः ॥ मदेकशरणास्तेषु योग्यं नैवान्यजंतुषु ॥८९॥ अज्ञानलोभयुक्तो वा जिव्हाचापल्यमानसः ॥ शिवनिर्माल्यभोगी तु रौरवं नरकं व्रजेत् ॥९०॥ शिवधर्मे ॥ निर्मलत्वाच्च निर्माल्यं मलदेही न धारयेत् ॥ धारयेच्छिवनिर्माल्यं भक्त्या लोभान्न धारयेत् ॥९१॥ लोभान्न धारयेच्छंभोर्निर्माल्यं च न भक्षयेत् ॥ निर्माल्यलंघनाच्छंभोर्बुद्धिभ्रंशोऽभिजायते ॥ ९२ ॥ जिव्हाचापल्यसंयुक्तः शिवसंस्कारवर्जितः ॥ शिवनिर्माल्यभोगी च रौरवं नरकं व्रजेत् ॥९३॥ सर्वदा शुद्धिरहिता-

---

तेची जे भक्ति करितात, जे दीक्षित नाहींत, (८५) जे केवळ कर्मठ आहेत, जे शंकराच्या ठिकाणीं व अन्य देवतांच्या ठिकाणीं समबुद्धि आहेत, त्यांस हें शंकराचें प्रसादचतुष्टय अयोग्य आहे. (८६) विष्णूनें खाल्लेला नैवेद्य, अन्य देवतांनीं प्राशन केलेलें अमृत, निर्माल्य, व नैवेद्य हीं भक्षण करणाऱ्यानें चांद्रायणव्रताचरण करावें. (८७) ह्या प्रसादकर्माविषयीं परस्पर विरोध असल्यामुळें उजेड व अंधार जसें एकत्र असूं शकत नाहींत तसें हीं एकत्र वास करीत नाहींत. (८८) निर्माल्य निर्मल व शुद्ध आहे व निर्मलत्वामुळें तो दुष्ट नाहीं ह्मणून प्राकृत अशिव भक्तांनीं निर्माल्य ग्रहण करणें अयोग्य आहे. (८९) ईश्वर ह्मणतात कीं, ह्या लोकांत माझें लिंगधारण करणारे जे देशिक मत्परायण आहेत व जे मलाच शरण येतात, त्यांनीं निर्माल्य सेवन करणें योग्य आहे, इतर प्राण्यांना नाहीं. (९०) अज्ञानानें किंवा लोभानें युक्त होऊन जिव्हाचापल्यानें जो शिवनिर्माल्य सेवन करील तो रौरव नरकाला जाईल. शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, (९१) निर्माल्य निर्मल असल्यामुळें मलिन मनुष्यानें तो धारण करूं नये. शिवनिर्माल्य भक्तिभावानें सेवन करावा, परंतु लोभानें ग्रहण करूं नये. (९२) शंभूचा निर्माल्य लोभानें धारण करूं नये किंवा भक्षण करूं नये. शंकाराचा निर्माल्य लंघन केल्यास बुद्धिभ्रंश होतो. (९३) जिव्हाचापल्ययुक्त होऊन शिवसंस्कारवर्जित मनुष्यानें शिवनिर्माल्य सेवन केलें तर तो रौरव नरकाला जातो. (९४) नित्य शुद्धिरहित मनु-

नां शुद्धवस्तूपयोगो दोषाय भवतीत्ययमेवार्थः श्रुतिस्मृतीतिहासपुराणेषु सर्वतंत्रेषूद्घोष्यते ॥ यथाहापस्तंबः ॥ अग्निर्वै दीक्षितस्तस्मादेनं नोपस्पृशेत् ॥ इति दीक्षितादिसृष्टिवत् ॥ कामिके ॥ अशुद्धात्माऽशुचिर्लोभान्मद्भुक्तं पावनं परं ॥ भक्षयेन्नाशमायाति शूद्रो ह्यध्ययनादिव॥९४॥ मानवपुराणे ॥ न स्पृशेत्पाणिनोच्छिष्टो विप्रगोब्राह्मणानलान् ॥ न चापि पश्येदशुचिः स्वस्थो ज्योतिर्गणान्दिवि ॥ ९५ ॥ वटाश्वत्थार्कपर्णेषु कुंभितिंदुकपर्णयोः ॥ पलाशपद्मपत्रेषु भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥९६॥ इत्यादिवचनैः सर्वमुदाहृतमेतदुक्तं भवति अपि च ॥ परमेश्वरशिरोनिर्माल्यभूतकलानिधिकलाः सकलसुराः पुरंदरादयो भुंजते ॥ नैवामरलोकपूज्याश्च जाताः अपि च ॥ शिवनिर्माल्यभूतसुधाकरकलासारप्रसादितसुधारसाभिषिक्तव्रीहिजातानि कथं देवतायोग्यानि भवंति अपि च ॥ भास्करस्येश्वरो देव इति, यो मंडलं तपतीति, य एषोऽतरादित्यो हिरण्मयः पुरुष इति, सूर्यस्यांतर्भावस्थितिः॥ परमेश्वर एव सोऽपि पदार्थजाताद्रसमाधत्ते तत्रापि श्रुतिः ॥ योऽसौ तपन्नुदेति स सर्वेषां

---

त्यांनीं शुद्ध वस्तूंचा उपयोग केला तर तीं दोषी होतात. ह्याच अर्थ श्रुति, स्मृति, इतिहास, पुराणांतून तसेंच सर्व तंत्रांत स्पष्ट सांगितला आहे. आपस्तंब असें ह्मणतो—अग्नि दीक्षित आहे, करितां ओदनास स्पर्श करूं नये. कारण दीक्षितानें निर्मित ह्मणून; कामिकांत सांगतात कीं, अशुद्धात्मा, अशुचि मनुष्य जर लोभानें म्यां खाल्लेलें परमपवित्र अन्न खाईल तर तो जसा शूद्र अध्ययनानें नाश पावतो तसा नाश पावेल. मानवपुराणांत सांगितलें आहे कीं, (९५) उष्ट्या मनुष्यानें विप्र, गाय, ब्राह्मण व अग्नि यांस हातानें स्पर्श करूं नये; तसेंच अशुचि मनुष्यानें आकाशांत तारक समुदायाकडे पाहूं नये. (९६) वट, अश्वत्थ, अर्क (रुई), कुंभितिंदुक, पळस, कमल यांचे पानांवर जेवल्यास चांद्रायणव्रताचरण करावें. (९७) इत्यादि सर्व वचनांनीं जें सर्व सांगितलें तें हें कीं, शंकराच्या डोक्यावरील निर्माल्यरूपी जो चंद्र त्याच्या कला इन्द्रादि सकल देव भक्षण करितात. तथापि ते अमरलोक पूज्य झाले नाहींत. शिवनिर्माल्य झालेला जो चंद्रमा त्याच्या अमृत कलांनीं प्रसादित झालेलीं धान्यें देवतांस कशीं योग्य होतात, व ईश्वर भास्कराचा देव; तो मण्डलास प्रकाशितो व तो अंतरादित्य व हिरण्मय पुरुष आहे; ह्याप्रमाणें सूर्याची अंतर्भावस्थिति झाली. पदार्थसमूहांतून जो रसग्रहण करितो तोही परमेश्वरच याविषयीं श्रुति आहे. जो तप करून उदय पावतो तो सर्व भूतांच्या प्राणांना आनंद व्हावा

भूतानां प्राणानामानंदायोदेति ॥ तस्य भूतानां पदार्थानां समाकर्षतीत्यर्थः ॥ तस्मात्प्राणापायाभावात् ॥ तस्मात्परमेश्वरभुक्तशिष्टान्यनर्हाणि कथं भवेयुः महोपनिषदि ॥ अप एव ससर्जादौ तासु वीर्यमुपासृजत् ॥ इत्यापो नारायणो रुद्र इति ॥ जलमपि शिवाज्जातमिति अत्रापि श्रुतिः ॥ आपो वा इदं सर्वं विश्वाभूतान्यापः प्राणा वा आपः पशव आपोन्नमापोमृतमापः संम्राडापो विराडापः छंदाँस्यापो ज्योतीँष्यापो यजूँष्यापः सत्यमाप इति तस्मात्सकलं जलं परमेश्वरचरणकमलाभिषिक्तप्रसारितप्रवाहरूपमेव ॥ मुखाज्जातोऽग्निरिति परमेश्वरजातोऽग्निः ॥ ततश्च तत्पाकपरिनिवृत्तं रुद्रोपभुक्तमेव स्यात् ॥ अतश्च पक्वान्नेन देवतोपहारवैश्वदेवप्राणाग्निहोत्रहोमातिथिसंतर्पणादयो धर्मा न संभवेयुः ॥ ततः सर्वमन्नं रुद्रोच्छिष्टं तेन दानहोमयोरनर्हत्वान्नासिकाभ्यां प्राणाद्वायुरिति धातुः ॥ प्राणेन प्रेरितं चैतन्यस्वरूपेण शंभुना ॥ गृहीतपरिमलानि सकलप्रसूनानि पत्राणि च पूजार्थमनर्हाणि ॥ संवदेरन् प्राणापानव्यानोदानसमानादितच्चैतन्यस्वरूपस्य परमेश्वरस्य श्राद्धायां प्राणे निष्ठोऽमृतं जुहोमि ॥ शिवोमाविशाप्रदायाय प्रायःस्वाहेति

---

ह्मणून उदय पावतो ह्मणजे त्या पदार्थांचें आकर्षण करितो असा अर्थ होतो. ह्मणून प्राणाला अपाय नसल्यामुळें परमेश्वरानें भोगून राहिलेलें अयोग्य कसें होईल! महाउपनिषदांत सांगितलें आहे कीं, प्रथम पाणी उत्पन्न केलें, त्यांत वीर्य घातलें ह्याप्रमाणें आपोनारायण रुद्र आहे. जल देखील शिवापासून उत्पन्न झालें अशी श्रुति आहे. हें सर्व पाणी आहे, सर्व भूतें जल आहेत, प्राणी जल, अन्न जल, अमृत जल, संम्राड जल, विराड जल, छंदस जल, तारे जल, यजुष जल, सत्य जल, असें आहे ह्मणून सर्व जल शिवचरणकमलाभिषिक्त असून प्रवाहरूपानें प्रसारित झालें आहे. मुखांतून अग्नि उत्पन्न झाला सबब तो परमेश्वरापासूनच उत्पन्न झाला. ह्मणून त्यापासून होणारा पाक रुद्रभुक्तच होणार, ह्मणून पक्वान्नानें देवतोपहार, वैश्वदेव, प्राणाग्निहोत्र, होम, अतिथिसंतर्पण, वगैरे धर्म संभवणार नाहींत. ह्मणून सर्व अन्न रुद्रोच्छिष्ट आहे, ह्मणून दानहोमास अयोग्य आहे. नासिकांच्या प्राणाद्वायु असा धातु आहे; प्राणानें प्रेरित असलेलें चैतन्य तत्स्वरूपी शंकरानें सकल सुगंध, पुष्पें, पर्णें यांचें ग्रहण केलें असल्यामुळें पूजेस अयोग्य होत असें ह्मणतील, प्राणापान व्यानोदान इत्यादिपासून प्रायःस्वाह ह्या पांच मंत्रांनीं

पंचमंत्रैर्दत्तं हविः परमेश्वरस्य प्रसादान्नं भवति ॥ किं तत्प्रसादभूत-मन्नं ब्राह्मणैर्नैवोपभुज्यते किं ॥ मध्यपिंडं पत्नीं प्राशयेत् ॥ अत्र रुद्रोद्देशेन तपस्य पुत्रार्थं पत्न्या प्राशनविधानान् तत्प्राशनेन पुत्रोत्पत्तिर्गम्यते ॥ अदत्त पितरो गर्भं कुमारं पुष्करस्रजं ॥ इति मंत्रः लिंगबलेनास्य मंत्रस्यायमर्थः ॥ अस्मिन्नर्थे ॥ लिंगे ॥ वसुरुद्रार्करूपेण मध्यपिंडस्तु पुत्रदः ॥ वेदोक्तं रुद्रनिर्माल्यं किं पुनर्बहुभाषणैः ॥ अथ वैदिकशैवाः केचन विनियुक्तविनियोगा न भवंति किं अपि च ॥ श्राद्धकाले विश्वेदेवाभ्यां पितृपितामहैश्च यजमानेनानुद्दिश्य समर्पितं चान्नं प्राणाग्निहोत्रस्यार्हं न भवति किं तत्र श्राद्धकालेऽविच्छिन्नाग्निहोतारश्च संति ॥ तैरग्नौकरणं करिष्यत इति वचनाद्वैश्वदेवहविःशिष्टान्नं प्राणकरणं हविश्शिष्टान्नं विश्वेदेवपितृपितामहप्रपितामहानुद्दिश्य ब्राह्मणानां प्रथमं दत्तमन्नं तत्किं प्राणाग्निहोत्रस्यार्हं भवति ॥ न वा तस्मादेव परमेश्वरस्य प्रसादमपि प्राणाग्निहोत्रस्य विशेषेणार्हमेव ॥९७॥ अस्मिन्नर्थे कूर्मपुराणे ॥ यः श्राद्धकाले हरभुक्तशेषं ददाति भक्त्या पितृदेव-

---

दिलेलें हविषद्रव्य परमेश्वराचें प्रसादान्न होतें. तें प्रसादान्न ब्राह्मण खात नाहींत काय? त्याचें प्रसादरूपी अन्न ब्राह्मण भोजन करीत नाहींत काय? मध्यपिंड पत्नीकडून खाववावा. रुद्रास उद्देशून केलेल्या तपाच्या (?) पत्नीनें पुत्राकरितां प्राशन करावा या विधिकरितां तो खाल्ला असतां पुत्रोत्पत्ति होते."अदत्त–पुष्कर स्रजम्"हा मंत्र आहे. लिंगबलानें ह्या मंत्राचा हा अर्थ आहे. ह्याच अर्थी लिंगपुराणांत सांगतात–वसुरुद्रार्करूपानें मध्यमपिंड पुत्रदायक आहे, रुद्रनिर्माल्य वेदोक्त आहे मग जास्त वर्णन कशाला ? कांहीं वैदिकशैव असें ह्मणतात कीं, विनियुक्ताचा ( जोडलेल्याचा ) विनियोग ( उपयोग ) करितां येत नाहीं काय ? आणखी श्राद्धसमयीं विश्वेदेवाकरितां पितृपितामह यांस न उद्देशून यजमानानें समर्पण केलेलें अन्न प्राणाग्निहोत्राला योग्य होत नाहीं काय ? श्राद्धकालीं अग्निहोत्री अविच्छिन्नाग्नि असतात. त्यांच्याकडून अग्नौकरण केलें जाईल अशा वचनानें वैश्वदेवहवि हेंच शिष्टान्न, प्राणकरणहवि व शिष्टान्न विश्वेदेव व पितृत्रयी यांस उद्देशून ब्राह्मणांना घालतात तें प्राणाग्निहोत्राला योग्य होतें किंवा नाहीं? ह्मणून परमेश्वराचा प्रसाद प्राणाग्निहोत्राला विशेषेंकरून योग्य होतो. याच अर्थी कूर्मपुराणांत सांगतात कीं, (९८) जो श्राद्धकालीं भक्तीनें पितृदेवतांना शिवोच्छिष्ट देतो, त्यांतील तिलमिश्रित पिंडांनीं

तानां॥तैरेव पिंडैश्च तिलैर्विमिश्रैराकल्पकोट्याः पितरः सुतृप्ताः ॥९८॥ शैवे ॥ प्राणाग्निहोत्रं यः कुर्याच्छिवस्यैव प्रसादतः ॥ अश्वमेधायुतं पुण्यं सिक्थे सिक्थे लभेन्नरः ॥९९॥ लिंगे ॥ पत्रं पुष्पं फलं तोयमन्नपानाद्यमौषधं ॥ अनिवेद्य न भुंजीयाद्यदाहाराय कल्पितं ॥ निवेदितं च देवाय भुंजीयादात्मशुद्धये ॥१००॥ बोधायनस्मृतौ ॥ यदन्नमाहारत्वेन प्राप्तं तद्धोमीयाम्यहं ॥ ॐव्यासस्मृतौ ॥ यद्यद्भुक्तं प्रथममागच्छेत्तद्धोमीयामीति ॥ ॐ ॥ ईश्वरमुखनिःसृतविद्याभूतैर्वेदैरागमैश्च शब्दरूपैर्जगदेतदुत्पद्यते ॥ यथाह वेदांतेषु शब्दविवर्तं जगदेतत्प्रपंचरूपमिति प्रतिपादितं ॥ ततश्च परमेश्वरमुखनिर्गतशब्दरूपस्य शब्दप्रपंचस्य सर्वस्मिन्कर्मण्यर्हता स्यात् ॥ सकलस्य शब्दविवर्तभूतस्य वस्तुनः शिवोपभुक्तप्रसादतयानर्हत्वात् ॥ वातुलतंत्रे ॥ अकारादिक्षकारांतमातृकारचनाविधेः ॥ जगन्निर्माणचातुर्यात्सर्वज्ञ इति कथ्यते ॥ इति पंचाशद्वर्णव्यवहाराणि शिवनिर्माल्यमेव यजुर्वेदे ॥ यदेकमव्यक्तमनंतरूपं विश्वं पुराणं तमसः परस्तात् ॥ इति तद्विश्वरूपिणः परमेश्वरादुत्पन्न-

---

त्याचें कोट्यावधि पितर तृप्त होतात. शैवपुराणांत सांगितलें आहे कीं,(९९)शिवाच्या प्रसादानें जो प्राणाग्निहोत्र करितो त्या मनुष्यास प्रत्येक शिताच्या ठिकाणीं दहा-हजार अश्वमेधांचें पुण्य लागतें. लिंगपुराणांत सांगतात कीं, (१००) पत्र, पुष्प, फल, जल, अन्न, पान, इत्यादि व औषध जें आहाराकरितां तयार केलें असेल तें शिवास निवेदन केल्याविना भोजन करूं नये. देवाला निवेदन करून आत्मशुद्धीकरितां भक्षण करावें. (१०१) बोधायनस्मृतींत सांगितलें आहे कीं, जें अन्न अहाराकरितां प्राप्त झालें आहे तें मी अग्नीस अर्पण करितों. व्यासस्मृतींत सांगितलें आहे कीं, जें जें नवीन खाद्य येईल तें मी अग्नीला अर्पण करितों. ईश्वरमुखांतून निघालेल्या विद्यारूपी वेदांनीं, व आगमांनीं, हें जग शब्दरूपानें उत्पन्न होतें. शब्दस्वरूपी हें सर्व जगत् प्रपंचरूपानें भासत आहे असें वेदांतांत सांगतात. ह्मणून परमेश्वराच्या मुखांतून बाहेर पडलेल्या शब्दरूप शब्दप्रपंचाची सर्व कर्मांत अयोग्यता होईल; सर्व शब्दरूपी वस्तूला शिवोच्छिष्टत्वामुळें अपात्रता आली आहे. वातुलतंत्रांत सांगितलें आहे कीं, अकारापासून क्षकारापर्यंत मातृकारचनेवरून व जगन्निर्माण करण्याच्या चातुर्यामुळें सर्वज्ञ असें मानितात. ह्मणून ५० वर्णांचा व्यवहार शिवनिर्माल्यच होय. यजुर्वेदांत सांगतात कीं, जें एक अव्यक्त, अनंतरूप, तमाहून पर असें पुराणविश्व आहे, त्या विश्वरूप्याचे परमेश्वरापासून उत्पन्न

षड्रसोपेतषड्विधाहारजलकुसुमजातानि सर्वाण्यपि देवप्रसादलब्धानि भवेयुः ॥ तत्त्वसारे ॥ अस्पृश्यं शिवनिर्माल्यं व्यापकत्वं शिवे कथं ॥ सर्वव्यापी शिवश्चैव निर्माल्यं परमार्थतः ॥ किं तत्र चंडनिर्दिष्टं निर्माल्यमिति शंकया ॥१०१॥ शिवरहस्ये ॥ यत्र भक्तिविशेषः स्यान्न चंडो नैव दूषणं ॥ यत्रैव भक्तिसामान्यं तत्र चंडो भविष्यति ॥१०२॥ तस्मादनर्हमीशस्य नैवेद्यमित्यादि व्यर्थं समर्थितं तदा न भवति चेत् ॥ ननु भवन्मतेऽपि तस्यैवान्नं तस्मै किमर्थमर्पणीयमित्यत आह ॥ शैवे ॥ शिवस्वामिकमेवान्नं शिवाय विनियुज्यते ॥ विनियोगोपचारेण संतुष्यति सदाशिवः ॥१०३॥ ब्रह्मांडपुराणे ॥ सर्वलोकैकनाथस्य शंभोः कः किं प्रयच्छति ॥ उपचारप्रियः शंभुस्तेनैवायं प्रसीदति ॥१०४॥ तथाहि ॥ राजकीयपुरुषस्तदीयवस्तु तस्मै समर्प्य तुष्टेन पुष्टो भवति तद्वदिति भावः ॥ शिवरहस्ये ॥ शिवानुभूतमखिलं निर्माल्यं परिभक्ष्यते ॥ भोज्यं धार्यमिति द्वेधा षड्विधं कश्चिदिष्यते ॥ १०५ ॥ देवस्वं देवताद्र-

---

झालेलें षड्रसयुक्त षड्विध आहार, जल, कुसुमादि सर्व देवप्रसादलब्ध होतील. तत्वसारांत सांगितलें आहे कीं, शिवाचे ठिकाणीं सर्व व्यापकत्व असल्यामुळें शिवनिर्माल्य अस्पृश्य कसें? सर्वव्यापी शिव असल्या कारणानें निर्माल्य खरोखर निर्मल आहे. नाहीं तर निर्माल्याचे ठिकाणीं चंड निर्दिष्टत्व कसें? शिवरहस्यांत सांगितलें आहे, (१०२) जेथें भक्ति विशेष आहे तेथें चंड नाहीं व दूषणही नाहीं. जेथें भक्ति सामान्य तेथें चंड असणार. (१०३) ह्मणून ईश्वराचा नैवेद्य अनर्ह इत्यादि व्यर्थ समर्थन केलें; असें नसेल तर तुमच्या मतानेंच त्याचेंच अन्न त्यास कसें अर्पण करण्यास योग्य होतें? यावर उत्तर असें आहे कीं, शैवपुराणांत सांगतात कीं, शिवाचें अन्न शिवालाच योजिलें जातें कारण सदाशिव विनियोगाच्या उपचारानेंच संतुष्ट होतो. ब्रह्मांडपुराणांत सांगितलें आहे कीं,(१०४) सर्व लोकांचा एक नाथ जो शंभु त्या शंभूला कोण काय देऊं शकतो? शंकर उपचारप्रिय आहे त्यानेंच तो प्रसन्न होतो. (१०५) कारण राजकीय पुरुष जसा त्याची वस्तूच त्यास अर्पण केल्यानें संतुष्ट व पुष्ट होतो त्याचप्रमाणें ही गोष्ट आहे. शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, शंकरानें अनुभविलेलें सर्व निर्माल्य भक्षण केलें जातें, तें भोज्य व धार्य असें दोन प्रकारचें आहे असें कांहींचें मत आहे व षड्विध आहे असें कांहींचे मत आहे. (१०६) देवस्व, देवताद्रव्य, नैवेद्य, निवेदित, चंडद्रव्य, बहिःक्षिप्त असा नि-

व्यं नैवेद्यं च निवेदितं ॥ चंडद्रव्यं वहिःक्षिप्तं निर्माल्यं षड्विधं तथा ॥१०६॥ देवस्वं ग्रामभूम्यादिदासीदासचतुष्टयं ॥ हेम रौप्यं च रत्नादि देवद्रव्यमिति स्मृतं ॥१०७॥ यत्संकल्प्य तु देवाय पत्रं पुष्पं फलं जलं ॥ अन्नपानादि तत्सर्वं नैवेद्यमिति कीर्तितं ॥१०८॥ एतत्त्रिविधनिर्माल्यमनर्हमिति कथ्यते ॥ प्रमादाद्भोजनं कुर्याद्भूमेरप्येकमंगुलं ॥१०९॥ किंचिद्द्रव्यापहारेण नरकं यात्यसौ ध्रुवं ॥ शिवोपभुक्तस्रग्गंधमन्नपानादिकं तथा ॥ ११० ॥ निवेदितमिति प्रोक्तं सर्वपापहरं परं ॥ बाणलिंगे चरे लोहे रत्नलिंगे स्वयंभुवि ॥ प्रतिमासु च सर्वासु न चंडोऽधिकृतो भवेत् ॥१११॥ स्थापिते विधिना लिंगे सर्वदेवासुरैर्नरैः ॥ एतत्त्रिविधनिर्माल्यं चंडेशोऽधिकृतः शिवे ॥११२॥ बहिःक्षिप्तमनर्हं हि त्वन्यद्रव्यत्वकारणात् ॥ पिशाचानां हि सर्वेषामधिकारो हि सर्वदा ॥११३॥ इति षड्विधप्रसादेषु निवेदितप्रसादके ॥ अप्रसादभोक्तृणामनर्हं भवति प्रिये ॥११४॥ प्रसादानुभवस्यैव महत्वं प्रतिपादितं ॥ इदं पवित्रं परममखिलागमचोदितं ॥११५॥ वेदवेदांततत्त्वज्ञैः पवित्रं परिभाषितं ॥ इति-

---

र्माल्य सहा प्रकारचा आहे. (१०७) गांव, जमीन वगैरे, दासदासीही चार, देवस्व, सुवर्ण, रौप्य, रत्नें वगैरे यांस देवद्रव्य असें मानितात; (१०८) पत्र, पुष्प, फल, जल, अन्नपान वगैरे जें देवाकरितां संकल्प करून देतात तें सर्व नैवेद्य असें मानितात. (१०९) हें तीन प्रकारचें निर्माल्य अयोग्य असें समजतात. प्रमादानें भक्षण केलें, एक अंगुलमात्र भूमि हरण केली, (११०) किंवा दुसरे किंचित द्रव्य हरण केलें तर तो मनुष्य नरकाला जातो. शिवानें भोगिलेलें पुष्प, गंध, अन्न, पानादिक, (१११) सर्व निवेदित असें समजतात व तें पापहारक आहे. बाणलिंग, चरलिंग, लोहलिंग, रत्नलिंग, स्वयंभूलिंग व सर्व प्रतिमा या संबंधीं चंडास अधिकार नाहीं. (११२) सर्व देव, असुर व मनुष्यें यांनीं यथाविधि स्थापिलेल्या लिंगासंबंधीं या त्रिविध निर्माल्याला चंडद्रव्य असें ह्मणतात. (११३) बहिःक्षिप्त तें अपात्र होय. कारण तें दुसऱ्याचें द्रव्य होय, त्यावर सर्व पिशाचांचा नित्य अधिकार आहे. (११४) ह्याप्रमाणें हे प्रिये, षड्विधप्रसादामध्यें निवेदितप्रसाद प्रसादस्वीकार न करणाऱ्यांना अयोग्य होतो. (११५) प्रसादग्रहणाचें महत्व सांगितलें व हेंच पवित्र महत्व सर्व आगमांत सांगितलें आहे. (११६) वेद व वेदांत यांचीं तत्वें जाणणाऱ्यांनीं हा प्रसाद पवित्र आहे असें सांगितलेलें आहे. इतिहास

ह्रासे शिवाचारे सारभूतमुदाहृतं ॥११६॥ इदं प्रसादं भुंजानो विरिंचिः किल जैमिने ॥ विष्णुः परशुरामोऽपि शिवेन परिदीक्षितौ ॥११७॥ पादोदकप्रसादानां निर्माल्यानां निषेवकौ ॥ वशिष्ठश्च गरिष्ठोऽभूत्प्रसादस्य प्रभावतः ॥११८॥ प्रसादसेवनाज्जातो विश्वामित्रो महामुनिः॥ पाणिनिश्च कणादश्च कपिलो गौतमादयः ॥११९॥ प्रसादसेवनाद्ध्यानादर्चनाद्धारणादपि॥ जाता दर्शनकर्तारः श्रावयंति जगत्त्रयं॥१२०॥ हरिवंशे पुरहूतनारदसंवादे ॥ कदाचिदीशपादांबुनिर्माल्यपरिमेलितः ॥ पवनः पन्नगेशेन निपीतः पुण्यकारणात् ॥ तेन विश्वंभराभारधुरीणत्वमवाप्यते ॥१२१॥ भोगीश्वरत्वमचलमीशभूषणतापि च ॥ सर्वज्ञता च संप्राप्ता देवेंद्रेण न संशयः ॥१२२॥ साक्षात्प्रसादभोगेन भक्तोऽयं लभते फलं ॥ तद्वक्तुं न हि मे शक्तिर्न गुरोर्न गिरां पतेः॥१२३॥ शिवधर्मे ॥ निर्माल्यं धारयेन्मूर्ध्नि नैवेद्यं चापि भक्षयेत् ॥ तत्प्रसादोदकं पीत्वा गाणापत्यमवाप्नुयात् ॥ १२४ ॥ स्वच्छंदललितभैरवे ईश्वरकुमारसंवादे ॥ निर्माल्यधारणात्पुत्र सालोक्यं लभते नरः॥ पादोदकस्य पानेन

---

व शिवाचार यांत हें आहे असें सांगितलें आहे. (११७) हे जैमिने हें प्रसादग्रहण साक्षात ब्रह्मदेवानें केलें व विष्णु व परशुराम यांस शिवानें दीक्षा दिली. (११८) व त्यांनीं पादोदक प्रसादाच्या निर्माल्याचें सेवन केलें; ह्या प्रसादाच्या प्रभावानें वशिष्ठ श्रेष्ठ गुरुत्व पावला. (११९) ह्या प्रसादसेवनानें विश्वामित्र महामुनि झाला. पाणिनी, कणाद, कपिल, गौतम, वगैरे (१२०) प्रसादसेवनानें, ध्यानानें, पूजेनें, धारणेनें अनेक दर्शनशास्त्रांचे कर्ते झाले व त्रैलोक्यास उपदेशीत आहेत. हरिवंशांत पुरुहूत व नारद यांच्या संवादांत सांगितलें आहे कीं, (१२१) कोणे एके काळीं शंकराचें पादोदक व निर्माल्य यांच्या वासानें युक्त वायु शेषानें पुण्ययोगानें भक्षण केला त्यामुळें पृथ्वीचा भार धारण करण्याचें सामर्थ्य त्यास प्राप्त झालें. (१२२) व तो नागराज होऊन शंकराच्या भूषणत्वाचा त्यास मान मिळाला, व देवेंद्रास सर्वज्ञता प्राप्त झाली, ह्यांत संशय नाहीं. (१२३) प्रत्यक्ष प्रसादभोगानें भक्ताला जें फळ मिळतें त्या फळाचें वर्णन करण्यास मी किंवा वाचस्पति समर्थ नाहीं. शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, (१२४) निर्माल्य डोक्यावर धारण करावा व नैवेद्य भक्षण करावा व शिवप्रसादोदक पिऊन गाणपत्य मिळवावें. स्वच्छन्दललितभैरवग्रन्थांत ईश्वरकुमारसंवादांत सांगितलें आहे कीं, (१२५) शंकर स्कन्दास ह्मणतात, हे पुत्रा, निर्माल्य धारण केल्यानें मनुष्यास सालोक्य

सामीप्यं भजते सदा ॥१२५॥ मत्प्रसादोपभोगेन सारूप्यं प्रतिपद्यते ॥ नान्यस्य तपसः शक्तिस्तव बालस्य विद्यते ॥ रहस्यं तदिदं पुत्र सुलभं कुरु वत्सक ॥१२६॥ कामिके ॥ निर्माल्यं देवदेवस्य चांद्रायणशतात्परं ॥ भक्षयेद्यो नरो भक्त्या पवित्रमिति शुद्धिदं ॥ शुद्धात्मा ब्राह्मणस्तस्य पापं क्षिप्रं विनश्यति ॥१२७॥ ईशानसंहितायां उमामहेश्वरसंवादे ॥ किं दीक्षया किं तपसा किं दानेन जपेन किं ॥ शृणु देवि वरारोहे मद्भुक्तं यदि भुज्यते ॥१२८॥ शिरसा धारयेद्भक्त्या शिवनिर्माल्यमुत्तमं ॥ असावेव धृतस्तेन सोमः सोमकलाधरः ॥१२९॥ निर्माल्यं धारयेद्भक्त्या शिरसा पार्वतीपतेः ॥ राजसूयसहस्रस्य फलं प्राप्नोत्यसंशयः ॥१३०॥ शिरसा शिवनिर्माल्यं भक्त्या यो धारयेद्यदि ॥ अशुचिर्भिन्नमर्यादः सर्वावस्थां गतोऽपि वा ॥१३१॥ सर्वदेवप्रयुक्तात्मा नियमैश्च बहिष्कृतः ॥ तस्य पापानि घोराणि नाशयत्येव शंकरः ॥१३२॥ निर्माल्यं परमं पुण्यं प्रसादं पापनाशनं ॥ ब्रह्मचारिगृहस्थानां यतीनां भुक्तिमुक्तिदं ॥१३३॥ पृथिव्यां यानि तीर्थानि या नद्यः पुण्यदाः शुभाः ॥

---

प्राप्त होतें; व पादोदकाच्या प्राशनानें सर्वकाल त्यास सामीप्य प्राप्त होतें;(१२६) व माझ्या प्रसादाच्या सेवनानें सारूप्य लाभतें. ह्या गोष्टींविषयीं दुसऱ्या कोणत्याही तपाचें सामर्थ्य नाहीं. हे बाळा, ह्मणून हें रहस्य सुलभ कर. कामिकांत सांगतात कीं, (१२७) शिवनिर्माल्य शेंकडों चांद्रायणांहूनहि श्रेष्ठ आहे. जो मनुष्य भक्तीनें हें पवित्र व शुद्धिदायक निर्माल्य भक्षण करील तो शुद्धात्मा ब्राह्मण होऊन त्याचें पाप तात्काल नष्ट होतें. ईशानसंहितेंत उमामहेश्वरांच्या संवादांत सांगितलें आहे कीं, (१२८) हे देवि सुंदरि, माझें निर्माल्य जर सेवन केलें तर दीक्षेचें, तपाचें, दानाचें किंवा जपाचें काय कारण आहे? (१२९) उत्तम शिवनिर्माल्य भक्तीनें मस्तकीं धारण करावें व असें निर्माल्य धारण केलें असतां, त्यानें सोम ( चंद्र ) धारण केला असें होतें अर्थातच तो प्रत्यक्ष शंकरच होतो.(१३०) शंकराचा निर्माल्य मस्तकावर धारण करावा ह्मणजे त्यास हजार राजसूययज्ञांचें फल मिळतें ह्यांत संशय नाहीं. (१३१) शिवनिर्माल्य भक्तीनें मस्तकावर जो धारण करितो तो अपवित्र, मर्यादातीत, सर्वावस्थांगत, (१३२) अनेक देवतांचा भक्त, व खरोखर बहिष्कृत असला तरी त्याचीं भयंकर पापें शंकर नष्ट करितो. (१३३) निर्माल्य अत्यंत पुण्यकारक आहे व प्रसाद पापनाशक असून ब्रह्मचारी, गृहस्थ, व यति, यांस भुक्तिमुक्ति देणारा आहे. (१३४) पृथ्वीतलावर जेवढीं तीर्थें आहेत,

यत्पादस्थापिताः नित्यं तस्माद्धार्यं प्रसादजं ॥१३४॥ उपवाससहस्राणि प्राजापत्यायुतानि च ॥ शिवप्रसादसिक्थस्य कोट्यंशेनापि नो समाः ॥१३५॥ तिलषोडशभागं च तृणाग्रांबुकणोपमं ॥ पादोदकप्रसादान्नसेवया मोक्षमाप्नुयात् ॥१३६॥ अथार्पणविधिः ॥ लैंगे ॥ खाद्यानि चोष्यानि यानि पेयान्यन्यानि यानि वै॥ देयानि तानि वै शंभोरश्नीयाद्दासभावतः ॥१३७॥ भोज्या लेह्याश्च चोष्याश्च ये च लिंगार्पिताः परे ॥ लिंगोच्छिष्टं तु भुंजीत प्रसादीति उदाहृतः ॥ १३८ ॥ रूपांगं च समायुक्तं रुचीनां शुद्धशैविकं॥तन्मिश्रादर्पितं चतच्छंभोः प्रासादसिद्धिदं॥१३९॥ रूपं समर्प्य द्रव्यस्य रुचिं चैवार्पयेत्ततः ॥ उभयार्पणहीनश्चेत्प्रसादो निष्फलो भवेत् ॥१४०॥ इति वचनप्रमाणात्स्वकीयजिव्हास्पर्शनपदार्थरुचिं मानसकरेण स्वेष्टलिंगस्य समर्पणं कृत्वा तत्प्रसादसुखमनुभवितुमर्हो भवति ॥ १४१ ॥ तस्योदाहरणमाह ब्रह्मांडपुराणे ईश्वरपितामहसंवादे ॥ नैवेद्यं पुरतो न्यस्तं दर्शनात्स्वीकृतं मया ॥ रसान्भ-

---

व जेवढ्या शुभदायक व पुण्यकारक नद्या आहेत तीं सर्व शिवचरणीं निरंतर आहेत ह्मणून नित्य प्रसादजन्य पादोदक धारण करावें. (१३५) हजारों उपवासव्रतें किंवा दहा हजार प्राजापत्येंहि शिवप्रसादाच्या एका शिताच्या कोट्यंशानेंहि बरोबर नाहींत. (१३६) गवताच्या टोंकास लागलेल्या पाण्याच्या थेंबा येवढ्या किंवा तिळाच्या सोळाव्या हिश्या एवढ्या पादोदक प्रसादान्नाच्या सेवनानें मोक्षप्राप्ति होते. आतां अर्पणविधि सांगतात. लिंगपुराणांत सांगितलें आहे कीं, (१३७) खाद्य, चोष्य, पेय हे सर्व पदार्थ शंकरास अर्पण करून शंकराचा मी दास आहें, ह्या भावनेनें सेवन करावेत. (१३८) भोज्य, लेह्य, चोष्य इत्यादि जे पदार्थ लिंगार्पित केले असतील ते लिंगोच्छिष्ट ह्मणून जो भक्षण करितो तो प्रसादि होय. (१३९) रूपांगसमायुक्त शुद्ध शैवभावनेनें मिश्रित करून अर्पण केलेलें जें कांहीं तो सिद्धिदायक प्रसाद समजावा. (१४०) रूप समर्पण करून नंतर द्रव्याच्या रुचीचें अर्पण करावें. हें उभयार्पण न झालें तर तो प्रसाद निष्फळ होय. (१४१) ह्या वचनावरून आपल्या जिभेच्या स्पर्शानें पदार्थाची रुचि मानसरूपी हातानें आपल्या इष्टलिंगास अर्पण करून नंतर त्या प्रसादाचें सुख अनुभवण्यास तो पात्र होतो. त्याचें उदाहरण सांगतों—ब्रह्मांडपुराणामध्यें शंकराच्या व ब्रह्मदेवाच्या संवादांत असें ह्मटलें आहे कीं, (१४२) पुढें ठेविलेला नैवेद्य मी दर्शनमात्रें स्वीकार करितों.

क्तस्य जिव्हाग्रादश्नामि कमलोद्भव ॥१४२॥ इत्येवमादिवचनप्रमाणात् ॥ प्राणलिंगस्य यद्यत्कर्मणा मनसा वाचा पूर्वमर्पितपदार्थरूपांतर्गतरुचिं स्वजिव्हापेक्षया निश्चयात् सावधानमनसा समर्पितं भवतीति पाकदशायां परिचारकैस्तथाकृतमपि देवार्हमेव तथा च स्कांदे ॥ समाघ्रातं परिस्पृष्टं यदा दृष्टमनिच्छया ॥ शिवाय कल्पितं वस्तु न किंचिदपि दूष्यते ॥१४३॥ क्रियातिलके ॥ गवां सर्पिः शरीरस्थं न करोत्यात्मपोषणं ॥ मिश्रितं कर्मणात्यंतं पुनस्तासां तु भेषजं ॥१४४॥ एवमंतःशरीरस्थः सर्पिवत्परमेश्वरः ॥ विना चोपासनादेव न करोति हि तत्फलं ॥ १४५ ॥ इति वचनप्रामाण्यादभ्यंतरार्पितमेव भवति ॥ तथा यजुर्वेदे ॥ यद्धि मनसा ध्यायति तद्वाचा वदति तत्कर्मणा करोतीति श्रुत्यागमप्रमाणाद्वाग्विज्ञानमनोभावेन क्रियासमर्पणं त्रिकरणशुद्धं तदेवार्पणं भवति ॥ अस्मिन्नर्थे लैंगे ॥ कर्मणा मनसा वाचा त्रिविधं चार्पणं शुभं ॥ नोचेदनर्पितं भुङ्क्ते प्रसादं निष्फलं भवेत् ॥१४६॥ स्वे-

---

हे ब्रह्मन्, भक्ताच्या जिभेच्या टोंकावरून मी रस भक्षण करितों. (१४३) इत्यादि वचनप्रमाणावरून कर्म, मन, वचन यांनीं प्राणलिंगास जो पदार्थ अर्पण केला जातो त्या पदार्थांतील रुचि आपल्या जिव्हेनें पाहिली असतांही तो पदार्थ खरोखर सावधान मनानें अर्पण केल्याप्रमाणें होतें. ह्मणून स्वयंपाकांत चाकरांनीं तसें केलें असतांही तो पदार्थ देवास अर्पण करण्यास योग्यच असतो. ह्याचप्रमाणें स्कांदपुराणांत सांगितलें आहे कीं, इच्छा नसतांना वास घेतलेला, स्पर्श केलेला, पाहिलेला, असा शिवार्पण केलेला पदार्थ यत्किंचितही दूषित होत नाहीं. क्रियातिलकांत सांगितलें आहे कीं, (१४४) गायींच्या शरीरांत असलेलें गायींचें तूप त्यांस पुष्टि देत नाहीं तेंच पुनः विशेष कर्मीनें मिश्रित झालें असतां त्यांस पुष्टिकारक औषध होतें. (१४५) ह्याचप्रमाणें शरीरांत असणाऱ्या तुपाप्रमाणें ईश्वर आहे, त्याची उपासना केल्याशिवाय तो फलद्रूप होत नाहीं. (१४६) ह्या प्रकारच्या वचनप्रमाणांवरून अंतरार्पित केल्याप्रमाणें होतें.तसेंच यजुर्वेदांत सांगतात कीं, जें मनानें ध्यातो, तेंच वाणीनें बोलतो व तेंच कर्मीत आचरण करितो असें श्रुत्यागम प्रमाण असल्यामुळें वाग्विज्ञानमनोभावानें क्रियासमर्पण हें त्रिकरणशुद्ध असें अर्पण होतें. ह्याच अर्थी लिंगपुराणांत सांगतात कीं, कर्मीनें, मनानें, व वाणीनें असें त्रिविध शुभार्पण आहे. अर्पण केल्याविना खाल्लेला प्रसाद निष्फल होतो. (१४७) आपल्या इष्टलिंगास अर्पण केलेलें अन्न खरोखर सूज्ञानें तें नि-

ष्टलिंगाय यद्दत्तं चरुकं तन्न संशयः ॥ तत्प्राशयेत्स्वयं प्राज्ञो नान्यस्यैव तु दापयेत् ॥ न दद्याद्गोजलादिभ्यो दद्याच्चेन्नरकं व्रजेत् ॥ १४७ ॥ बृहत्कालोत्तरे ॥ गच्छन्तिष्ठन्स्वपन् जाग्रन् भुंजानो मैथुने रतः ॥ यः शिवार्पितचेतस्को भक्तिमान् स तु नान्यथा ॥ १४८ ॥ संयोगेषु वियोगेषु चाणुमात्रसुखानि च ॥ यः कुर्यादिष्टलिंगे तु सोऽवधानी निरंतरं॥१४९॥ पंचेंद्रियसुखं मुख्यं हृदयं तस्य कारणात् ॥ मारुतं च तनुस्पर्शे सर्वलिंगसमर्पणं ॥१५०॥ इंद्रियादागतं किंचिद्यत्सुखं तच्छिवार्पितं ॥ तत्तत्प्रसादं भोक्तव्यं तदिंद्रियमुखेन च ॥१५१॥ यदिंद्रियमुखाद्ज्ञेयं तदिंद्रियमुखाच्चरेत् ॥ अन्यैंद्रियोपभुक्तं चेदनर्हं भूषणादिवत् ॥ १५२ ॥ या या क्रिया विधातव्या प्रस्तुता जायते रतिः ॥ तां तां कुर्यान्महादेवे शिवार्पणधिया सुधीः ॥ १५३ ॥ उपभोगाय पुरतो वस्तु यद्यदुपस्थितं ॥ तत्तत्समर्प्य देवाय विदधातात्मसात्ततः ॥१५४॥ आरभ्य कर्माणि शुभान्वितानि भावांश्च सर्वान्विनियोजयेद्यः ॥ तेषामभावे कृतकर्मनाशः कर्मक्षयं याति समर्पणेन ॥१५५॥ अस्मिन्नर्थे क्रियातिलके ॥ अभावे

---

संशय चरु आहे तें भक्षण करावें, तें दुसऱ्यास देऊं नये, तें गायींना देऊं नये किंवा पाण्यांत टाकूं नये, दिलें किंवा टाकिलें असतां तो नरकाला जातो. बृहत्कालोत्तरग्रंथांत सांगितलें आहे कीं, (१४८) उठतां, बसतां, जाग्रतींत किंवा स्वप्नांत, ग्रास घेतां किंवा रतिसुखप्रसंगीं ज्यानें आपलें अंतःकरण शिवार्पण केलें आहे तो भक्तिमानच असतो. तो अन्यथा नव्हे. (१४९) संयोगवियोगकालीं जो अणुमात्र सुखही इष्टलिंगार्पण करितो त्यास निरंतर अवधानी ह्मणावें. (१५०) पंचेंद्रिय सुख मुख्य असून हृदय त्याचें कारण आहे, शरीरास झालेला वायुस्पर्श सर्व लिंगार्पण होतो. (१५१) इंद्रियांपासून होणारें जें कोणतें सुख तें शिवार्पण करावें व त्याच इंद्रियमुखानें तें सुखप्रसाद ह्मणून सेवन करावें. (१५२) जें कांहीं इंद्रियमुखानें समजतें तें इंद्रियमुखानें आचरण करावें. अन्यैंद्रियोपभुक्त असेल तर तें भूषणाप्रमाणें अयोग्य होय. (१५३) जी जी क्रिया करावी ह्मणून वांच्छा उत्पन्न होते ती ती क्रिया शिवार्पणबुद्धीनें बुद्धिमानानें आचरावी. (१५४) उपभोग घेण्याकरितां जी वस्तु आपणापुढें प्राप्त होईल ती शिवास अर्पण करून आपण स्वीकारावी. (१५५) शुभ कर्मास आरंभ करून सर्व इच्छांचें जो शिवार्पण करितो त्यांच्या अभावी कर्मांचा नाश होतो व हा कर्मनाश शिवार्पण केल्यानें होतो. (१५६) ह्याचअर्थी क्रियातिलकांत असें सांगतात कीं, अभावाच्या ठिकाणीं भाव मानून स्थानाच्या ठिकाणीं

भावमासाद्य स्थाने स्थानं समाचरेत् ॥ एतद्वयपरिज्ञानी प्रसादी सावधानकः ॥१५६॥ लिंगसारे ॥ इक्षुरंभाफलादीनि खंडितानि निवेदयेत् ॥ द्राक्षाखर्जूरचूतादीन्यखंडानि निवेदयेत् ॥ १५७ ॥ शुद्धे शिवप्रसादे च शुचित्वं यो न भावयेत् ॥ सोऽपि याति नरो घोरं नरकं कालमक्षयं ॥१५८॥ सुप्रतिष्ठितलिंगस्य न यथा पूर्वभावना ॥ तथा शिवप्रसादस्य पूर्वनाम न संस्मरेत् ॥ १५९ ॥ ततः स्वयं च भुंजीत शुद्धमन्नं यथासुखं ॥ निवेदितं च देवाय तच्छेषं चात्मशुद्धये ॥ १६० ॥ असमर्प्य पदार्थं यो भुङ्क्ते खादति पाति च ॥ पत्रं पुष्पं फलं तोयमन्नपानायमौषधं ॥ शिवार्पणं विना भुङ्क्ते भुङ्क्ते सद्यो हि किल्बिषं॥१६१॥ फलं पुष्पं सुगंधं च वस्त्राद्याभरणानि च ॥ लिंगार्पणात्प्रसादः स्यात्किल्बिषं स्यादनर्पितं ॥ १६२ ॥ लैंगे ॥ सर्वं च तृणकाष्ठं ज भक्ष्यं चैवानुलेपनं ॥ गंधो मृगमदश्चैव कर्पूरस्तैलमंजनं ॥ १६३ ॥ लैंगे ॥ रत्नाभरणजातं च वस्त्रं सकलवाहनं ॥ प्रसाद एव भोक्तव्यो नान्यच्चांडालविट्समं ॥ १६४॥ भोज्यं लेह्यं च चोष्यं च यच्च लिंगार्पितं शुभं ॥ न चे-

---

स्थानाचरण करावें ह्या पूर्वोक्त उभयांचें ज्ञान ज्यास आहे तो सावधान प्रसादी होतो. लिंगसारांत सांगतात कीं, (१५७) उंस, केळीं तोडून शिवार्पण करावीं व द्राक्षें, खजूर, आंबे वगैरे फळें न तोडतां अर्पण करावींत. (१५८) शुद्ध शिवप्रसादाच्या ठिकाणीं जो शुचित्व मानीत नाहीं तो मनुष्य अक्षयकाल भयंकर नरकांत जातो. (१५९) योग्य रीतीनें प्रतिष्ठित झालेल्या लिंगाच्या ठिकाणीं जशी पूर्वीची ( पाषाणाची ) कल्पना नाहीं तसेंच शिवप्रसादाच्या ठिकाणीं पूर्व नामस्मरण करूं नये. (१६०) ह्मणून यथासुख शुद्धान्न स्वतः भक्षण करावें व देवाला निवेदित करून त्याचें शेषान्न आत्मशुद्धिकरितां स्वतः भक्षण करावें. (१६१) शिवार्पण न करितां जो मनुष्य कोणताही पदार्थ भक्षण करितो किंवा खातो किंवा पितो, तसेंच पत्र, पुष्प, फल, अन्न, जल, पेय, पदार्थ वगैरे जो शिवार्पण केल्याविना भक्षण करितो तो तात्काल पातक भक्षण करितो असें समजावें. (१६२) फल, पुष्प, सुगंध वस्त्रादि आभरणें हीं लिंगार्पण केलीं असतां प्रसाद होतात व अर्पण न केल्यास पातकें होतात. लिंगपुराणांत सांगतात कीं, (१६३) तृण, काष्ठ, भक्ष्य, अनुलेपन, गंध, कस्तूरी, कर्पूर, तैल, अंजन, (१६४) रत्नाभरणें, वस्त्रें, सर्व वाहनें हीं सर्व प्रसादच ह्मणून भोगावींत, दुसरे सर्व पदार्थ चांडालाच्या विष्टेप्रमाणें आहेत ह्मणून उपभोग करूं नये. (१६५) लिंगाला अर्पण केलेले जे भो-

च्छिष्टान्नमिश्रं तु प्रसादं निष्फलं भवेत् ॥ १६५ ॥ बह्वपि स्तोकमेवापि शिष्टान्नेन विमिश्रितं ॥ अनर्पितं च भुंजानस्तदेवोन्नतकिल्बिषं ॥१६६॥ इत्यादिवचनप्रामाण्यात् ॥ प्रसादमन्यदेवस्य भुक्तं तत्किल्बिषं भवेत् ॥ शिवस्यैव तु निर्माल्यं भक्त्या धार्यं द्विजातिभिः ॥१६७॥ न तं स्पृशंति पापानि मनोवाक्कायजानि च ॥ नैवेद्यं विष्णुना भुक्तममृतं चान्यदैवतैः ॥ निर्माल्यं च सनैवेद्यं भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥१६८॥ इत्यादिवचनप्रामाण्यात् ॥ ब्राह्मणानामपि परमेश्वरप्रसाद एव विशेषेण भोक्तव्यः ॥ वशिष्ठभृग्वत्रिपाणिनिकणादप्रभृतिमुनिगणैर्निषेवितत्वाच्च परमेश्वरस्य प्रसाद एव भोगमोक्षार्थिनां ब्राह्मणादिवर्णानामुपभोग्य एव ॥ असंस्कारि च यत्पाकं शंभोरन्यनिवेदितं ॥ भुङ्क्ते यद्युभयं तस्य प्रसादं निष्फलं भवेत् ॥१६९॥ अभक्तजनसंस्पृष्टान्पदार्थानिह वर्जयेत् ॥ अभक्तालोकितं चैव वर्जयेदोदनादिकं ॥ १७०॥ भविशब्दः कुशब्दश्च हिंसाशब्दस्तथापरः ॥ श्वपचादिकशब्दश्च कर्मशोकादिकं वचः ॥ बै-

---

ज्य, लेह्य व चोष्य पदार्थ ते शुभ होत, लिंगार्पित नसतील तर शिष्टान्न मिश्रित प्रसाद निष्फल होतो. (१६६) थोडें किंवा फार असो शिष्टान्नानें मिश्रित असून शिवार्पण केलेलें नसून जो खाईल तर तेंच अन्न थोर पातक होईल. (१६७) इत्यादि वचनप्रमाणांवरून अन्य देवाचा प्रसाद भक्षण केला तर तें पातक होतें. परंतु शिवनिर्माल्य मात्र द्विजातींनें भक्तिपुरःसर धारण करावा. (१६८) कायिक, वाचिक, मानसिक पापें त्यास स्पर्श करीत नाहींत; विष्णूनें नैवेद्य भक्षण केला व अन्य दैवतांनीं अमृत भक्षण केलें नैवेद्यासहित निर्माल्य भक्षण केल्यास चांद्रायण व्रताचरण करावें. (१६९) इत्यादि वचनप्रमाणांवरून ब्राह्मणांना देखील विशेषतः शिवप्रसादच भक्षण करणें योग्य आहे. वशिष्ठ, भृगु, अत्रि, पाणिनी, कणाद इत्यादि मुनिगणांनीं शिवप्रसाद ग्रहण केल्यामुळें भोगमोक्षाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणादि वर्णांना परमेश्वर प्रसाद ग्रहण करणें योग्य आहे. शंकराहून अन्य देवतेस अर्पण केलेला व असंस्कृत हे उभय पाक जो भक्षण करितो त्याचा प्रसाद निष्फल होतो. (१७०) अभक्तांनीं स्पर्श केलेले पदार्थ वर्ज्य करावेत. अभक्तानें पाहिलेला भात वगैरे पदार्थ वर्ज्य करावेत. (१७१) भविशब्द, दुष्टशब्द तसाच हिंसाशब्द, चांडालादिकांचा शब्द, कर्मशोकादिक भाषण व बीभत्स शब्द, हे महादेवि, प्रसाद ग्रहण करणाऱ्यानें वर्ज्य करावेत. वातुलतंत्रांत सांगितलें

भक्तिसको महादेवि प्रसादी वर्जयेदमून् ॥१७१॥ वातुलतंत्रे ॥ अंतराया मया प्रोक्ताः प्रसादस्य च सप्तधा ॥ कथंचित्तत्र जातेषु निर्माल्यं वंचितं स्मृतं ॥१७२॥ चर्मास्थिरुधिरं मांसं क्षुद्रग्रामीणजंतुयुक् ॥ मधुबिंदुयुतं त्याज्यं दर्शने स्पर्शने शुभं ॥१७३॥ पूर्वं पदार्थान् संशोध्य सद्यः पाको विधीयते ॥ लिंगोच्छिष्टं परं कार्यं ततः प्रसादसेवनं ॥१७४॥ कथंचित्प्रसादजाता येऽतराया इमे शिवे ॥ तत्सर्वं न हि भुंजीयाल्लिंगोच्छिष्टं न पावनं ॥१७५॥ मनःपूतं तु नैवेद्यं नयनानंदपूरितं ॥ भविदृष्टितिरोधानपटेनाच्छादयेत्सदा ॥१७६॥ रहस्ये ॥ न विकल्प्य धिया शंभोर्भुक्तोच्छिष्टान्नपानकं ॥ यो भुङ्क्ते स गणाधीशो यावज्जीवं प्रतिज्ञया ॥ १७७ ॥ प्राणप्रयाणकालेषु सर्वभोगोपभोगकं ॥ अर्पयेत्सावधानी च स लिंगप्राणनायकः ॥१७८॥ पूजका बहवः संति भक्ताः शतसहस्रशः ॥ तत्र प्रसादपात्रं तु द्वौ त्रयो नैव पंच षट् ॥१७९॥ शिवप्रसादमाहात्म्यं सिद्धकिन्नरगुह्यकाः ॥ विष्णुप्रमुखदेवाश्च ते न जानंति किं नराः ॥१८०॥ तल्लक्षणाभिधानपुरःसरमवांतरभेदमाह ॥ प्रसादं त्रि·

---

आहे कीं, (१७२) प्रसादाचे सात प्रकारचे अंतराय मी सांगितलें त्यांपैकीं कोणताही अंतराय आला असतां निर्माल्य वंचित झालें असें समजावें. (१७३) चर्म, अस्थि, रुधिर, मांस, क्षुद्र, ग्रामीणजंतुयुक्त किंवा मधुबिंदु यांनीं युक्त निर्माल्य त्याज्य, आहे. तो दर्शन घेण्यास किंवा स्पर्श करण्यास अशुभ होय. (१७४) हें पूर्वीचे पदार्थ शोधून पाक तयार करावा. नंतर तो लिंगार्पण करावा. नंतर प्रसाद ह्मणून सेवन करावा. (१७५) हे कल्याणि, हे अंतराय प्रसंगवशात् प्रसादांत झाले असतां तें सर्व भक्षण करूं नये तें लिंगोच्छिष्टही पावन नाहींत. (१७६) नैवेद्य मनास स्वच्छ वाटावा, व नयनाला आनंददायक असावा व तो अलिंगी मनुष्याच्या दृष्टीस पडूं नये, ह्मणून त्यावर सर्वदा वस्त्राच्छादन असावें. रहस्यांत सांगितलें आहे कीं, (१७७) शंकराविषयींची बुद्धि विकलित न करितां शिवोच्छिष्ट अन्न पान जो आजन्म प्रतिज्ञेनें भक्षण करितो तो गणाधीश होतो. (१७८) प्राण जाण्याच्या कालीं सर्व भोगोपभोग मनुष्यानें सावधान होऊन शिवार्पण करावेत, ह्मणजे तो लिंगप्राणी होतो. (१७९) पूजा करणारे पुष्कळ असतात व भक्तही शेंकडो असतात, परंतु त्यांत प्रसादपात्र असे दोन तीनच असतात, पांच सहा असत नाहींत. (१८०) शिवप्रसादाचें माहात्म्य सिद्ध, किन्नर, गुह्यक, विष्णु, प्रमुख देव यांसही समजत नाहीं, तें मनुष्यास कसें समजावें. (१८१) त्याचें लक्षण

विधं प्रोक्तं शुद्धं सिद्धं प्रसिद्धकं ॥ शुद्धं लिंगमुखात्त्यक्तं सिद्धं चरविसर्जितं ॥ प्रसिद्धं च गुरोर्भुक्तमित्येतत्त्रिविधं स्मृतं ॥१८१॥ नित्यं वैदिकशैवेन सेव्यते लिंगसेवितं ॥ तत्त्वार्थं वीरशैवेन सेव्यते चरसेवितं ॥ तथैवोभयशैवेन सेव्यते गुरुसेवितं ॥ १८२ ॥ शिवरहस्ये ॥ गुरुजंगमलिंगानां निर्माल्यं भोजनादितः ॥ सदैवानुभवेद्देवि प्रसादव्रतमुत्तमं ॥१८३॥ गुरौ लिंगे चरे ज्ञाने प्रसादे पादवारिणि ॥ समये भजनं भक्त्या तद्व्रतं भक्तिदं स्मृतं ॥१८४॥ प्राणप्रसादमव्यक्तं व्यक्तं लिंगप्रसादकं ॥ लिंगजंगमसंयुक्तं प्रसादं चेत्यखंडकं ॥१८५॥ महता लिंगरूपेण महता जंगमेन च ॥ द्विविधेन समुद्भूतप्रसादाय नमो नमः ॥१८६॥ लिंगद्वयप्रसादं च यो भुंक्ते श्रद्धयान्वितः ॥ तदीयोच्छिष्टनिर्माल्यं सर्वे यांति परं पदं ॥१८७॥ बोधायने ॥ गुरुदेवोच्छिष्टप्रसादप्रक्षालिततीर्थग्रहणमुखेन दीक्षान्यायमाह ॥ पादोदकं पापहरं निर्माल्यं चैहिकप्रदं ॥ गुरोर्भुक्तं सदाकालमामुष्मिकफलप्रदं ॥ १८८ ॥ यद्यदात्मोपभोगाय तत्त-

---

नांवासहित दुसरे भेद सांगतों; प्रसाद तीन प्रकारचा आहे; शुद्ध, सिद्ध, आणि प्रसिद्ध. लिंगमुखाला दाखवून घेतलेला तो शुद्ध, चरलिंगानें दिलेला तो सिद्ध, व गुरूनें उपभोगून दिलेला तो प्रसिद्ध, असा प्रसाद तीन प्रकारचा आहे. (१८२) लिंगसेवित प्रसादाचें ग्रहण नित्य वैदिकशैव करितो, वीरशैवजंगम सेवितप्रसाद तत्त्वज्ञानाकरितां सेवन करितो, व उभयशैव गुरुसेवित प्रसादाचें सेवन करितो. शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, (१८३) गुरु, जंगम व लिंग यांचा भोजनादि प्रसाद सर्वकाल उत्तम प्रसादव्रत ह्मणून हे पार्वति सेवन करावा. (१८४) गुरु, लिंग, जंगम, ज्ञान, प्रसाद, पादोदक, आचार यांचें भक्तिपूर्वक भजन करणें हें व्रत भक्तिदायक आहे. (१८५) प्राणप्रसाद हा अव्यक्त, लिंगप्रसाद हा व्यक्त व लिंगजंगमसंयुक्त प्रसाद हा अखंडक असें ह्मणतात. (१८६) मोठ्या लिंगरूपानें, व जंगमरूपानें अशा दोन प्रकारांनीं उत्पन्न झालेल्या प्रसादाला नमस्कार असो. (१८७) दोन्ही लिंगांचा प्रसाद जो भक्तिपूर्वक भक्षण करितो त्याच्या उच्छिष्ट निर्माल्यानें सर्व लोक उत्तम पदाला जातात. बौधायनांत असें ह्मटलें आहे कीं, (१८८) गुरु, देव यांचा उच्छिष्ट प्रसाद, व प्रक्षालिततीर्थग्रहणमुखानें दीक्षान्याय सांगतों. पादोदक पापहारक आहे. व निर्माल्य ऐहिक भोगदायक आहे; गुरूच्छिष्ट (गुरूनें खाऊन उरलेले) सर्वकाल पारलौकिक फलदायक आहे. (१८९) जी जी वस्तु आपल्या भोगाकरितां कल्पिली आहे ती न चुकवितां गुरूला अर्पण क-

द्रव्यमवंचयन् ॥ निवेद्य गुरवे भक्त्या तदाज्ञापालको भवेत् ॥ १८९ ॥ कर्मणा मनसा वाचा गुरूणां भक्तिवत्सलः ॥ शरीरमर्थं प्राणं च सद्गुरुभ्यो निवेदयेत् ॥१९०॥ त्रिविधार्पणेन किं लभ्यते ॥ शरीरनिवेदनात्प्रसादं लब्धवान् ॥ प्राणनिवेदनाल्लिंगसम्बधित्वं लब्धवान् ॥ अर्थनिवेदनाज्जंगमभक्तिं च लब्धवान् न भवति चेच्छरीरवंचकस्य प्रसादसेवासौख्यं न भवति ॥ प्राणवंचकस्य तल्लिंगसंबंधो न भवति ॥ अर्थवंचकस्य तदपरावतारजंगमपरिचर्याफलं न भवति ॥ अस्मिन्नर्थे ॥ शैवे ॥ मत्प्रसादोपभोगी यो मद्भक्तानां च वंचकः ॥ कुंभिपाकेषु घोरेषु पच्यते न हि संशयः॥१९१॥अत एवेत्थमवंचकस्य कदाचिद्दौर्गत्यं न भवति ॥ लौकिकानां तथान्येषामपि मुक्तिर्न विद्यते ॥ पाषंडिनोऽपि मुच्यंते गुरोश्चैव प्रसादतः ॥१९२॥ संसारपापपंकस्य शिवज्ञानांबु नाशकं॥ गुरोः पादोदकं पीतं संसारद्रुमनाशनं॥१९३॥ ॐ अथ गणप्रसादः ॥ ब्रह्मांडपुराणे ॥ नैवेद्यं पुरतो न्यस्तं दर्शनात्स्वीकृतं मया ॥ रसान्मद्भक्तजिव्हाग्रादश्नामि कमलोद्भव ॥१९४॥ इत्यादिवचनप्रामाण्यात्॥

---

रून त्याचें आज्ञाधारक व्हावें. (१९०) कर्मानें, मनानें, वाणीनें गुरूविषयीं भक्तिमान असावें व शरीर, अर्थ, प्राण, हीं सद्गुरूला अर्पण करावींत. (१९१) असें त्रिविधार्पण केलें असतां काय मिळतें? शरीरनिवेदनानें प्रसादप्राप्ति होते; प्राण निवेदनानें लिंगसंबंधित्व प्राप्त होतें. अर्थनिवेदनानें जंगमभक्ति लाभते. न लाभली तर शरीरवंचकास प्रसादसेवनसौख्य मिळत नाहीं; प्राणवंचकास लिंगसंबंध घडत नाहीं. अर्थवंचकास शंकरावतार जो जंगम त्याच्या सेवेचें फल मिळत नाहीं. ह्याच अर्थी शैवपुराणांत सांगतात कीं, माझ्या प्रसादाचा उपभोग घेणाऱ्यास माझ्या भक्तांचा जो वंचक होतो तो भयंकर कुंभिपाकनामक नरकांत खरोखर पचन पावतो. (१९२) ह्मणून याप्रमाणें जो वंचना करीत नाहीं त्यास दुर्गति मिळत नाहीं. दुसऱ्या लौकिक लोकांना मुक्ति मिळत नाहीं. परंतु गुरुप्रसादानें पाषंडी देखील मुक्त होतात. (१९३) संसारांतील पापरूपी चिखलाचें शिवज्ञानरूपी जलानें क्षालन होतें. गुरूचें पादोदक प्राशन केलें असतां संसारवृक्षाचा नाश होतो. आतां गणप्रसाद सांगतों. ब्रह्मांडपुराणांत सांगितलें आहे कीं,(१९४) नैवेद्य पुढें ठेविला असतां तो मी दर्शनमात्रें स्वीकार करितों, परंतु हे ब्रह्मदेवा, त्या नैवेद्यांतील रस भक्तांच्या जिभेच्या अग्रानें ग्रहण करितों. (१९५) इत्यादि

तेनोपभुक्तस्रग्गंधवस्त्रालंकरणादिकं ॥ अनुभुक्ते गणोच्छिष्टं सोऽपि मायां तरिष्यति ॥१९५॥ सकृल्लिंगार्चकोच्छिष्टं स्वदेहे यस्तु लेपयेत् ॥ वज्रकायः स भवति शिवेन सह मोदते ॥ १९६ ॥ तस्योदाहरणमाह ॥ श्रीमहाभारते ॥ दुर्वासोच्छिष्टभुक्तेन पादबाह्यांगलेपनात् ॥ सहसा वज्रकायं हि प्राप्तवान् विष्णुरव्ययः ॥ १९७ ॥ तस्मात्कारणात्सर्वभक्तगणप्रीतिभुक्तं शिष्टप्रसादनं ॥ गणः प्रसादी यः सोऽयं भुंजीत सुखलीलया ॥ चराचरप्रसादान्नं भोक्तुस्तच्छेषधारणात् ॥ चराचराणां भूतानामपि मुक्तिर्भवेत् प्रिये ॥१९८॥ प्रसादभोक्तॄन्निंदंति ये जना भक्तिसंयुतान् ॥ ते यांति पितृभिः सार्धं नरकं नात्र संशयः ॥ १९९ ॥

इति शैवरत्नाकरे प्रसादमाहात्म्यं नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

---

वचनप्रमाणावरून त्या भक्तानें उपभोगिलेल्या पुष्प, गंध, वस्त्र, अलंकार, वगैरे गणोच्छिष्टाचें सेवन करणाराही मायेंतून पार पडतो. (१९६) लिंगपूजेच्या उच्छिष्टाचा आपल्या आंगास एकवार लेप केला असतां तो मनुष्य वज्रदेही होऊन शिवाबरोबर आनंद करितो. ह्याचें उदाहरण सांगतों, महाभारतांत असें आहे कीं, (१९७) दुर्वासाच्या उष्ट्यानें पायापासून बाह्यांग विष्णूनें लेपन केलें तेव्हां तो एकाएकी वज्रदेही झाला. (१९८) ह्या कारणास्तव सर्व भक्तगणानें प्रीतिपूर्वक भक्षण करून राहिलेलें उच्छिष्ट जो प्रसादि आहे त्यानें तें सुखानें भक्षण करावें, चराचर प्रसादान्न भक्षण करणाऱ्याचा शेषप्रसाद भक्षण केला तर चराचर प्राण्यांना देखील मुक्ति मिळते. (१९९) भक्तिमान अशा प्रसाद भक्षण करणाऱ्यांना जे लोक निंदतात ते निःसंशय आपल्या पूर्वजांसह नरकाला जातात.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकरग्रंथांतील प्रसादमाहात्म्य नांवाचा सोळावा अध्याय पूर्ण झाला.



# अथ सप्तदशोऽध्याय

श्रीगणेशाय नमः ॥ अथ कालिकाखंडे ॥ ध्यानरूपं महेशानं लिंगं दृष्ट्वा न मन्यते ॥ स पच्यते महाघोरे नरके कालमक्षयं ॥१॥ सोमशंभौ ॥ लिंगे पादेन संस्पृष्टे लंघने वापि पातकं ॥ पात्रोपकरणं चैव निर्माल्यं च न लंघयेत् ॥२॥ वायवीये ॥ तृणं वा यदि वा काष्ठं मृदं वा जलमेव वा ॥ परस्यापहराज्जंतुर्नरके च प्रपच्यते ॥३॥ तृणं काष्ठं फलं पुष्पं पलाशं वै हरेत्तु यः ॥ धर्मार्थं केवलं चैवमन्यथा पतितो भवेत् ॥४॥ शिवधर्मे ॥ स्वामिनो लभ्यमानानामुच्छिष्टानां च संभ्रमे ॥ परस्वानामनादानमेतदस्तेयलक्षणं ॥५॥ अलाभेऽपि परस्वेषु यो मनो नैव यच्छति ॥ कर्मणा मनसा वाचा स तृप्तः शिवतां व्रजेत् ॥ ६ ॥ कूर्मे ॥ श्राद्धदानाश्रमैर्युक्तः सोऽमृतत्वाय कल्पते ॥ न्यायागतधनः शांतो ब्रह्मविद्यापरायणः ॥ स्वधर्मपालको नित्यं सोऽमृतत्वाय कल्पते ॥७॥ तिथिं परस्य न ब्रूयान्नक्षत्राणि न निर्दिशेत् ॥ मक्षिकापादमात्रेण शिवस्वेनोपजीवति ॥८॥ लोभान्मोहात्स पच्येत कल्पांतं नरके नरः ॥ तृ-

---

कालिकाखंडांत सांगतात कीं, (१) ध्यानरूपी महेश्वरलिंग पाहून त्यास जो मान देत नाहीं तो अक्षयकाल नरकांत वास करितो. सोमशंभुग्रंथांत सांगतात कीं, (२) लिंगाला पादस्पर्श किंवा त्याचें उल्लंघन केलें तर पाप लागतें; शंकराचें अर्घ्यपात्र वगैरे उपकरण, द्रव्य किंवा निर्माल्य हीं लंघन करूं नयेत, वायवीयसंहितेंत सांगतात कीं,(३) तृण, लांकूड, मृत्तिका, किंवा जल, किंवा कोणती परक्याची वस्तु हरण केली असतां तो हरण करणारा प्राणी नरकवास पावतो. (४) तृण, काष्ठ, फळ, पुष्प, पळस, ही धर्मार्थ हरण करावी, अन्य कार्यार्थ हरण केल्यास तो पतित होतो शिवधर्मांत सांगतात कीं, (५) स्वामीपासून मिळणाऱ्या उच्छिष्टाविषयीं औत्सुक्य व परद्रव्यापहार न करणें हें अस्तेयाचें लक्षण होय. (६) न्याय्यरीतीनें लाभ न झाला असतांहि परद्रव्याच्या ठिकाणीं मन घालीत नाहीं तो कर्मानें, मनानें, वाचेनें, तृप्त होऊन शिवस्वरूपी होतो, कूर्मपुराणांत सांगतात कीं (७) श्राद्ध, दान, व आश्रम, यांनीं युक्त मनुष्य मोक्षास योग्य होतो. ज्यानें न्यायानें धन मिळविलें आहे व जो शांत असून ब्रह्मविद्येंत आसक्त असतो व नित्य धर्म रक्षण करितो तो मोक्षास योग्य होतो. (८) दुसऱ्यास तिथि किंवा नक्षत्र सांगूं नये; लोभानें किंवा मोहानें जो माशीच्या पायाइतक्या शिवद्रव्यानें उपजीविका करितो, (९) तो मनुष्य कल्पांत नरकांत पचन पावतो. आपल्या तृतीयांश द्रव्यानें शिवा-

तीयांशेन वित्तेन प्रकुर्वीत शिवार्चनं ॥९॥ न्यायोपार्जितवित्तस्सन्न्यायं परिवर्जयेत् ॥ अन्यायार्जितवित्तं तु नरकायैव केवलं ॥१०॥ सत्येन लोकं जयति सत्यं तत्परमं पदं ॥ यथाभूतार्थवादं तु सत्यमाहुर्मनीषिणः ॥११॥ शिवधर्मे ॥ स्वानुभूतं स्वदृष्टं च यो दृष्टार्थं न गूहति ॥ यथाभूतार्थकथनमित्येतत्सत्यलक्षणं ॥ १२ ॥ सत्यं सत्यं पुनः सत्यमेतद्वा सत्यलक्षणं ॥ परपीडाविनिर्मुक्तं यो दद्याद्वचनं सदा ॥१३ ॥ अश्वमेधशतं पूर्णं सत्यं तत्साम्यमादृतं ॥ सत्ये प्रतिष्ठितं ज्ञानं धर्मः सत्ये प्रतिष्ठितः ॥१४॥ सत्ये प्रतिष्ठितं शौचं शीलं सत्ये प्रतिष्ठितं ॥ सत्ये प्रतिष्ठितो मोक्षो मोक्षे सत्यं प्रतिष्ठितं ॥१५॥ कामान्मोहाद्भयाल्लोभात्सत्यं नातिक्रमेद्द्विजः॥ सत्यातिक्रमणाद्विप्रो ब्राह्मण्यान्मुच्यते यथा ॥१६॥ असत्यं न वदेत्किंचिन्न सत्यं च परित्यजेत् ॥ यत्सत्यं ब्रह्म चेत्याहुरसत्यं ब्रह्मदूषणं ॥ अनृतं परुषं ग्राम्यं पैशून्यं पापहेतुकं ॥ १७ ॥ ॥ सौरे ॥ अहिंसा सर्वभूतानां भवेदानंदकृत्सदा ॥ अहिंसा परमो धर्मः सर्वेषां प्राणिनां ततः ॥ १८ ॥ यद्दानमभयस्य स्यात्सर्वदानोत्तमो-

---

र्चन करावें. (१०) न्यायानें वित्तोपार्जन करून न्याय कधींहि सांडूं नये. अन्यायानें वित्तोपार्जन करणारा नरकास जातो. (११) सत्यानें सत्यलोक प्राप्ति होते; सत्यलोक परमपद होय; शहाणे लोक सत्यास भूतार्थवाद असें मानितात. शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, (१२) आपण अनुभविलेला व आपण पाहिलेला असा अर्थ न लपवून यथातथ्य निवेदन करणें हें सत्याचें लक्षण होय. (१३) सत्य,सत्य व पुनः सत्य हेंच सत्याचें लक्षण होय. परपीडा न होण्यासारखें जो भाषण करितो (१४) त्यानें शंभर अश्वमेध केल्यासारखें होतें. सत्याच्या ठिकाणीं ज्ञान आहे; सत्याचे ठायीं धर्म आहे. (१५) सत्याच्या ठिकाणीं शौच आहे, सत्याच्या ठिकाणीं शील आहे. सत्याच्या ठिकाणीं मोक्ष व मोक्षाच्या ठिकाणीं सत्य वास करितें. (१६) कामानें, मोहानें, भयानें किंवा लोभानें ब्राह्मणानें सत्याचें अतिक्रमण करूं नये. कारण सत्यातिक्रमणानें विप्र ब्राह्मण्यापासून भ्रष्ट होतो. (१७) कधींही असत्य बोलूं नये किंवा सत्य सांडूं नये. सत्य ह्मणजे ब्रह्म असत्य तें ब्रह्मदूषण होय. खोटें भाषण, कठोर भाषण, ग्राम्य भाषण, व चाहाडी करणें, ही सर्व पापहेतुभूत आहेत. सौरपुराणांत सांगितलें आहे कीं (१८) सर्व प्राणिमात्रांचा वध न करणें हें नेहमीं आनंददायक आहे. ह्मणून सर्व प्राण्यांची हिंसा न करणें हा उत्तम धर्म होय. (१९) दानांत उत्तम दान ह्मणजे अभयदान हें होय. ह्मणून

त्तमं ॥ तस्माद्वै परिहर्तव्या हिंसा सर्वत्र सर्वदा ॥१९॥ सर्वधर्मेषु वि-प्रेंद्रास्त्वहिंसा परमो मतः ॥ तस्मादहिंसानिरतः शांतः शिवजनप्रियः ॥ भक्तिं शिवे समास्थाय तस्मिन् जन्मनि मुच्यते ॥२०॥ शिवधर्मशा-स्त्रे ॥ अहिंसा परमो धर्मः शक्तानां परिकीर्तितः ॥ अशक्तानामयं धर्मो दानयज्ञादिपूर्वकं ॥२१॥ पापे रमंति ये लोके पापिष्ठास्ते नराधमाः ॥ आभूतसंप्लवं यावत्पच्यते नरके ध्रुवं ॥२२॥ आत्मवत्सर्वभूतेषु यो हि-ताय शिवाय च ॥ सदा प्रवर्तते सद्भिरहिंसेयमुदाहृता ॥ २३ ॥ सर्व-शास्त्रेषु वेदेषु यज्ञास्तेषां तु तत्फलं ॥ यो न हिंसेच्च भूतानि तस्य पु-ण्यं ततोऽधिकं ॥२४॥ त्रैलोक्यमपि यो दद्यादखिलं रत्नपूरितं ॥ परे त-पांसि यज्ञाश्च न तत्तुल्यमहिंसया ॥२५॥ न तत्परं प्रवक्ष्यामि क्वचिद-प्यागमे स्वयं ॥ पुंसामखिलदेवानां दानमद्भुतमुत्तमं ॥२६॥ सर्वभूता-भयं कृत्वा यश्चरेच्छांतमानसः ॥ इहैव सर्वभूतेभ्यो न भयं तस्य वि-द्यते ॥२७॥ यो न हिंसति भूतानि चराणि स्थावराणि च ॥ स भूता-

---

नेहमीं सर्वत्र हिंसा वर्ज्य करावी. (२०) हे ब्राह्मणश्रेष्ठहो, सर्व धर्मांमध्यें अहिंसा हा परमधर्म मानिला आहे. ह्मणून अहिंसापर, शांत, असा मनुष्य शिवभक्तांना प्रिय होतो व तो शंकरावर भक्ति ठेवून त्याच जन्मांत मुक्त होतो. शिवधर्मशा-स्त्रामध्यें सांगतात कीं, (२१) सशक्त मनुष्यांना अहिंसा हा उत्तम धर्म होय. व अशक्तांना दानयज्ञादिपूर्वक धर्म सांगितला आहे. (२२) पापांत जे लोक रम-माण होतात तें नराधम अत्यंत पापी होत ते प्रलयकालपर्यंत खरोखर नरकांत पचन पावतात. (२३) प्राणिमात्रांच्या हिताकरितां व कल्याणाकरितां आपल्या-प्रमाणेंच त्याच्या ठिकाणीं जो वागतो त्याच्या त्या वर्तनास सज्जन अहिंसा असें ह्मणतात. (२४) सर्व शास्त्रांत व वेदांत यज्ञास जें फल सांगितलें आहे त्याहून जास्त सर्व भूतांची हिंसा न करणाऱ्यास सांगितलें आहे. (२५) रत्नांनीं भरलेलें त्रैलोक्य दान केलें असतां मिळणारें फल किंवा तपें व यज्ञ यांनीं परलोकांत मि-ळणारें फल हीं अहिंसा फलाची बरोबरी करीत नाहींत. (२६) अहिंसेच्या फला-पेक्षां दानाचें फल अद्भुत किंवा उत्तम आहे असें कोणत्याही आगमांत मी मनु-ष्यांना किंवा देवांना सांगितलें नाहीं. (२७) सर्व भूतांना अभय देऊन जो शांत-मनानें वागतो त्यास ह्या लोकीं कोणाचेंहि भय नाहीं. (२८) जो चराचर भू-ताची हिंसा करीत नाहीं तो खरोखर भूतात्मा होय. त्याला उत्कृष्ट शांति

त्मेति निरतं परां शांतिमवाप्नुयात् ॥ २८ ॥ स्वगृहे यो नरः कुर्यात्प्राणहिंसानिवारणं ॥ अनस्थिप्राणिसंघातं हत्वैकाथ शिवं जपेत् ॥२९॥ जपेदष्टसहस्रं तु क्षेत्रविद्गोवधेन च ॥ हत्वा शूद्रं स्त्रियं बालं शिवं पंचशतं जपेत् ॥ जपेदष्टसहस्रं तु गजाश्वादिनिपातने ॥३०॥ सौरे ॥ अनृतात्पारदार्याच्च तथाऽभक्ष्यस्य भक्षणात् ॥ अश्रौतधर्माचरणात्क्षिप्रं नश्यति वै कुलं ॥३१॥ शिवधर्मे ॥ मौनं व्रतं महापुण्यं हुंहुंकारविवर्जितं ॥ कर्मणा मनसा वाचा हिंसां तत्र विवर्जयेत् ॥ सदा मौनव्रते निष्ठा मौनं सर्वार्थसाधकं ॥३२॥ शिवधर्मे ॥ यश्चात्मार्थे परार्थे वा समस्तेंद्रियसंयमः ॥ न कार्ये संप्रवर्तेत तदाहुः शमलक्षणं ॥ ३३ ॥ अक्षीणाशेषदोषाणां शिववार्तापि दुर्लभा ॥ प्रक्षीणाशेषदोषस्य शुद्धांतःकरणस्य तु ॥३४॥ देवदेवपरिज्ञाने वांछा जायते सुव्रत ॥ शिवाज्ञाश्रवणोद्युक्तो यद्याऽऽलस्यात्पराङ्मुखः॥३५॥ विनाश्य सुकृतं सर्वं दुष्कृताद्रौरवं व्रजेत् ॥ पारवश्यं तु तन्मध्ये दुर्निवारं महामुने ॥ ३६ ॥ यदाज्ञानप्रवक्तार-

---

लभते. (२९) जो मनुष्य आपल्या घरीं प्राणहिंसा निवारण करितो तोहि उत्तम शांति पावतो. बिनहाडांचा प्राणिसमुदाय मारिला तर शिवमंत्राचा जप करावा. (३०) क्षेत्रज्ञ मनुष्यानें गोवध केला तर आठ सहस्र जप करावा; शूद्र, स्त्री, बाल, यांची हत्या केली तर पांचशें शिवमंत्र जप करावा. गज, अश्व, यांचा निपात (हत्या) केला तर आठ हजार जप करावा. सौरपुराणांत सांगितलें कीं, (३१) असत्य भाषणानें, परदारागमन केल्यानें, अभक्ष्य भक्षण केल्यानें किंवा अवैदिक धर्माचरण केल्यानें तात्काल कुलनाश होतो. शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, (३२) हुंहुंकाररहित जें मौनव्रत तें महापुण्यदायक आहे. कायिक, वाचिक, मानसिक, हिंसा वर्ज्य करावी. नेहमीं मौनव्रताचे ठिकाणीं निष्ठ असावें, कारण मौन सर्वार्थ साधक आहे. शिवधर्मांत सांगतात कीं, (३३) आपल्याकरितां किंवा दुसऱ्याकरितां सर्व इंद्रियांचा जो संयम करणें व कोणत्याही कार्यांचे ठायीं त्याचें प्रवर्तन न करणें त्यास शम असें ह्मणतात. (३४) ज्यांचे सर्व दोष नष्ट झाले नाहींत त्यांस शिववार्ताही दुर्लभ आहे. ज्याचे सर्व दोष नाश पावले आहेत त्या शुद्धांतःकरणाच्या मनुष्याला (३५) हे सुव्रता देवज्ञानाची इच्छा होते. शिवाज्ञा श्रवण करण्यास उद्युक्त असतां जर आलस्यानें मनुष्य पराङ्मुख झाला (३६) तर सर्व सुकृताचा नाश करून तो रौरव नरकाला जातो. हे महामुने त्या रौरव नरकांतील पारतंत्र्य अनिवार्य आहे. (३७) आज्ञा करणाऱ्याची आज्ञा घेऊन तशीच शि-

मनुज्ञाप्य तथा शिवं ॥ पुस्तकं च तथाराध्य क्रमात्तत्तत्परो भवेत् ॥३७॥ अहोरात्रस्य पक्षस्य मासः संवत्सरस्य च ॥ उपवासव्रतानां तु तत्फलं वाचिकार्चनं ॥३८॥ अंगवंगकलिंगाश्च मालवो गुर्जरस्तथा ॥ अहिरः कौंकणश्चैव द्राविडो दक्षिणापथः ॥ अवंतिर्मागधश्चैव देशानेतान् विवर्जयेत् ॥३९॥ शिवधर्मे ॥ यत्र क्षेत्रे शिवो नास्ति वीरमाहेश्वरो जनः ॥ तत्र स्थानं न कर्तव्यं विंध्यं नगवनांतरं ॥ ४० ॥ स्वयंभु यत्र वा लिंगं यत्र वा शिवयोगिनः ॥ समंताद्योजनं तत्र वाराणस्या समं विदुः ॥४१॥ कीदृशेष्वपि देशेषु यत्र माहेश्वरो जनः ॥ तत्र योजनपर्यंतं वाराणस्या समं विदुः ॥४२॥ कीकटेष्वपि देशेषु यत्र माहेश्वरो जनः ॥ तत्र योजनपर्यंतं वाराणस्या समं विदुः ॥४३॥ कीदृशेष्वपि देशेषु यत्र भूतिविभूषणः ॥ तत्र शंभुप्रसन्नो वै तिष्ठेत्काशीसमंततः ॥४४॥ यस्मिन्देशे वसेन्नित्यं भूतिशासनसंयुतः ॥ गतो यदृच्छया वापि सर्वतीर्थसमो हि सः ॥४५॥ अंत्यजो वाधमो वापि मूर्खो वा पंडितोऽपि वा ॥

---

वाची व पुस्तकांची आराधना करून क्रमानें पूर्वोक्तपर व्हावें. (३८) अहोरात्र, पंधरवाडा, महिना, किंवा वर्षभर उपवास व्रताचें जें फल तेंच वाचिकार्चनाचें ( पुराण कथनाचें ), फल आहे. (३९) अंग, वंग, कलिंग, मालव ( माळवा ), गुर्जर ( गुजराथ ), अहीर, कोंकण, द्राविड, दक्षिणापथ, अवंति, मागध, ह्या देशांत शिवालय किंवा शिवभक्त नसल्यास ते वर्ज्य करावेत. शिवधर्मांत सांगितलें कीं, (४०) ज्या स्थळीं शिव किंवा वीरमाहेश्वर नाहींत तेथें राहूं नये. तें स्थान विंध्यवनाप्रमाणें समजावें. (४१) जेथें स्वयंभू लिंगाचें स्थान आहे; किंवा शिवयोगीजन आहेत त्यापासून सभोंवतालचा योजनमात्र प्रदेश वाराणसीप्रमाणें समजावा. (४२) ज्या कोणत्याही देशांत माहेश्वरजन आहेत त्यापासून योजनमात्र प्रदेश वाराणसीसमान मानितात. (४३) कीकटदेशांत जेथें माहेश्वर लोक राहतात तेथील योजनमात्र प्रदेश वाराणसीप्रमाणें समजतात. (४४) ज्या कोणत्याही देशांत विभूत्यलंकार धारण केलेला मनुष्य राहतो तेथें ज्यास शंभु प्रसन्न झाला आहे अशा मनुष्यानें आपण काशीसभोंवार राहिलों आहों असें समजून राहावें. (४५) ज्या देशांत नेहमीं विभूति धारण केलेला मनुष्य राहतो त्या देशांतील कोणाहि मनुष्यानें कोठेंहि गमन केलें तरी तो तीर्थप्रमाणें आहे असें समजावें. (४६) मग तो अत्यंज, किंवा अधम, किंवा मूर्ख, किंवा पंडित असो;

॥ यस्मिन्सदाशिवः सोमः सर्वभूतगणैर्वृतः ॥४६॥ सर्वतीर्थैश्च देवैश्च सान्निध्यं कुरुते सदा ॥ अध्यात्माचरणे स्थित्वा शिवक्षेत्रे वसेन्नरः ॥ देहांते शिवसायुज्यं जायते नात्र संशयः ॥४७॥ सौरे ॥ सोऽपि याति शिवस्थानं यद्देवैरपि दुर्लभं ॥ तस्मात्तद्वसितं कुर्याच्छिवक्षेत्रे समीपतः ॥४८॥ लिंगसारे ॥ सती सुताश्च भृत्याश्च लिंगार्चनरताः शुभाः ॥ लिंगार्पितप्रसादाश्च ह्यन्ये दुष्टा न संशयः ॥ ४९ ॥ दासीगोपाश्च भृत्याश्च गृहशुश्रूषकास्तथा ॥ लिंगसंसर्गिणः कार्या अन्ये नीचा न संशयः॥५०॥ लिंगार्चनरता नारी सूतकी च रजस्वला ॥ रविरग्निर्यथावायुस्तद्वत्कोटिगुणैः शुचिः ॥५१॥ शिवधर्मे ॥ शिवार्थं वचनं त्वेषां संतानार्थं च मैथुनम् ॥ भुक्त्यर्थं जीवनं तेषां स्वर्गार्थं जीवनं हि तत् ॥५२॥ चंडालाग्निरमेध्याग्निः सूतकाग्निश्च गर्हितः ॥ पथिस्थाग्निश्चिताग्निश्च प्रणष्टगृहमाश्रितः ॥५३॥ पूजालोपो न कर्तव्यः सूतके मृतकेऽपि वा ॥ जलबुद्बुदवद्देहस्तस्माल्लिंगं सदार्चयेत् ॥५४॥ धर्मपत्न्याश्च गमनं वि-

---

जेथें सर्व भूतगणांनीं वेष्टित सदाशिवाचें वास्तव्य असतें. (४७) तेथें सर्व तीर्थें व देव यांचें नेहमीं सान्निध्य असतें. अध्यात्म आचरण करून मनुष्यानें शिवक्षेत्रांत राहावें. त्यास देहाचा अंत झाला असतां निःसंशय शिवसायुज्य प्राप्त होतें. सौरांत सांगितलें आहे कीं, (४८) देवांस देखील दुर्लभ असलेल्या शिवस्थानास तो जातो ह्मणून मनुष्यानें शिवक्षेत्रासमीप वस्ति करावी. लिंगसारांत सांगितलें आहे कीं, (४९) वायको, पोरें किंवा चाकर हीं लिंगार्चनांत रत असून लिंगार्पित प्रसाद भक्षण करीत असतील तर तीं शुभकारक समजावींत नाहीं तर तीं दुष्ट आहेत यांत संशय नाहीं. (५०) दासी, गोप, चाकर; तसेंच गृहशुश्रूषा करणारे हे लिंगसंसर्गी असावेत; दुसरे निःसंशय नीच होत. (५१) लिंगाची पूजा करणारी स्त्री सूतकी किंवा विटाळशी असली तरी ती सूर्य, अग्नि, किंवा वायु ह्यांप्रमाणें कोटि गुणांनीं पवित्र होय. शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, (५२) ज्यांचें शिवार्थाकरितां भाषण, प्रजोत्पत्तीकरितां स्त्रीसमागम ( मैथुन ), भुक्तीकरितां जीवन, त्यांचें तें जीवित स्वर्गाकरितांच होय. (५३) चंडालाचा अग्नि, अपवित्राग्नि, सूतकाग्नि, मार्गस्थाचा अग्नि, चिताग्नि, जळत्या घराचा अग्नि हे निंद्य होत. (५४) पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें देह असल्यामुळें सूतकांत किंवा मृतकांत पूजालोप करूं नये तर सर्वदा लिंगार्चन करावें. (५५) धर्मपत्नीशीं गमन करणें वि-

धिनात्र विधीयते ॥ स्त्रियो वै भर्तृशुश्रूषां विहाय व्रततत्पराः ॥५५॥ प्रयांति नरकं घोरं नात्र कार्या विचारणा ॥ गुरुरग्निर्द्विजातीनां वर्णानां ब्राह्मणो गुरुः ॥५६॥ पतिरेव गुरुः स्त्रीणां सर्वस्याभ्यागतो गुरुः ॥ अथ भर्तृविहीनाया धर्मं वक्ष्ये सदा शिवे ॥५७॥ व्रतं दानं तपः शौचं भूशय्या नक्तभोजनम् ॥ ब्रह्मचर्या सदा स्नानं भस्मना सलिलेन वा ॥ शांतिर्मौनं क्षमा नित्यं संविभागो यथाविधि ॥ शिवधर्मे ॥५८॥ शिवभक्तिः सदा क्षांतिरहिंसा सर्वदा शमः ॥ संतोषस्सत्यमस्त्येयं ब्रह्मचर्यं तथाष्टकम् ॥५९॥ लक्षणं ब्रह्मचर्यस्य समस्तेंद्रियसंयमः ॥ ब्रह्मचर्ये स्थितं सत्यं ब्रह्मचर्ये स्थितं तपः ॥६०॥ ब्रह्मचर्ये स्थितं ज्ञानं ब्रह्मचर्ये स्थिता क्षमा ॥ यस्तिष्ठेद्ब्रह्मचर्ये तु तत्र स्यात्संस्थितः शिवः ॥६१॥ एकरात्रे स्थितस्यापि या गतिर्ब्रह्मचारिणः ॥ ब्रह्मस्थोऽपि न तां यातुं प्राप्ते वर्षशतैरपि ॥६२॥ मैथुनं यः समुत्सृज्य चेतसाऽसौ निराकुलः ॥ अहोरात्रं यतिः श्रीमान् न संक्षोभ्यः स्त्रिया तथा ॥ रात्रौ न भोजनं कुर्यान्मुनिर्वै ब्रह्मचर्यवान् ॥६३॥ एकपादपुराणे ॥ ब्रह्मचर्यस्थितो यस्तु

---

धीनें सांगितलें आहे. स्त्रिया पतिसेवा सोडून व्रततत्पर झाल्या (५६) तर त्या निःसंशय नरकास जातात. द्विजांचा गुरु अग्नि, वर्णांचा गुरु ब्राह्मण, (५७) स्त्रियांना गुरु पति व अभ्यागत सर्वांचा गुरु होय. हे पार्वति, आतां विधवेचा धर्म सांगतों. (५८) व्रत, दान, तप, शौच, भूशय्या, रात्रौ भोजन, ब्रह्मचर्या, भस्मानें किंवा पाण्यानें सदा स्नान करणें, शांति, मौन, क्षमा, नित्य संविभाग ( वांटणी ) हे विधवेचे धर्म होत. शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, (५९) शिवभक्ति, नित्य शांति, अहिंसा, नित्य शम, संतोष, सत्य, अस्तेय ( चोरी न करणें ), व ब्रह्मचर्य हे आठ विधवेचे धर्म आहेत. (६०) सर्व इंद्रियांचें संयमन हें ब्रह्मचर्याचें लक्षण होय. ब्रह्मचर्याच्या ठिकाणीं सत्य व तप हीं आहेत. (६१) ब्रह्मचर्याचे ठायीं ज्ञान, क्षमा हीं आहेत. जो ब्रह्मचर्यांत राहतो त्याच्या ठिकाणीं साक्षात शिव वास्तव्य करितो. (६२) एक रात्र ब्रह्मचर्यांत राहणाऱ्याची जी गति ती ब्रह्मस्थाला शंभर वर्षांत देखील प्राप्त होत नाहीं. (६३) मनाला किंचिन्मात्रही तळतळ न होतां जो स्त्रीसंभोगाचा त्याग करितो तो थोर मुनि होय त्यास यापुढें स्त्रियेकडून कधींहि क्षोभ होणार नाहीं. ब्रह्मचारी मुनीनें रात्रीं भोजन करूं नये. एकपादपुराणांत सांगितलें आहे कीं, (६४) ब्रह्मचर्यांत राहणाऱ्यानें सर्वदा लिंगार्चन क-

लिंगमभ्यर्चयेत्सदा ॥ तस्य मोक्षो भवेद्देवि ह्यतिकामो विनश्यति ॥६४॥ शिवधर्मे ॥ ब्रह्मचर्यं तपो ध्यानं क्षांतिराहारलाघवम् ॥ इत्येते तपसो रूपं सुघोरं पंचलक्षणम् ॥६५॥ क्षमा शांतिश्च संतोषः सत्यमस्तेयमेव च ॥ ब्रह्मचर्यं शिवज्ञानं वैराग्यं भस्मसेवनम् ॥६६॥ ऋतुकालाभिगामित्वं स्वदारेषु च नान्यथा ॥ सर्ववर्ज्यं गृहस्थस्य ब्रह्मचर्यमुदाहृतम् ॥६७॥ रागस्यावशगत्वं यत्क्षांतिरेषा सुनिर्मला ॥ क्रोधस्तस्य वृथा यस्मात्तस्मात्क्रोधं विवर्जयेत् ॥६८॥ स शूरः सात्विको विद्वान् स तपस्वी जितेंद्रियः ॥ येनाशु शांतिखड्गेन क्रोधशत्रुर्निपातितः ॥६९॥ क्षमा दानं क्षमा सत्यं क्षमाऽहिंसा क्षमा श्रुतम् ॥ क्षमा स्वर्गश्च मोक्षश्च क्षमयैव जगज्जनः ॥७०॥ यस्तु संवत्सरं त्वन्यैः पतितैः सह संवसेत् ॥ सोऽपि तत्समतां याति नामतो ज्ञानतोऽपि वा ॥७१॥ न मूर्खैः सह संवासः पतितैर्न कदाचन ॥ मिथ्यानिंदारतैश्चैव परमेश्वरनिंदकैः ॥७२॥ सौरे ॥ पैशून्यदुःखदां वाणीं विवादं वर्जयेत् सदा ॥ मूर्तयो याः शिवस्याष्टौ तासां निंदां विवर्जयेत् ॥ सौरे ॥ वदेन्नैवा-

---

रावें, त्यास मोक्ष मिळतो. हे देवि, अत्यंत कामी मनुष्य नाश पावतो. शिवधर्मांत सांगतात कीं, (६५) ब्रह्मचर्य, तप, ध्यान, क्षांति, अल्पहार असें तपाचें रूप अत्यंत घोर व पंचलक्षणात्मक आहे. (६६) क्षमा, शांति, संतोष, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, शिवज्ञान, वैराग्य, भस्मसेवन, (६७) ऋतुकालीं स्वस्त्रीमैथुन करणें, परदारागमन न करणें, हें गृहस्थाश्रम्याचें ब्रह्मचर्य होय. (६८) मोहाला वश न होणें, हीच निर्मल शांति; अशी शांति ज्याच्याजवळ आहे त्यास क्रोधाचें कांहींच प्रयोजन नाहीं, ह्मणून क्रोध सदैव वर्ज्य करावा. (६९) शांतिरूपी खड्गानें ज्यानें क्रोधरूपी शत्रूचा तात्काल नाश केला तोच शूर, सात्विक, विद्वान, तपस्वी व जितेंद्रिय होय. (७०) क्षमा हेंच दान, क्षमा हेंच सत्य, क्षमा हीच अहिंसा, क्षमा हीच श्रुति, क्षमा हाच स्वर्ग व मोक्ष, क्षमेनेंच जग जगत आहे. (७१) जो एक संवत्सरपर्यंत पतितांबरोबर वास करितो तो त्यांच्या सारखाच नांवानें व ज्ञानानें होतो. (७२) मूर्ख, पतित, असत्यपणें निंदा करणारे, व शिवनिंदक यांजबरोबर कधींहि वास करूं नये. सौरांत सांगितलें आहे कीं, (७३) दुष्ट दुःख देणारे भाषण व वादविवाद हीं सांडावींत. शंकराच्या अष्ट मूर्तींची निंदा वर्ज्य करावी. सौरपुराणांत सांगतात कीं, अप्रिय, अनृत, व धर्मघातक वाक्य कधींहि बोलूं नये,

प्रियं वाक्यं नानृतं च न धर्मद्वत् ॥७३॥ कालिकाखंडे ॥ मन्निमित्त-कृतं पापमपि धर्माय कल्पते ॥ मामनादृत्य यत्पुण्यं पापं स्यात्प्रत्य-वायकृत् ॥७४॥ अहिंसकाश्च ये भक्ता निंदंति च महेश्वरान् ॥ त्रिशूल-पाणिना सर्वे हतास्ते तु न संशयः ॥७५॥ शंकरस्नेहसंजातो रक्ष-णीयः प्रयत्नतः ॥ तद्रक्षणान्महेशस्य लोके संमोदते नरः ॥७६॥ उत्तमं सर्वधर्माणामुन्नतं परमात्परम् ॥ शिवनिंदाकरं हत्वा पीडितः स्वय-मेव वा ॥७७॥ यस्त्यजेत्स्वस्य वै प्राणान्न पुनः सोऽभिजायते ॥ शिव-निंदाकरं हंतुमशक्तो यः स्वयं हतः ॥७८॥ सद्य एव विमुच्येत त्रिस-प्तकुलसंयुतः ॥ शिवार्थे यस्त्यजेत्प्राणान् शिवभक्तार्थमेव वा ॥७९॥ शिवाचारार्थमथ वा शिवविद्यार्थमेव वा ॥ न तेन सदृशः कश्चिन्मु-क्तिमार्गाश्रितो नरः ॥८०॥ वीरभद्रीये ॥ त्रैलोक्ये प्राणिनः सर्वे न हं-तव्याः प्रयत्नतः ॥ शिवकार्येषु वक्रस्तु हंतव्यश्च स शीघ्रतः ॥८१॥ वातुलतंत्रे ॥ शिवनिंदाकरं वाक्यं श्रुत्वा तद्वक्त्रताडनम् ॥ कुर्याद-न्यत्र वा गच्छेदशक्तोपि हि तं श्रुतौ ॥८२॥ शिवद्रव्यापहाराय प्रया-

---

कालिकाखंडांत सांगितलें आहे कीं, (७४) माझ्याकरितां केलेलें पाप धर्मसमान होतें. माझा अनादर करून जें पुण्य मिळतें तें अपायकारक पाप होतें. (७५) जे अहिंसक भक्त माहेश्वरांची निंदा करितात ते शंकराकडून निःसंशय मारिले गेले आहेत असें समजावें (७६) शंकरप्रीतीनें उत्पन्न झालेल्याचें प्रयत्नानें रक्षण करावें, त्या महेश्वराचें रक्षण केल्यानें लोकांत मनुष्य आनंद पावतो. (७७) शिव-निंदकाला मारणें सर्व धर्मांत उत्तमोत्तम धर्म होय अथवा त्यास मारण्यांत जो स्वतः पीडित होतो तो तितकाच उत्तम होय. (७८) शिवनिंदकास मारण्यास जो आपले प्राण देतो, तो पुनः जन्म पावत नाहीं शिवनिंदकाला मारतांना स्वतः अशक्त असल्यामुळें जो नाश पावतो तो (७९) आपल्या २१ पिढ्यांसह तात्काल मुक्त होतो. शिवाकरितां किंवा शिवभक्ताकरितां, (८०) शिवाचाराकरितां किंवा शिव विद्येकरितां जो प्राणदान करितो त्याच्या सारखा मुक्तिमार्गाचा आश्रय केलेला दुसरा कोणीच नर नाहीं. वीरभद्रीयांत सांगतात कीं, (८१) त्रैलोक्यां-तील सर्व प्राण्यांना काळजीपूर्वक मारूं नये परंतु शिवकार्यांत जो प्रतिकूल आहे त्यास तात्काल ठार मारावें. वातुलतंत्रांत सांगितलें आहे कीं, (८२) शिवनिंदा-प्रचुर भाषण ऐकिल्याबरोबर त्या बोलणाराचें तोंड फोडावें व शक्ति नसेल तर दुसरीकडे निघून जावें, किंवा कान झाकावें. (८३) शिवद्रव्यापहार करण्याकरितां

ति मनुजाधमः ॥ हत्वा तन्मरणं कुर्यात्तन्मर्दनपरो भवेत् ॥८३॥ शिवचिन्हे वृषं चैव हन्याद्यो दुर्जनो नरः ॥ तस्य हंता सह स्वेन वीरमाहेश्वरो व्रती ॥८४॥ शिवात्मविषये कुर्यादपराधं कदाचन ॥ शिवालये शिवग्रामे शिवारामादिरक्षणे ॥ तत्कार्यमनिशं कुर्याद्धन्यात्तदपहारिणम् ॥८५॥ सौरे ॥ शिवनिंदाकरं दृष्ट्वा घातयेत्तं प्रयत्नतः ॥ हत्वाऽऽत्मानं पुनर्यस्तु स याति परमां गतिम् ॥८६॥ वातुलतंत्रे ॥ शिवकिंकरभूतोऽहमिति नित्यं तु भावयेत् ॥ तत्कार्यं सकलं कुर्यान्मत्कर्तव्यमिति ब्रुवन् ॥८७॥ वीराचारः ॥ वीरभद्रीये ॥ षडध्वशुद्धिं विधिवत्प्राप्तो ना म्रियते यदि ॥ पशूनामिव तस्येह न कुर्यादौर्ध्वदेहिकम् ॥८८॥ नैवाशौचं प्रकुर्वीत तत्पुत्राद्यैर्विशेषतः ॥ खनेद्वा भुवि तद्देहं दहेद्वाशुचिनाग्निना ॥८९॥ क्षिपेद्वाप्सु महासेन त्यजेद्वा काष्ठलोष्टवत् ॥ अथैनमपि चोद्दिश्य कर्म चेत्कर्तुमीप्सितम् ॥९०॥ कल्याणमेव कुर्वीत भक्त्या भक्तांश्च तर्पयेत् ॥ जितेंद्रियात्मा सततं त्यक्त्वात्मक्रोधनं शुभे ॥९१॥ द्यूतं च परिवादं च स्त्रीद्रोहालोचनं तथा ॥ गंधमाल्यं रसं तक्रं

---

जाणाऱ्या अधम मनुष्यास ठार मारून त्याचें मर्दन करावें. (८४) शिवचिन्ह किंवा बैल यांचा जो दुर्जन घात करील त्याचें वीरमाहेश्वरव्रतीनें स्वतः हनन करावें. (८५) शिवात्म्यासंबंधानें केव्हांही अपराध करूं नये. शिवालय, शिवग्राम, शिवाचा बगीचा इत्यादींचें रक्षण करण्यांत नेहमीं कार्य करीत असावें. त्यांचा अपहार करणाऱ्यास शिक्षा करावी सौरांत सांगितलें आहे कीं, (८६) शिवनिंदा करणारा दिसला कीं, त्यास प्रयत्नपूर्वक शिक्षा करावी व असें न करितां आल्यास जो आपला घात करून घेईल त्यास उत्तम गति प्राप्त होते. वातुलतंत्रांत सांगितलें आहे कीं, (८७) आपण शिवाचे सेवक अहों असें नित्य मानावें. आपलें कर्तव्य आहे असें ह्मणून सर्व शिवकार्य करीत असावें. (८८) वीरभद्रीयांत वीराचार सांगितला आहे कीं, विधिवत् षडध्वसिद्धि प्राप्त झालेला मनुष्य मरण पावला तर पशूप्रमाणें त्याचें और्ध्वदेहिक करूं नये. (८९) त्याच्या पुत्रांनीं वगैरे विशेषतः त्याचें अशौच पाळूं नये. त्याचा देह जमिनींत गाडून टाकावा, किंवा शुद्ध अग्नीनें दहन करावा, (९०) किंवा हे षडानना, पाण्यांत फेंकून द्यावा किंवा मृत्काष्ठाप्रमाणें फेंकून द्यावा. ह्या मृताला उद्देशून कर्त्याच्या मनांत कर्म करणें असेल तर, (९१) भक्तीनें शुभकर्म करावें व भक्तांस तृप्त करावें. क्रोध सोडून नेहमीं जितेंद्रिय राहावें. (९२) तसेंच द्यूत, निंदा, दुष्ट हेतूनें स्त्रीकडे पाहणें, व

सर्वं पर्युषितं त्यजेत् ॥ सर्वभूतानुकंपी स्यात् संविभागरतः सदा ॥९२॥ परिवादं मृषावादं निद्रालस्यं विवर्जयेत् ॥ मानं मदं तथा शोकं द्वेषं च परिवर्जयेत् ।।९३॥ चिंतयन्नक्षरात्मानं शयानं योगनिद्रया ॥ भिन्नासनं भिन्नशय्यां वर्जयेद्भिन्नभाजनम् ॥९४॥ शिरोभ्यंगावशिष्टेन तैलेनांगं न लेपयेत् ।। न सर्पशस्त्रैः क्रीडेत स्वान्यंगानि न संस्पृशेत् ।।९५॥ न संहताभ्यां पाणिभ्यां कंडूयेदात्मनस्तनुम् ॥ न वामहस्तेनोध्द्वत्य पिबेद्वक्त्रेण वा जलम् ।।९६॥ सौरे ॥ शुक्लांबरधरो नित्यं सुगंधिप्रियदर्शनः ॥ न जीर्णवस्त्रं त्रुटितं परिदध्यात्कदाचन ॥९७॥ सोमशंभौ ॥ प्रातरुत्थाय संचिंत्य शिवाय शिवमक्षरम् ॥ उत्सृजेन्मलमूत्रादि गत्वा देशं यथोचितम् ॥९८॥ शिवधर्मे ॥ भूप्रदेशे यथोक्ते तु स्वदेहमलमूत्रके ॥ विसर्जयेन्न चान्यत्र रुद्रालयसमीपतः ॥९९॥ सोमशंभौ ॥ उत्तराभिमुखो भूत्वा दिवा संध्यासु सर्वदा ॥ दक्षिणाभिमुखो रात्रौ नासाग्रव्यग्रलोचनः ॥१००॥ ततस्तृणैश्च यज्ञांगैर्मृदा लोष्टेन

---

सुवासिक फूल, रसपदार्थ, ताक वगैरे सर्व शिळे पदार्थ वर्ज्य करावेत. सर्व भूतांवर दया करून नित्य संविभागी असावें. (९३) निंदा, मिथ्या भाषण, निद्रा, आलस्य, मान, मद तसेंच शोक व द्वेष हीं सोडावीत. (९४) अक्षय आत्म्याचें चिंतन करून योगनिद्रेनें शयन करावें. भिन्नासन, भिन्नशय्या तसेंच फुटकें भांडें हीं वर्जावीत. (९५) डोक्यास लावून राहिलेलें तेल अंगास लावूं नये. सर्प व शस्त्र यांशीं खेळूं नये, व आपल्या अंगास स्पर्श करूं नये. (९६) युक्त हातांनीं आपलें शरीर खाजवूं नये. डाव्या हातानें किंवा तोंडानेंच पाणी पिऊं नये. सौरांत सांगतात कीं, (९७) पांढरें शुभ्र वस्त्र परिधान करावें व सुगंधानें आपलें शरीर मोहक ठेवावें; जुनें, फाटकें वस्त्र कधींहि परिधान करूं नये. सोमशंभूंत सांगतात कीं, (९८) सकाळीं उठून अक्षय अशा शंकराचें कल्याणार्थ ध्यान करावें व योग्य प्रदेशीं जाऊन मलमूत्र विसर्जन करावें. शिवधर्मीत सांगतात कीं, (९९) यथोक्त भूमिभागीं आपलें मलमूत्र विसर्जन करावें; शंकर देवालयाच्या आसमंताद्भागीं विसर्जन करूं नये. सोमशंभूंत सांगतात कीं, (१००) दिवसा व उभयसंध्यासमयीं उत्तराभिमुख होऊन मल विसर्जन करावें; व रात्रीं दक्षिणाभिमुख होऊन व नासाग्र दृष्टि ठेवून मल विसर्जन करावें. (१०१) नंतर गवत, यज्ञांगद्रव्यें, मातीचीं ढेंकळें, शेण, दगड, लांकूड यांनीं मलद्वार पुसून काढूं नये तर

वा गुदम् ॥ न तु गोमयपाषाणैर्दारुभिश्च कदाचन ॥१०१॥ विशुद्धां मृदमादाय तां निधाय जलांतिके ॥ ततः समुध्दतैस्तोयैर्विशुद्धैः शौचमाचरेत् ॥१०२॥ अथ वा भावसंशुद्धिपर्यंतं शौचमाचरेत् ॥ भावोऽपि भविता शुद्धिः शुद्धये मुनिभिर्मतः ॥१०३॥ आचमेद्विधिवद्देहं दंतधावनमाचरेत् ॥ न ततो मुखसंशुद्धिर्दंतानां धावनं विना ॥ शौचं च मृज्जलैः कुर्याद्गंधलेपविमोचनम् ॥१०४॥ सौरे ॥ शौचं पश्चात्प्रकुर्वीत गंधलेपक्षयावधि ॥ अंतरं च मनःशुद्धिर्यथा भवति तद्विजाः ॥१०५॥ गंधलेपविहीनोऽपि भावशुद्धो विशुध्यति ॥ भावशुद्धो भवेच्छुद्धिः शुद्धभावस्ततो भवेत् ॥१०६॥ असंस्कारो भवेन्मर्त्यो यो यस्यांगे मलं वसेत् ॥ तस्मान्न संस्पृशेल्लिंगं नरो मालिन्यदूषितः ॥१०७॥ सोमशंभौ ॥ गंडूषैः सूर्यसंख्यातैर्विधाय स्नानमाचरेत् ॥ शौचमाभ्यंतरं विद्यान्न वाह्यं शौचमुच्यते ॥ अंतःशौचविमुक्तात्मा शुचिरप्यशुचिर्यतः ॥१०८॥ शिवधर्मे ॥ उदकुंभसहस्रैश्च मृदाढकशतैरपि ॥ अपि वर्षसहस्राणि क्षाल्यमानो न शुध्यति ॥१०९॥ भावपूतं भवेच्छौचं वस्त्र-

---

(१०२) शुद्ध माती घेऊन ती पाण्याजवळ ठेवून नंतर शुद्ध पाणी वर घेऊन शुद्धि करावी. (१०३) किंवा मनाची शुद्धि होईपर्यंत शुद्धि करावी. शुद्धि झाली असें वाटणें यासच ऋषींनीं शुद्धि असें मानिलें आहे. (१०४) मनुष्यानें विधिवत् आचमन करावें. दंतधावन करावें, दन्तधावन ( दांत घांसणें ) केल्याशिवाय मुखशुद्धि होत नाहीं. गंधलेप जाईपर्यंत मातीनें व पाण्यानें शौच आचरावें सौरांत सांगतात कीं (१०५) नंतर गंधलेपक्षय होईपर्यंत धूत असावें हे द्विजहो मनःशुद्धि होईपर्यंत शौच करावें. (१०६) गंधलेपक्षय न होतां भावशुद्धि झाली तर तो शुद्ध होतो. भावशुद्धीनें शुद्ध होतो. नंतर शुद्ध भाव होतो. (१०७) जो मनुष्य मलीन आहे तो संस्कारास योग्य नाहीं. ह्मणून मलदूषित मनुष्यानें लिंगास स्पर्श करूं नये. सोमशंभूमध्यें सांगतात कीं, (१०८) बारा वेळ चूळ भरून स्नान करावें. शौच दोन प्रकारचें आहे; अभ्यंतर व बाह्य, ज्याचें अंतःशौच झालें नाहीं तो शुचि असूनही अशुचि समजावा. शिवधर्मांत सांगतात, (१०९) हजारो घडे पाणी व शंभर टोपल्या माती ही घेऊन हजारो वर्षें गुद प्रक्षालन करीत राहिला तरी तो शुद्ध होत नाहीं, (११०) भावपूत जें शौच तें शौच, वस्त्रपूत जें जल तें शुद्ध जल, दृष्टीनें पूत झालेल्या जागेवर पाऊल टाकावें, व सत्यानें पूत झालेलें भाषण

पूतं जलं शुचि ॥ दृष्टिपूतं न्यसेत्पादं सत्यपूतं वचो वदेत् ॥११०॥ सदाचारः ॥ सदाचारं प्रवक्ष्यामि सम्यक् ज्ञानस्य साधनं ॥ यस्मादाचारहीनस्य सर्वदोषाश्रयः स्मृतः ॥१११॥ सत्यं च वैदिकाद्विद्धि नान्यमार्गाश्रितं शुभे॥यत्प्रोक्तं वैदिकैः शास्त्रैस्तत्सदाचार उच्यते॥११२॥ आचारः परमो धर्म आचारः परमो धनं ॥ आचारः परमा विद्या आचारः परमा गतिः ॥११३॥ सदाचारेण देवत्वं ऋषित्वं च वरानने ॥ उपागताः कुयोनित्वं मनुष्यास्तद्विपर्यये ॥ ११४ ॥ आचारहीनः पुरुषो लोके भवति निंदितः ॥ स मया निंदितो लोके लोकरूपधरो ह्यहं॥११५॥ ज्ञानमाचरहीनेषु सर्वदैव समन्वितं ॥ दुष्टचंडालभांडेषु यथा भागीरथीजलं ॥ अनाचारयुतः कष्टः सर्वदोषसमाश्रयः ॥ ११६ ॥ शिवस्थाने क्वचित्साक्षात्सर्वदोषविवर्जितः ॥ यस्मात्सन्यस्तपुरुषः स सम्यग्वृत्तिमान् भवेत् ॥११७॥ वर्णाश्रमविधानोक्तं धर्मं कुर्वीत यत्नतः ॥ यस्य यद्विहितं कर्म तत्कुर्वन्नपि यः सदा॥११८॥ परदारान् परद्रव्यपरनिंदाश्च सर्वदा ॥ क्वचिद्वापि न कुर्वंति वाचा च मनसा तथा ॥११९॥ विभीत·

---

बोलावें. आतां सदाचार सांगतात. (१११) योग्य ज्ञानाचें साधन जो सदाचार तो आतां सांगतों. कारण जो आचाररहित आहे त्याचे ठिकाणीं सर्व दोष आश्रय करून राहतात. (११२) हे पार्वति, सत्य वैदिकांतून जाणावें दुसऱ्या कोणत्याहि मार्गाला तें धरून राहत नाहीं. वैदिकशास्त्रांनीं सांगितला आहे तोच सदाचार होय. (११३) आचार ह्मणजे उत्तम धर्म, उत्तम धन, उत्तम विद्या, व उत्तम गति हीं होत. (११४) हे सुंदरि, सदाचारानें मनुष्यें देवपणा किंवा ऋषित्व पावतात व त्याचाच विपर्यास झाला कीं दुष्ट योनीप्रत जातात. (११५) आचारहीन पुरुष लोकांत निंदित होतो. लोकांत तो माझ्याकडून निंदिला जातो; मी लोकस्वरूप आहें. (११६) आचारहीन मनुष्यांच्या ठिकाणीं ज्ञान, दुष्ट चांडालाच्या भांड्यांतील भागीरथीजलाप्रमाणें होय. अनाचारयुक्त मनुष्यास सर्व दोष चिकटून असतात. (११७) शिवस्थानीं तो क्वचित् दोषरहित असतो. ह्मणून संन्यासी पुरुष योग्य वृत्तीचा असतो. (११८) वर्ण व आश्रम यांच्या विधानांत सांगितलेला धर्म यत्नानें आचरावा. ज्याला जें कर्म सांगितलें आहे त्यानें तें नेहमीं करावें. (११९) परदारागमन, परद्रव्यहरण, परनिंदा कधींहि वाणीनें किंवा मनानें करूं नये. (१२०) विभीतक, अर्क ( रुई ), कैरंड, स्नुहि ह्यां वृक्षांच्या छायेचा

काकैरंडस्नुहीच्छायां च नाश्रयेत् ॥ एको न गच्छेदध्वानं बाहुभ्यां न तरेन्नदीम् ॥१२०॥ नावरोहेत कूपादीन्नारोहेद्वृक्षपर्वतान् ॥ अग्निना न दहेत्पादावग्निं पद्भ्यां न लंघयेत् ॥१२१॥ नानयेदग्निमुध्दृत्य नाग्नौ किंचिन्मलं त्यजेत् ॥ न नखाग्रैर्जलं सिंचेद्धौतवस्त्रांचलेन च ॥१२२॥ अजश्वानखरोष्ट्राणां मार्जारस्य च स्पर्शनम् ॥ पुण्यं पुराकृतं नृणां श्रियं हंति हरेरपि ॥१२३॥ मार्जनीशूर्पवातौ च चर्मानिलमुखानिलौ ॥ सकृदायुर्हरंत्येते संस्पृष्ट्वा पुरुषस्य तु ॥१२४॥ कौशेयं पादपं वाथ चार्मं चैलमथापि वा॥ दारवं तालपर्णं वा आसनं परिकल्पयेत्॥१२५॥ अथ स्नानम् ॥ सोमशंभौ ॥ वापीकूपतडागेषु गृहे वा स्नानमुत्तमम्॥ कपोतकुक्कुटश्वानकाककंकखरादिभिः ॥१२६॥ ग्रामसूकरगृध्रोष्ट्रैर्न दृश्यः स्पृश्य एव वा ॥ श्मशानपतितप्रेतस्पर्शने लिंगसंयुतैः ॥१२७॥ कृते यदि प्रमादाच्च विना स्नानान्न शुध्यति ॥ तथा ह्यलिंगिभिः स्पृष्टो वारुणं स्नानमाचरेत् ॥१२८॥ शुक्रविण्मूत्रसंपर्के नाभेरूर्ध्वं करौ विना ॥

---

आश्रय करूं नये. एकटें प्रवासास जाऊं नये, भुजांनीं नदी तरून जाऊं नये. (१२१) कूपांत वगैरे उतरूं नये; वृक्ष किंवा पर्वत ह्यांवर चढूं नये, अग्नीनें पाय शेकूं नयेत किंवा पायांनीं अग्नीचें उल्लंघन करूं नये. (१२२) अग्नि वर धरून आणूं नये किंवा अग्नींत कांहीं मल टाकूं नये. नखाग्रानें कशावरहि पाणी शिंपडूं नये, किंवा धुतलेल्या वस्त्राच्या आंचळ्यांचें पाणी कोणावर पाडूं नये. (१२३) बोकड, कुत्रें, गाढव, उंट, मांजर यांचा मनुष्यास स्पर्श झाला असतां त्याचें पूर्वीं केलेलें पुण्य नष्ट होतें. त्यांचा स्पर्श झाला असतां विष्णूची लक्ष्मी देखील नाश पावते मग मनुष्याची काय कथा? (१२४) केरसुणी, सूप, चर्म, मुख यांचा वारा पुरुषास लागला असतां एकदम आयुष्य क्षीण होतें. (१२५) रेशमाचें, वृक्षाचें, चामड्याचें, वस्त्राचें, लांकडाचें, तालपर्णाचें, आसन तयार करावें. नंतर स्नानाविषयीं सांगतात; सोमशंभु ग्रन्थांत सांगितलें आहे कीं, (१२६) वापी (विहीर), आड ( कुवा ), तळें, ह्यांत किंवा घरांत स्नान करणें उत्तम; स्नानसमयीं कपोत, कोंबडा, श्वान, काक, कंक ( गरुडपक्षिजाति ), गाढव, (१२७–१२८) डुकर, गिधाड, उंट यांस पाहूं नये किंवा स्पर्श करूं नये. श्मशानांतील प्रेतास लिंगवंतांनीं चुकून स्पर्श केला तर त्यांस स्नानाविना शुद्धि होत नाहीं. त्याचप्रमाणें त्यांस अलिंगी लोकांचा स्पर्श झाल्यास त्यांनीं जलस्नान करावें. (१२९) शुक्र ( रेत ), विष्ठा, मूत्र यांचा हातांशिवाय

वपने वमने स्वप्ने चावगाहेन शुध्यति ॥१२९॥ आदौ तु विधिशुद्धेन संहितामंत्रितेन च॥ निवृत्यादिविधानेन भस्मना स्नानमाचरेत्॥१३०॥ योऽस्नानश्चान्नमश्नाति सो हि वै पापवत्तरः ॥ तस्मात् स्नात्वा तु भुंजीत भस्मना सलिलेन वा ॥१३१॥ प्रातः स्नात्वांभसा गच्छेद्भस्मना च शिवं पदम् ॥ आग्नेयं भस्मना स्नानं वायव्यं रजसा गवाम् ॥१३२॥ दिव्यं सातपवर्षेण कंठस्नानमनुत्तमम् ॥ गौरवं गुरुपादोदान्मानसं स्नानमुत्तमम् ॥१३३॥ अथ भविसंकरदोषः ॥ यो लिंगं द्वेष्टि संमोहादन्यदेवनमस्कृतः ॥ नरो नरकगामी स्यात्तस्य संभाषणादपि ॥१३४॥ लिंगसारे ॥ मृगयुर्मद्यपो वेश्या बहुदैवतदूषकः ॥ तत्संभाषणतो नित्यं न लिंगी च तथा भवेत् ॥१३५॥ एकपादपुराणे ॥ ये निंदंति शिवं शास्त्रं गुरुं चैव तपस्विनम् ॥ तेषां भोजनदानेन दाता च नरकं व्रजेत् ॥१३६॥ कालिकाखंडे ॥ ब्राह्मणोऽपि चतुर्वेदी रुद्रभक्ति-

---

नाभीच्यावर संपर्क झाला तर स्नान करावें, तसेंच वपन, वांति किंवा दुष्ट स्वप्न हीं घडलीं असतां सचेल स्नानानें शुद्धि करावी. (१३०) प्रथमतः निवृत्यादि विधानानें विधिपूर्वक शुद्ध केलेल्या व संहितामंत्रानें मंत्रित केलेल्या भस्मानें भस्मस्नान करावें. (१३१) स्नान केल्यावांचून जो अन्न भक्षण करितो तो पापी होय. ह्मणून भस्मानें किंवा पाण्यानें स्नान करून भोजन करावें. (१३२) प्रातःकाळीं जलस्नान करून भस्म लावून शिवचिंतन करावें. भस्मानें स्नान केल्यास त्यास आग्नेयस्नान ह्मणतात, गायींच्या अंगावरील धुळीनें स्नान केल्यास त्यास वायव्यस्नान (१३३) व ऊन व पाऊस यांनीं स्नान केलें तर त्यास दिव्यस्नान ह्मणतात. कंठस्नान करणें उत्तम नव्हे. गुरुपादोदकानें स्नान करणें त्यास गौरवस्नान ह्मणतात, त्याहून मानसस्नान उत्तम; भविसंकरदोषाविषयीं सांगतात (१३४) संमोहानें जो लिंगाचा द्वेष करितो किंवा अन्य देवतेस नमस्कार करितो; त्याजबरोबर संभाषण करणारा मनुष्य नरकास जातो. लिंगसारांत सांगतात कीं, (१३५) शिकार करणारा, मद्यपी ( दारूबाज ), वेश्या व बहु दैवत यांनीं दूषित झालेला यांशीं नित्य संभाषण करणारा तो लिंगधारी होत नाहीं. एकपादपुराणांत सांगितलें आहे कीं, (१३६) जे शिवाची, शास्त्राची, गुरूची, तपस्व्याची निंदा करितात त्यांस भोजनदान करणारा नरकास जातो. कालिकाखंडांत सांगितलें आहे कीं, (१३७) चारी वेद पढलेला ब्राह्मण असून जर तो शिवभक्त नसेल तर जसें दुष्टांस रत्न देऊं नये तसें

विवर्जितः॥ तस्य दानं न दातव्यं न रत्नं हि खलैर्यथा ॥१३७॥ सौरे॥ अपूज्यपूजनेनैव पूज्यानां चाप्यपूजनात् ॥ नरः पापमवाप्नोति महद्वै नात्र संशयः ॥१३८॥ शिवभक्तमतिक्रम्य यच्चान्यस्मै प्रदीयते ॥ निष्फलं तद्भवेद्दानं नरकं च प्रपद्यते ॥१३९॥ वीरभद्रीये ॥ कवाटार्गलकं बध्वा यजेद्देवं त्रियंबकम् ॥ अर्चनादिक्रियाकाले प्रच्छन्नं पटमुत्तमम्॥ पापी कोपी परिभ्रष्टो नास्तिको वेदनिंदकः ॥१४०॥ दुर्मुखश्च दुराचारो मूर्खः स्वगुरुनिंदकः ॥ एतेषां स्पर्शनं कृत्वा पूजनं निष्फलं भवेत् ॥१४१॥

लिंगाचारः सदाचारो भृत्याचारस्तथैव च ॥ शिवाचारो गणाचारः सर्वे श्रुतिषु दुर्लभाः ॥१४२॥ पंचाचारा माहात्मानो लिंगसारेषु सज्जनाः ॥ सर्वलोकेषु सूक्ष्मायां सुलभो गणमुख्यकृत् ॥१४३॥ उत्तमां वृत्तिमाश्रित्य नीचां वृत्तिं समाश्रितः ॥ आरूढपतितो ज्ञेयः सर्वकर्मबहिष्कृतः ॥१४४॥ विशुद्धभावनायुक्तः शिवैकगतमानसः ॥ विशुद्धमाप्नुयात्स्थानमचिंत्यं सर्वगं ध्रुवम् ॥१४५॥ वीरभद्रीये॥ पतिव्रतास्वभावेन विहाय परदेवताः ॥ शिवमेकं भजेद्भक्त्या सर्वशांतिकरं

---

त्यास दान देऊं नये. सौरांत सांगतात कीं, (१३८) अपूज्यांची पूजा केल्यानें किंवा पूज्यांची पूजा न केल्यानें मनुष्य मोठा पापी होतो यांत संशय नाहीं.(१३९) शिवभक्तांस सांडून जें दान दुसऱ्यास दिलें जातें तें निष्फल होतें व दात्याला नरकप्राप्ति होते. वीरभद्रीयग्रंथांत सांगितलें आहे कीं,(१४०) दार व अडसर लावून शिवाची पूजा करावी व पूजाकालीं उत्तम वस्त्रानें आपणास झांकून घ्यावें. कारण पापी, क्रोधी, भ्रष्ट, नास्तिक, वेदनिंदक(१४१) दुर्मुख, दुराचारी, मूर्ख, स्वगुरुनिंदक ह्यांचा स्पर्श झाल्यास पूजा निष्फल होते.

(१४२) लिंगाचार, सदाचार, भृत्याचार तसेंच शिवाचार, गणाचार हे श्रुतीमध्यें दुर्लभ आहेत. (१४३-१४४) उत्तम वृत्तीचा आश्रय करून पुनः नीचवृत्तीचा आश्रय केला तर तो सर्वकर्मबहिष्कृत होऊन आरूढामध्यें पतित होतो असें जाणावें. (१४५) शुद्ध भावनायुक्त व शिवाच्या ठिकाणीं एकाग्र मन लावलेल्या भक्तास विशुद्ध, अचिंत्य, सर्वगामि अक्षय असें स्थान प्राप्त होतें. वीरभद्रीयग्रंथांत सांगतात कीं, (१४६) पतिव्रता स्त्रीप्रमाणें शिवेतर देवतांचा त्याग करून सर्व शांतिदायक व उत्तम अशा एका शंकराची आराधना भक्तीनें करावी.

परम् ॥१४६॥ शिवरहस्ये ॥ नान्यदेवमभिध्याये नान्यदेवं प्रपूजये ॥ नान्यस्य नाम गृण्हामि चैतद्धीरव्रतं मम ॥१४७॥ अपि कीटः पतंगो वा भवेयं शंकराज्ञया ॥ न तु शक्र त्वया दत्तं त्रैलोक्यमपि कांक्षये ॥१४८॥ वृ० ॥ न नाकपृष्ठं न च देवराज्यं न ब्रह्मलोकं न च विष्णुलोकम् ॥ न धर्मकामानखिलान् वृणोमि हरस्य दासत्वमहं वृणोमि ॥१४९॥ अतो वरमहं मन्ये निधनं वापि शंकरात् ॥ म्रियमाणो जनः शक्र यथेष्टं न त्यजेत्पतिम् ॥१५०॥ शिवधर्मे ॥ शिवमेकं परित्यज्य योऽन्यदेवमुपासते ॥ तृषितो जान्हवीतीरे कूपं खनति दुर्मतिः ॥१५१॥ कालिकाखंडे ॥ अथ रुद्रनमस्कारः सर्वकर्महरो ध्रुवम् ॥ अन्यदेवनमस्कारो न तत्फलमवाप्नुयात् ॥१५२॥ अपूज्यपूजने चैव पूज्यानां चाप्यपूजनात् ॥ नरः पापमवाप्नोति महादेव न संशयः ॥१५३॥ सौरे ॥ यस्तु लिंगार्चनं त्यक्त्वा देवानन्यांश्च पूजयेत् ॥ रत्नं विहाय मूढात्मा यथा काचमपेक्षते ॥१५४॥ ब्रह्मगीतायाम् ॥ विष्णुभक्त्या च मद्भक्त्या नास्ति नास्ति परा गतिः ॥ शंभुभक्त्यैव सर्वेषां सत्यमेव म-

---

शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, (१४७) अन्य देवांचें मी ध्यान करीत नाहीं, पूजन करीत नाहीं, नामग्रहण करीत नाहीं. हेंच माझें वीरव्रत आहे. (१४८) शंकराच्या आज्ञेनें मी कीटक किंवा पतंग झालों तरी बेहेत्तर, परंतु हे इंद्रा दिलेल्या त्रैलोक्याचीहि मला इच्छा नाहीं. (१४९) स्वर्ग नको, देवांचें राज्य नको, ब्रह्मलोक नको, किंवा विष्णुलोकही नको किंवा धर्मकार्य फलांचीहि मला इच्छा नाहीं तर मी केवल शिवदास्याची अपेक्षा करितों. (१५०) ह्मणून शिवाकडून मरण आलें तरी मला इष्ट आहे. कारण मरण आलें असतांहि मनुष्यानें शिवाचा त्याग करूं नये. शिवधर्मांत (१५१) एका शिवाला सांडून जो इतर देवतेची उपासना करितो तो मूर्ख तहान लागली असतां गंगाजळाचा धिःकार करून विहिर खोदतो असें समजावें. कालिकाखंडांत सांगतात कीं (१५२) खरोखर शिवनमन सर्वकर्मसंहारक आहे. इतर देवतेस केलेल्या नमस्कारास तें फल मिळत नाहीं. (१५३) अपूज्यांची पूजा करणें व पूज्यांची पूजा न करणें या योगें हे महादेवा, मनुष्य खरोखर पापी होतो. सौरपुराणांत सांगतात कीं (१५४) लिंगार्चन सोडून जो दुसऱ्या दैवतांची पूजा करितो तो मूढ मनुष्य रत्न सांडून कांचमण्याची अपेक्षा करितो असें समजावें. ब्रह्मगीतेंत सांगतात कीं, (१५५) विष्णुभक्तीनें किंवा माझ्या भक्तीनें श्रेष्ठगति लाभत नाहीं. तर ती शिवभक्तीनेंच सर्वांस प्राप्त होते.

योदितम् ॥१५५॥ विष्णोरपि परं तत्त्वं महादेवं घृणानिधिम् ॥ विना जंतुः समभ्यर्च्य मुच्यते न हि सत्तमाः ॥१५६॥ शिवपूजापरो भूत्वा योऽन्यदेवमनुस्मरेत् ॥ अष्टाविंशतिकोटींस्तु नरकान्यात्यसौ ध्रुवम् ॥ १५७ ॥ जाबालस्मृतौ ॥ शंभोर्निर्माल्यसंशुद्धं भुंजीयात्सर्वदा द्विजः ॥ अन्यदेवस्य नैवेद्यं भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥१५८॥ लिंगसारे ॥ लिंगार्चनैकशरणो योऽन्यदेवं नमस्यति ॥ नरकं नायकं गत्वा शुनीगर्भेषु जायते ॥ १५९ ॥ लिंगार्चनैकशरणो योन्यदेवं तु मन्यते ॥ नरकं नायकं गत्वा कुष्ठी पंगुश्च जायते ॥ १६० ॥ लिंगार्चनैकशरणो योन्यदेवं तु वंदते ॥ नरकं नायकं गत्वा त्रिदोषी च प्रजायते ॥१६१॥ सौरे ॥ केचिद्विष्णुं प्रशंसति ब्रह्माणं च तथा परे ॥ रुद्रमन्ये प्रशंसंति ऋषयो दग्धकिल्बिषाः ॥१६२॥ वीरभद्रीये ॥ देवान् सर्वान् परित्यज्य पूजयेदिंदुशेखरम् ॥ न मुख्यं परिगृह्याथ लोकधर्मं समाचरेत् ॥ नान्यशास्त्रं समादिष्टं न चान्यां देवतां स्मरेत् ॥ १६३ ॥ शिवज्ञानविद्यायाम् ॥

---

असें मी प्रतिज्ञेनें सांगतों. (१५६) विष्णूहून श्रेष्ठ तत्त्व असा जो दयानिधि महादेव त्याला सोडून हे सज्जनश्रेष्ठहो, प्राण्यानें अन्य देवतेचें अर्चन केल्यास तो मुक्त होत नाहीं. (१५७) शिवपूजासक्त होऊन जो अन्य देवतेचें स्मरण करील तो निःसंशय २८ कोटि वर्षें नरकांत वास्तव्य करील. जाबाल स्मृतींत सांगतात कीं, (१५८) सर्वदा ब्राह्मणानें शुद्ध शंकराचें निर्माल्य भक्षण करावें, अन्य देवतेचा नैवेद्य भक्षण केल्यास चांद्रायणव्रताचरण करावें. लिंगसारग्रंथांत सांगतात कीं, (१५९) केवल लिंगार्चनतत्पर मनुष्यानें अन्य देवतेस नमस्कार केल्यास तो भयंकर नरकास जाऊन श्वान योनींत जन्म पावतो. (१६०) केवल लिंगार्चनतत्पर मनुष्यानें अन्य देवतेस मानिलें तर तो भयंकर नरकास जाऊन कुष्ठी व पंगू होतो. (१६१) केवल लिंगार्चनासक्त मनुष्यानें अन्य देवतेस नमन केल्यास तो भयंकर नरकास जाऊन त्रिदोषी जन्मतो. सौरांत सांगतात कीं, (१६२) कांहीं ऋषी विष्णूची प्रशंसा करितात. कांहीं ब्रह्माची प्रशंसा करितात. व दुसरे कांहीं निष्पाप ऋषी शंकराची प्रशंसा करितात. वीरभद्रीयग्रंथांत सांगतात कीं. (१६३) सर्व देवांचा त्याग करून चंद्रमौलि शंकराची पूजा करावी. लोकधर्म मुख्य आहे असें समजून आचार करूं नये तर शिवसेवाच मुख्य आहे असें समजावें. दुसरें शास्त्र सांगितलेलें नाहीं व अन्य देवतेचें स्मरण करूं नये. शिवज्ञानविद्येंत सांगितलें आहे कीं,—

ईश्वर उवाच ॥ सदाचारं प्रवक्ष्यामि सम्यग्ज्ञानस्य साधनम् ॥ यस्मादाचारहीनस्य ज्ञानं निष्फलतां व्रजेत् ॥१६४॥ सदाचारेण देवत्वं ऋषित्वं च वरानने ॥ उपागताः कुयोनित्वं मनुष्यास्तद्विपर्यये ॥१६५॥ आचारहीनः पुरुषो लोके भवति निंदितः ॥ मया च निंदितो देवि लोकरूपधरो ह्यहम् ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन सम्यगाचारवान् भवेत् ॥ ॥१६६॥ वातुलतंत्रे ॥ सती सुतश्च भृत्यश्च दासी गोपस्तथैव च ॥ सर्वे लिंगार्चकाः श्रेष्ठास्त्वन्यश्चंडालवद्भवेत् ॥१६७॥ यः शिवाचारसंपन्नो ह्यनाचारेण मिश्रितः ॥ न प्रसादी न चाचारी सर्वभक्षीव वायसः ॥ ॥१६८॥ गृहक्षेत्रं च बीजं च धान्यानि च धनानि गौः ॥ एतल्लिंगांकितं शुद्धमन्यथा नरकं व्रजेत् ॥१६९॥ रहस्ये ॥ भक्तहस्तगतं द्रव्यं धनं वस्त्रं विभूषणम्॥ नंदिमुद्रांकितं ग्राह्यं द्रव्यशुद्धिरिहोच्यते॥१७०॥ नंदिमुद्रांकितं क्षेत्रं युक्तं शिवशरण्यकैः ॥ तदेव पावनं क्षेत्रं क्षेत्रसिद्धिरिहोच्यते ॥१७१॥ रात्रौ मध्यमयामेषु सुप्तेष्वखिलजंतुषु ॥ प्रौढप्रसादभोगश्च कालशुद्धिरिहोच्यते ॥१७२॥ जलपाकक्रियायां च भांडशुद्धिरिहोच्यते ॥ अभक्तदर्शनाभावात्पक्कमन्नं वरानने ॥१७३॥ शाकं

---

ईश्वर ह्मणतात, (१६४) सत्यज्ञानप्राप्त्यर्थ मी सदाचार सांगतों, कारण आचारहीन मनुष्याचें ज्ञान निष्फल होतें. (१६५) हे सुंदरि, मनुष्यें सदाचारानें देव व ऋषी झालीं व दुराचारानें दुष्ट योनीप्रत गेलीं आहेत. (१६६) आचारहीन पुरुष लोकांत निंदित होतो. व हे देवि, तो माझ्याकडूनच निंदित होतो. कारण मी लोकस्वरूप आहे. ह्याकरितां मनुष्यानें प्रयत्नपूर्वक योग्य आचारवंत झालें पाहिजे. वातुलतंत्रांत सांगतात कीं, (१६७) बायको, मुलगा, चाकर, दासी, तसेंच गोपाल हीं सर्व लिंगपूजक असल्यास श्रेष्ठ; नाहींतर चंडालाप्रमाणें होत. (१६८) जो शिवाचारसंपन्न असून अनाचारयुक्त असतो तो प्रसादी किंवा आचारी नव्हे तर तो कावळ्याप्रमाणें सर्वभक्षी होय. (१६९) गृहक्षेत्र, बीज, धान्य, धन, गुरें हीं लिंगांकित असलीं तर शुद्ध; नाहींतर तीं नरकास जातात. रहस्यग्रंथांत सांगतात कीं, (१७०) भक्ताच्या हातांत गेलेलें द्रव्य ( पदार्थ ), धन, वस्त्र, विभूषण हीं नंदिमुद्रांकित असल्यास ग्राह्य होत यास द्रव्यशुद्धि असें ह्मणतात.(१७१) शिवभक्तांस नंदिमुद्रांकित क्षेत्र योग्य आहे व तेंच पवित्र क्षेत्र ह्यास क्षेत्रसिद्धि असें ह्मणतात. (१७२) मध्य रात्रीस सर्व प्राणी निद्रित असतां प्रौढप्रसादभोग घेणें यास कालशुद्धि असें ह्मणतात. (१७३।१७४) जल, पाक, क्रिया यासंबंधीं

तैलादिकं सर्वं पाकशुद्धिरिहोच्यते॥१७४॥ भक्तेन यत्कृतं वेश्म लिंगमुद्रासमन्वितम् ॥ अभक्तस्पर्शनाभावाद्वेश्मशुद्धिरिहोच्यते ॥१७५॥ लिंगार्चनविधौ भक्तः काष्ठमौनं समाचरेत् ॥ दत्त्वा च भावनां लिंगे भावशुद्धिरिहोच्यते ॥१७६॥ गुरुसंस्कारमाहात्म्यसंप्रदाययुतो भवेत् ॥ अथ वा गर्भसंस्कारे भवशुद्धिरिहोच्यते ॥ १७७ ॥ सर्वभूतदया नित्यं पंचभूतेषु सत्क्रिया ॥ सभूतपोषणो भावो भूतशुद्धिरिहोच्यते ॥१७८॥ समयाराधनं भक्ते धनप्राणाभिमानकैः ॥ त्रिसंध्यमर्चना देवि मार्गशुद्धिरिहोच्यते ॥१७९॥ विनयः सर्वभक्तानां क्रियते हि तया गिरा ॥ तद्वचश्चानुकूल्यं हि नयशुद्धिरिहोच्यते ॥१८०॥ घृतं दधि पयस्तक्रं माक्षिकं वर्जयेत्ततः ॥ तद्वर्जनं भवेद्देवि रसशुद्धिरिहोच्यते॥१८१॥ विभूतिसंस्कृतं काष्ठं भक्तानीतं च सुव्रते ॥ तथैव योग्यं काष्ठेषु काष्ठशुद्धिरिहोच्यते ॥१८२॥ तृणगुल्मलतादीनि भक्तानीतानि चैव हि ॥ संस्कृत्य भस्मना देवि तृणशुद्धिरिहोच्यते ॥१८३॥ भक्तारण्यसमुद्भूतं

---

शुद्धीस भांडशुद्धि असें ह्मणतात. हे सुंदरि अभक्ताचें दर्शन झाल्याविना तेल, भाजी, पाला, वगैरे जें पक्वान्न तयार होतें त्यास पाकशुद्धि असें ह्मणतात.(१७५) भक्तानें तयार केलेल्या लिंगमुद्रांकित घरास अभक्तस्पर्श झाला नसल्यास त्यास गृहशुद्धि असें ह्मणतात. (१७६) लिंगार्चन करीत असतां भक्तानें काष्ठवत् मौनाचरण करावें व लिंगाचे ठायीं भावार्पण झालें असतां त्यास भावशुद्धि असें ह्मणतात. (१७७) गुरूनें संस्काराच्या माहात्म्यसंप्रदायानें युक्त असणें अथवा गर्भसंस्कार करणें यांस भवशुद्धि असें ह्मणतात. (१७८) सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं नित्य दया करणें, पृथिव्यादि पंचभूतांसंबंधीं सदाचार बाळगणें; व जीवमात्रांचें पोषण ( रक्षण ) करणें, ह्यास भूतशुद्धि असें ह्मणतात. (१७९) धन, प्राण, मान, इत्यादींनीं भक्तांची समयोचित आराधना करणें व त्रिकाल पूजन करणें यांस हे देवि मार्गशुद्धि असें ह्मणतात (१८०) मधुरवाणीनें सर्व भक्तांच्या ठिकाणीं विनय दाखविणें व त्यांच्या वचनास अनुकूलता, दर्शविणें ह्यांस नयशुद्धि असें ह्मणतात. (१८१) घृत, दहीं, दूध, ताक, मध हीं वर्ज्य केल्यास त्यास हे देवि रसशुद्धि असें ह्मणतात. (१८२) विभूतीनें संस्कृत केलेलें व भक्तानें आणिलेलें लांकूड हे सदाचारिणी लांकडांत योग्य समजावें यास काष्ठशुद्धि असें ह्मणतात. (१८३) गवत, जाळी, वेली, इत्यादि भक्तांनीं आणिलेलीं व भस्मानें शुद्ध केलेलीं यांस हे देवि तृणशुद्धि असें ह्मणावें. (१८४) भक्ताच्या रानांत उत्पन्न झालेलीं फल, पत्र,

फलं पत्रादिकं समं ॥ स्वहस्तपक्कपूगश्च शुद्धिस्तांबूलिका मता ॥ १८४ ॥ संसाराः षड्विधाः प्रोक्ता जलं पुष्पं फलानि च ॥ पत्रं पात्रं तथा गोत्रं भक्तानां भक्तवत्सल ॥१८५॥ भक्तहस्तभवं कूपं प्रत्यहं तरुणं जलं ॥ भस्ममंत्रपवित्रं च गृहीतं जलसंस्कृतिः ॥१८६॥ नवकुम्भगतं तोयमदृष्टं भविनामपि ॥ तज्जलं लिंगयोग्यं च ह्यन्यत्तद्वर्जयेत्सुधीः ॥१८७॥ अस्पृष्टानि च पुष्पाणि विमुक्तानि शिलीमुखैः ॥ अन्यैरपि च तान्येव पुष्पसंस्कारता मता ॥१८८॥ यानि यानि फलान्येव भक्तहस्तगतानि वै ॥ अभक्तदर्शनाभावात्कथ्यते फलसंस्कृतिः ॥१८९॥ चक्रवर्त्यादिपत्राणि भक्तहस्तभवानि वै ॥ तस्य शाकादिपाकोऽयं कथ्यते पत्रसंस्कृतिः ॥१९०॥ पात्राणि जंगमादीनि तत्पादरजसा शिवे ॥ येनापि पावनं विश्वं कथ्यते पात्रसंस्कृतिः ॥१९१॥ गोत्राणि शिवगोत्राणि तत्र संवन्धकारणम् ॥ भयभक्तिपरा तत्र कथ्यते गोत्रसंस्कृतिः ॥१९२॥ वातुलतंत्रे ॥ ईश्वर उवाच ॥ ईषणात्रितयैः शिष्यो गुरुं शु-

---

वगैरे व स्वतःच्या हातांनीं पक्क केलेल्या सुपाऱ्या यांस तांबूलशुद्धि असें ह्मणतात. (१८५) हे भक्त श्रेष्ठा, जल, पुष्प, फल, पत्र, पात्र, गोत्र, असे हे सहा प्रकारचे संसार आहेत. (१८६) भक्तांच्या हातांनीं तयार झालेला आड असून ज्यांतून प्रत्यही नवें पाणी आणिलें जातें. व जें भस्ममंत्रानें पवित्र करून घेतलें जातें. त्यास जलसंस्कार असें ह्मणतात. (१८७) नव्या घड्यांत भरलेलें व अलिंगी मनुष्यानें न पाहिलेलें पाणी लिंगाला योग्य आहे. या व्यतिरिक्त जल बुद्धिवंतानें वर्ज करावें. (१८८) भ्रमरांनीं न हुंगलेलीं व दुसऱ्या कोणी न स्पर्श केलेलीं फुलें असलीं तर त्यास पुष्पसंस्कार असें ह्मणतात. (१८९) भक्ताच्या हातांत गेलेलीं व अभक्तानें न पाहिलेली अशीं जीं फलें त्यास फलसंस्कार असें ह्मणतात. (१९०) भक्ताच्या हातांनीं तयार झालेला चक्रवर्त्यादि पत्राचा भाजीपाला केला असल्यास त्यास पत्रसंस्कार असें ह्मणतात. (१९१) ज्यांनीं जग पावन होतें अशीं जंगमाच्या पादधूलीनें स्पृष्ट झालेलीं पात्रें असलीं तर हे पार्वति, त्यांस पात्रसंस्कार असें ह्मणतात. (१९२) शिवगोत्राशीं शरीरसंबंध करणें व त्यांचें भय बाळगणें व त्याजविषयीं भक्तिभाव बाळगणें त्यास गोत्रसंस्कार असें ह्मणतात. वातुलतंत्रांत सांगतात कीं, ईश्वर ह्मणतात. (१९३) ईषणत्रयीनें शिष्यानें नित्य गुरुसेवा करावी. दासोऽहंभाव हा सर्व आचारयुक्त आहे. व धन्यतेला कारण असून

श्रूयेत्सदा ॥ दासोऽहंभावसंयुक्तः सर्वाचारनियुक्तकः ॥ दासोऽहं धन्यताहेतुर्दासोऽहं जन्मनाशनं ॥१९३॥ दासोऽहं ज्योतिरूपं च दासोऽहं निर्मलप्रभं ॥ दासोऽहं कुरुते यस्तु पार्वतीपरमेशयोः ॥ अचिरेणैव कालेन सर्वपापैः प्रमुच्यते ॥ १९४ ॥ दासोऽहमिति यो भक्त्या चिंतयेद्वृषभध्वजं ॥ संसारविषयादिभ्यः सर्वदुःखैर्न लिप्यते ॥१९५॥ दासत्वं वीरदासत्वं भृत्यत्वं वीरभृत्यता ॥ समयः सकलावस्थः सज्जनं षड्विधं तथा ॥ १९६ ॥ आदौ नियमसंतुष्टो गुरुपादांबुजार्चने ॥ कर्मयोगरतः प्रोक्तो दासभावं तु सज्जनं ॥१९७॥ स्वामिभृत्यसमोपेतं परं दैवविवर्जितं ॥ मद्भक्तकांक्षितं वित्तं वीरदासं तु सज्जनं ॥ १९८ ॥ अकुलं कुलवंतं वा नमस्कारपुरःसरं ॥ भक्त्या तु भोजयेद्देवि भृत्यभावं तु सज्जनं ॥१९९॥ इष्टसिद्धियुतं प्रोक्तमीषणात्रयसंयुतं ॥ आसुरकर्मयोगेन वीरभृत्यं तु सज्जनं ॥ २०० ॥ स्वगृहं स्वधनं चैव स्वदेहं भक्तिसंयुतं ॥ जंगमे स्थावरे क्षिप्रं समयाचारसज्जनं ॥२०१॥ अणिमादिगुणैश्वर्यमीषात्रयविवर्जितं ॥ निर्मलं निरहंकारं कलावस्थं तु सज्जनं ॥२०२॥ गुरौ लिंगे दृढो भक्तः सत्यवादी जितेंद्रियः ॥ सुव्रतः सु-

---

जन्मनाशक आहे. (१९४) दासोहंभाव ज्योतिस्वरूप आहे; व निर्मलप्रभ आहे; जो पार्वतीपरमेश्वराच्या ठिकाणीं दासोहंभाव ठेवितो तो अल्प कालानें सर्व पापांपासून मुक्त होतो. (१९५) दासोहंभावानें जो भक्तिपुरःसर शिवचिंतन करितो तो संसारविषयादि दुःखापासून निर्लेप होतो. (१९६) दासत्व, वीरदासत्व, भृत्यत्व, वीरभृत्यत्व, समय, सकलावस्था, ह्या सहांस सज्जन ही संज्ञा आहे. (१९७) प्रथमतः गुरुपादोदकाचें अर्चन करण्यांत नियमसंतुष्ट असून जो कर्मयोगरत असतो त्यास सज्जनदासभाव असें ह्मणतात. (१९८) स्वामिभृत्यभावयुक्त व अन्यदैवतरहित व माझ्या भक्तांना अपेक्षित वित्त देणारा ह्यांस वीरदाससज्जन असें ह्मणतात. (१९९) कुलहीन किंवा कुलवंत ह्यांस नमस्कारपुरःसर जेवूं घालणाराला हे देवि सज्जनभृत्यभाव असें ह्मणतात (२००) पुत्रादि ईषणत्रयसंयुक्त, इष्टसिद्धियुक्त व कर्मयोगानें आसुर यांस वीरभृत्यसज्जन असें ह्मणतात. (२०१) जंगमलिंग व स्थावरलिंग यांजविषयीं आपलें घर, धन व देह यांहींकरून भक्ति करणें ह्यास समयाचारसज्जन असें ह्मणतात.(२०२) अणिमादिगुणैश्वर्य व इच्छात्रय यांविरहित व निर्मल अहंकाररहित असणें यास सकलावस्थसज्जन असें ह्मणतात. (२०३) गुरु व लिंग यांठिकाणीं

मतिश्चैव दासभावार्चनक्रमः ॥ २०३ ॥ शुद्धं लिंगार्चनं नित्यं सज्जनं समयान्वितं ॥ अन्यथा दैवतं नास्ति वीरदासार्चनक्रमः ॥ २०४ ॥ पुष्पानुलेपनं वस्त्रं पादाद्याभरणान्वितं ॥ तांबूलागुरुकर्पूरं सुगंधामोदपूरितं ॥२०५॥ योजयेद्गेयनृत्यं च धवलैश्छत्रचामरैः ॥ स्तुतिस्तोत्रं प्रकुर्वीत भृत्याचारार्चनक्रमः ॥२०६॥ प्राणलिंगव्रते लुप्ते हस्तखड्गादवंचयन् ॥ मुखं पंकजवच्छिद्याद्वीरभृत्यार्चनक्रमः ॥२०७॥ तैलाभ्यंगं च वस्त्रं च इष्टान्नं जंगमार्पणं ॥ सुखसंभाषणं प्रीत्या समयाराधनक्रमः ॥२०८॥ चित्तं समरसं शांतं भावपुष्पांबुनिर्मलं ॥ आत्मलिंगार्चनं नित्यं सकलावस्थार्चनक्रमः ॥२०९॥

श्रीदेव्युवाच ॥ वीरव्रतानां भगवन् प्रकारस्तत्र कीदृशः ॥ के वा भवेयुरन्ये मे नियमास्तन् प्रसादय ॥२१०॥

ईश्वर उवाच ॥ शृणु देवि त्वया पृष्टान्नियमान् कथयामि ते ॥ भक्तैरगोचरान् सर्वान्वीरव्रतपुरःसरान् ॥२११॥ विकसंति सुकांतीनि सुर-

---

दृढभक्त, सत्यभाषणी, जितेंद्रिय, सद्व्रत व सुबुद्धि असणें हा दासभावार्चनक्रम होय. (२०४) नित्य शुद्धलिंगार्चनसज्जन, आचारयुक्त असून ज्यास अन्य दैवत नाहीं त्यास वीरदासार्चनक्रम असें ह्मणतात. (२०५) पुष्पें, अनुलेपन, वस्त्र, पादाभरण वगैरे व सुवासिक विडा धूप, कापूर, (२०६) गायन, नर्तन, पांढरें छत्र व चामरें हीं शिवाला योजणें व त्याचें स्तुतिस्तोत्र करणें ह्यास भृत्याचारार्चनक्रम असें ह्मणतात. (२०७) प्राणलिंगव्रताचा लोप झाला असतां, जसें एखादें कमल सहज तोडून पाडावें त्याप्रमाणें आपलें शिरकमल तरवारीनें छाटून टाकणें ह्यास वीरभृत्यार्चनक्रम असें ह्मणतात. (२०८) तैलाभ्यंग, वस्त्र व इच्छित अन्न हीं जंगमांस अर्पण करणें व प्रीतीनें सुखसंभाषण करणें यांस समयाराधनक्रम असें ह्मणतात. (२०९) चित्तसामरस्य करणें व शांत राहून भावरूपी पुष्प व जल अर्पण करणें व यांयोगें जें निर्मल आत्मलिंगार्चन करणें त्यास नेहमीं सकलावस्थार्चनक्रम असें ह्मणतात.

(२१०) श्रीपार्वती ह्मणते—हे भगवन् वीरव्रतें कोणत्या प्रकारचीं आहेत अथवा दुसरे नियम कोणते आहेत ते मला कथन करा.

ईश्वर ह्मणतो—(२११) हे देवि, त्वां विचारिलेले नियम सांगतों ऐक. वीरव्रतांत श्रेष्ठ असल्यानें भक्तांना ते सर्व अगोचर आहेत. (२१२–२१३) नवीन

भीण्युत्पलान्यहं ॥ संपाद्याष्टोत्तरशतं संख्यानि प्रतिवासरं ॥२१२॥ यावज्जीवमवश्यं तैः पूजयिष्यामि शंकरं ॥ तदभावे न भोक्तव्यमेतद्वीरव्रतं मम ॥२१३॥ सांद्रचंदनपंकेन सकर्पूरसुगंधिना ॥ सर्वदा पूजयिष्यामि मयि जीवति शंकरं ॥ २१४ ॥ गंधमक्षतसंयुक्तं दत्वा भोक्ष्यामि शंकरे ॥ इतिसंकल्पमात्रेण एतद्वीरव्रतं मम ॥ २१५ ॥ कल्पयिष्यामि कर्पूरमवश्यं माससंमितं ॥ तांबूलार्पणवेलायां मत्प्राणेशाय शंभवे ॥ २१६ ॥ तच्छून्यं गमयिष्यामि न किंचिदपि वासरं ॥ पावनं जीवनं यत्तदेतद्वीरव्रतं मम ॥ २१७ ॥ वनस्पतिरसैर्दिव्यैर्दशांगैः सुमनोहरैः ॥ धूपं समर्पितं भूतनाथमर्पयतो मम ॥ २१८ ॥ अद्यप्रभृति नश्यंतु निखिलास्ते च वासराः ॥ ध्रुवं मदंतपर्यंतमेतद्वीरव्रतं मम ॥२१९॥ द्वात्रिंशत्तंतुसंक्षिप्तं वर्तिकाभिमनोहरं ॥ दीपं घृतेन गव्येन दास्यामि स्मरवैरिणे ॥२२०॥ इत्यर्चासमये नित्यं कृत्यत्वेन प्रतिश्रुतं ॥ उपहारं महारम्यं हराय परमात्मने ॥ २२१ ॥ काले तु वर्तमाने च काले भाविनि सर्वदा ॥ यदि वै विद्यमानोऽहमेतद्वीरव्रतं मम ॥२२२॥ सुगंधकेतकिद-

---

फुललेलीं, तेजस्वी, सुगंधित अशीं एकशेंआठ कमलें आणून मी प्रत्यहीं त्यांनीं शंकराची आमरण पूजा करीन जर तीं न मिळालीं तर मी अन्न ग्रहण करणार नाहीं हेंच माझें वीरव्रत आहे. (२१४) कर्पूरयुक्त व सुगंधित अशा ओल्या चंदनानें माझा जिवांत जीव आहे तोंपर्यंत नेहमीं मी शंकराची पूजा करीन (२१५) संकल्प करून गंधाक्षतयुक्त पूजन शंकरास अर्पण करीन व नंतर अन्न भक्षण करीन हेंच माझें वीरव्रत आहे. (२१६) विडा देण्याच्या वेळीं एक महिनापर्यंत कर्पूर मी अवश्य माझ्या प्राणनाथ शंकराकरितां तयार करीन (२१७) कोणताहि दिवस कधींहिं सुना घालविणार नाहीं हेंच माझें पवित्र व जीवनस्वरूपी वीरव्रत होय.(२१८) दिव्य वनस्पतिरसांनीं अत्यंत मनोहर दशांगधूप सर्व स्वामिशंकराला मी अर्पण करीन (२१९) ह्याप्रमाणें आजपासून आमरणकाल माझे सर्व दिवस खरोखर जावोत हेंच माझें वीरव्रत आहे. (२२०) बत्तीस तंतूंची केलेली वात ज्यांत आहे असा मनोहर गायीच्या तुपाचा दिवा मदनारि शंकराला मी अर्पण करीन. (२२१–२२२) पूजासमयीं परमात्म्या शंकराला रम्य उपहार देणें माझें कर्तव्य आहे असें समजून प्रस्तुतकालीं व पुढें जोंपर्यंत मी जिवंत असेन तोंपर्यंत देत जाईन हेंच माझें वीरव्रत आहे. (२२३–२२४) सोनकेवड्याच्या रंगाच्या मनोहर वि-

लछायासममनोहरैः ॥ नागवल्लीदलैर्मिश्रं सुपूगफलपंचकं ॥२२३॥ तांबूलमर्पयिष्यामि प्रत्यहं मृत्युमृत्यवे ॥ मद्देहपातपर्यंतमेतद्वीरव्रतं मम ॥२२४॥ उपहारं महारम्यं पंचभक्ष्यसमन्वितं ॥ नित्यं नित्याय दास्यामि सर्वदा स्मरवैरिणे ॥२२५॥ मदीयेन शरीरेण नियमोऽयमतःपरं ॥ भविष्यति महादेवि ह्येतद्वीरव्रतं मम ॥२२६॥ रसवंति सुगंधीनि सुगंधीयानि कानि च ॥ फलानि पंच भक्ष्याणि स्वादूनि प्रतिवासरं ॥२२७॥ नैवेद्यार्पणवेलायामर्पयिष्यामि शंभवे ॥ सर्वं मत्प्राणपर्यंतमेतद्वीरव्रतं मम ॥२२८॥ मनोज्ञं रौप्यसौवर्णमेकपुष्पं पुरद्विषः ॥ श्रीपादपद्मयोः पूजा समये प्रतिवासरं ॥ २२९ ॥ अर्पयिष्यामि नियतो यदि स्यात्तदसंभवं ॥ ददामि नेत्रमुत्पाट्य चैतद्वीरव्रतं मम ॥ २३० ॥ व्रतमित्यादि संकल्प्य वीरव्रतविशेषकः ॥ केनापि वक्ष्यमाणेन नियमेन समाचरेत् ॥२३१॥ शिवरहस्ये ॥ सदाकालं शिवे भक्तिर्लिंगजंगमपूजनं॥ एकपत्नीव्रतं चैव महामाहेश्वरं व्रतं ॥२३२॥ शिवधर्मी शिवज्ञानी शिवकर्मरतः सदा॥ वीरशैवाभिषिक्तः स्याच्छिवोच्छिष्टैकभोजनः॥२३३॥

---

ज्याच्या पानांत विड्याचें साहित्य घालून प्रत्यहीं मृत्यूच्या मृत्यूला—शंकराला--माझ्या अंतकालापर्यंत मी विडा अर्पण करीन हेंच माझें वीरव्रत आहे. (२२५) पंचप्रकारच्या भक्ष्यांनीं युक्त असा अत्यंत रम्य उपहार नेहमीं अक्षय शंकराला देत जाईन. (२२६) ह्याच माझा हे पार्वति शारीरिक नियम यापुढें चालवीन हेंच माझें वीरव्रत आहे. (२२७) सुगंधित रसाळ गोड अशीं कोणतींही पांच भक्ष्यफलें प्रतिदिवशीं (२२८) नैवेद्य अर्पण करण्याच्या वेळीं मी शंकराला अर्पण करीन व हें सर्व मी आमरण चालवीन हेंच माझें वीरव्रत आहे. (२२९) रुप्याचें किंवा सोन्याचें एक फूल पादपूजाप्रसंगीं प्रत्येक दिवशीं त्रिपुरारीला (२३०) नियमानें अर्पण करीन जर अशा प्रकारचें फूल न मिळेल तर मी माझा डोळा काढून देईन हेंच माझें वीरव्रत आहे. (२३१) इत्यादि वीरव्रताचा संकल्प करून कोणा एखाद्या विशेष वीरव्रतीला पुढील नियमानें तें आचरण करितां येईल. शिवरहस्यांत सांगतात कीं, (२३२) सर्वदा शंकरावर भक्ति ठेवणें व लिंग व जंगम यांची पूजा करणें व एकपत्नीव्रत पाळणें हेंच महामाहेश्वर व्रत होय. (२३३) शिवधर्माचरण करणारा, शिवज्ञान संपादणारा, नित्य शिवकर्मांत आसक्त असणारा, शिवाचें उच्छिष्ट भोजन करणारा मनुष्य वीरशैवश्रेष्ठ होईल. वातुलतंत्रांत दीक्षाप्रक-

वातुलतंत्रे ॥ दीक्षाप्रकरणे ॥ एकनिष्ठाव्रतं शीलं द्वितीयं यो न मन्यते ॥ परिच्छेदकरं वीरमाहेश्वरमभीष्टदं ॥२३४॥ न ध्यायेन्न स्मरेदन्यं न पश्येच्छृणुयान्न च ॥ न वाक्यं नापि कुर्वीत जन्मांतरशतैरपि ॥ २३५ ॥ यद्गृहेष्वन्यदेवोऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत् ॥ यद्गृहेषु भविप्राप्तिस्तद्गृहाणि परित्यजेत् ॥२३६॥ यद्गृहे शिवनिंदाऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत् ॥ यत्र चाचारनिंदाऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत् ॥२३७ ॥ शिवनिंदा गुरोर्निंदा भक्तनिंदा भवेद्यदि ॥ हंतव्यास्त्वविचारेण वीरमाहेश्वरव्रतैः ॥२३८॥ मातरः पितरश्चैव भ्रातरो बांधवास्तथा ॥ कलत्रपुत्रभृत्याश्च हंतव्याः शिवनिंदकाः ॥२३९॥ शिवनिंदाकरं वाक्यं श्रुत्वा तद्वक्त्रशिक्षणं ॥ कुर्यादन्यत्र वा गच्छेदशक्तोऽपि इति श्रुतिः ॥२४० ॥ शिवद्रव्यापहाराय प्रवृत्तो मनुजाधमः ॥ ज्ञात्वा तन्मरणं कृत्वा तद्द्रव्याणि समाहरेत् ॥२४१॥ शिवभक्तस्य मरणं प्रविधाने दुरात्मनि ॥ न कदाचिद्दयां कुर्यात्तन्मर्दनपरो भवेत् ॥ २४२ ॥ शिवचिन्हं वृषं चापि हंति यो दुर्जनः पुनः ॥ स हंतव्यः स्वहस्तेन वीरमाहेश्वरव्रतैः ॥ २४३ ॥

---

रणांत सांगतात कीं, (२३४) केवल शंकरावर भक्ति ठेवून अन्य दैवत मानीत नसणें हेंच निश्चयात्मक व इच्छिलेलें देणारें वीरमाहेश्वरव्रत होय. (२३५) अन्य दैवताचें ध्यान किंवा स्मरण, दर्शन, श्रवण किंवा भाषण हीं शेंकडो जन्मांतही करूं नयेत. (२३६) ज्या घरांत अन्य दैवत आहे किंवा अलिंगी मनुष्य आहे तें घर वर्ज्य करावें. (२३७) ज्या घरांत शिवनिंदा किंवा आचारनिंदा होत असेल तें घर वर्ज्य करावें. (२३८) जे शिवनिंदा, गुरुनिंदा किंवा शिवभक्तनिंदा करितील त्यांस एकदम विचार न करितां वीरमाहेश्वरव्रत्यांनीं शिक्षा करावी.(२३९) आई, बाप, भाऊ, नातेवाईक, बायको, मुलगा, चाकर हीं शिवनिंदक असतील तर त्यांस ठार करावें. (२४०) शिवनिंदात्मक वाक्य कानीं पडल्यास तें वाक्योच्चारण करणाऱ्याच्या तोंडाला शासन करावें व तसें करण्याचें आपणांस सामर्थ्य नसेल तर अन्य स्थळीं निघून जावें अशी श्रुति आहे. (२४१) कोणी नीच मनुष्य शिवद्रव्यापहार करण्यास प्रवृत्त झाला आहे असें समजल्यास त्यास शिक्षा करावी. व त्याचें द्रव्य हरण करावें. (२४२) कोणी दुष्ट मनुष्य शिवभक्तास ठार मारीत असतां त्याची दया करूं नये तर त्याचें शरीर मर्दन करावें. (२४३) शिवचिन्ह, बैल, ह्यास जो दुर्जन मारतो त्यास वीरमाहेश्वरव्रत्यांनीं आपल्या हातांनीं शिक्षा करावी.

शिवात्मविषये किंचिदपराधं कदाचन ॥ कस्याप्याचारतो द्रोहे ज्ञात्वा किंचिन्न मानयेत् ॥ २४४ ॥ मातरः पितरश्चैव भ्रातरो बांधवास्तथा ॥ शिवकार्येषु वक्रा ये हंतव्याः शीघ्रमेव ते ॥२४५॥ परंज्योतिः परं रूपं मम माहेश्वरव्रतं ॥ मद्व्रतं संपरित्यज्य स्वेच्छया वर्तते नरः ॥ २४६ ॥ स याति नरकं घोरं दशपूर्वैर्दशापरैः ॥ व्रतभ्रष्टमुखं दृष्ट्वा ह्यासने शयनेऽथ वा ॥ सपङ्क्तिभोजनं कृत्वा पतंति यमशासने ॥२४७॥ शिवरहस्ये ॥ देवद्रव्यं गुरुद्रव्यं चंडद्रव्यं तथैव च ॥ भक्षयेन्नरकं याति ह्युपेक्षेत कुलक्षयः ॥२४८॥ गुरुद्रव्यं गणद्रव्यं मद्भक्तस्य च मंदिरे ॥ अनुग्रहेण स्वीकार्यं भावाभावनिवर्तनं ॥२४९॥ शिवनिंदा गुरोर्निंदा शिवज्ञानस्य दूषणं ॥ देवद्रव्यापहरणं गुरुद्रव्यविनाशनं ॥२५०॥ हरंति ये च संमूढाः शिवज्ञानस्य पुस्तकं ॥ सुमहत्पातकान्याहुर्निरंतरफलानि षट् ॥२५१॥ ये त्यजंति शिवाचारं शिवभक्तान् द्विषंति च ॥ शिवनिंदा समा एते महांतः पातकोत्तमाः ॥२५२॥ आज्ञाभंगोऽर्थहरणं गुरोरप्रियवर्तनं ॥ गुरुद्रोहमिति प्राहुस्तत्संसर्गं परित्यजेत् ॥२५३॥ अका-

---

(२४४) शिवसंबंधी कधीं कोणी कांहीं अपराध केला तर तो किंचित् देखील संमानूं नये. (२४५) आईबाप, भाऊबंद जे शिवकार्यांत अडथळा करितील त्यांस तात्काल ठार करावें. (२४६) माझें माहेश्वरव्रत परमज्योति, परमस्वरूप, आहे तें माझें व्रत सोडून जो मनुष्य स्वेच्छेनें वागतो (२४७) तो मागील व पुढील दहा पिढ्यांसह घोर नरकाला जातो. व्रतभ्रष्ट मनुष्याला पाहून त्याचेबरोबर आसनावर किंवा शयनावर जो वसतो किंवा निजतो किंवा त्याजबरोबर पंक्तिभोजन करितो त्यास यमशासन होतें. शिवरहस्यांत सांगतात कीं, (२४८) जो देवद्रव्य, गुरुद्रव्य, किंवा चंडद्रव्य भक्षण करितो तो नरकाला जातो व त्याच्या कुलक्षयाची उपेक्षा केली जाते (२४९) गुरुद्रव्य, गणद्रव्य, माझ्या भक्ताचें द्रव्य हें घ्यावें न घ्यावें ह्याचा विचार न करितां मंदिरामध्यें तें अनुग्रहानें स्वीकार करावें. (२५०) शिवनिंदा, गुरुनिंदा, शिवज्ञानदूषण, देवद्रव्याचें अपहरण गुरुद्रव्याचा नाश, (२५१) शिवज्ञानाचें पुस्तक चोरणें हीं मूढांचीं कृत्यें आहेत व हीं सहा अक्षय घोर फल देणारीं महापातकें आहेत. (२५२) जे शिवाचार सोडतात, शिवभक्तांचा द्वेष करितात ते शिवनिंदकांप्रमाणें महापातकी होत. (२५३) गुरूचा आज्ञाभंग करणें, गुरूचा अर्थ हरण करणें, गुरूशीं अप्रिय वर्तन करणें ह्यास गुरुद्रोह असें ह्मणतात त्याचा संसर्ग टाकावा. (२५४) मनांत नसतां लिंग तुटून खालीं पडेल

मतो यथा लिंगं विशीर्णं पतितं भवेत् ॥ प्रायश्चितं न तत्रास्ति सत्यं सत्यं वरानने ॥ २५४ ॥ लिंगबाह्योपजीवी च प्रतिलिंगप्रसादकः ॥ भुंजीत क्रिमिकीटं च जायते मलजन्मनि ॥ २५५ ॥ पुत्रकर्मविवाहादिसंबंधः शिवकर्मभिः ॥ कर्त्तव्यः शिवभक्तैश्च यथा लोके स्वजातिभिः ॥२५६॥ वायवीयसंहितायां ॥ या तु कन्या स्वपित्राद्यैः शिवधर्मे नियोजिता ॥ सा भक्ताय प्रदातव्या नापराय विरोधिने ॥ २५७ ॥ दत्ता चेत्प्रतिकूलाय प्रमादाद्बोधयेत् पतिं ॥ अशक्ता तं परित्यज्य मनसा धर्ममाचरेत् ॥ २५८ ॥ देवतार्थं तु पचनं संतानार्थं च मैथुनं ॥ स्वर्गार्थं जीवितं तेषां नरकार्थं विपर्यये ॥२५९॥ चर्मपात्रैर्जलं तैलं न ग्राह्यं भक्तवत्सले ॥ गृह्यते यदि भक्तेन रौरवं नरकं व्रजेत् ॥ २६० ॥ मेध्यादेश्च रसाज्जातं मक्षिकासंचितं मधु ॥ तस्यैव मधुपानस्य सुरादोषो न विद्यते ॥ २६१ ॥ विषकंटकशस्त्रादिश्वानमार्जारकुक्कुटाः ॥ न तेषां ग्रहणं कार्यमनर्थविरतिः स्मृता ॥ २६२ ॥ पंचाक्षरोपदेशी च नरस्तुतिकरो यदि ॥ सोऽलिंगी स दुराचारी कुकविः स तु विश्रुतः ॥ २६३ ॥ बहु-

---

तर हे सुंदरि त्यास खरोखर प्रायश्चित्त नाहीं. (२५५) लिंगबाह्योपजीवन करणारा व प्रत्येक लिंगप्रसाद घेणारा क्रिमिकीटक भक्षण करितो व त्यास नरकांत जन्म मिळतो. (२५६) जसे लोकांत स्वजातीयांबरोबर व्यवहारसंबंध घडतात तसेंच शिवभक्तानें पुत्रसंबंध व विवाहादिसंबंध शिवभक्तांबरोबर करावेत. वायवीयसंहितेंत सांगतात कीं, (२५७) ज्या कन्येला तिच्या पित्यानें वगैरे शिवधर्मांत योजिलें आहे ती विरोधी अभक्ताला न देतां शिवभक्तास द्यावी. (२५८) प्रतिकूल मनुष्यास चुकून दिली असल्यास तिनें त्या पतीस बोध करावा बोध करण्यास अशक्त असल्यास त्याचा त्याग करून तिनें स्वमनानें धर्माचरण करावें.(२५९) शिवभक्तांनीं देवतेकरितां भोजन तयार करावें, संतानाकरितां स्त्रीसंभोग करावा, व स्वर्गाकरितां जगावें; याचे उलट जें करणें तें नरकाकरितां होय. (२६०) हे भक्तवत्सले चर्मपात्रानें तेल किंवा पाणी भक्तानें घेऊं नये जर घेईल तर तो रौरव नरकास जाईल. (२६१) पवित्र रसापासून उत्पन्न झालेला किंवा मधमाशांनीं सांठविलेला जो मध, तो मधु पान केल्यास त्यास सुरा दोष नाहीं. (२६२) विष, कांटे, श्वान, मांजर, कोंवडा, शस्त्रें वगैरे ह्यांचें ग्रहण करूं नये. ग्रहण केलें तर अनर्थ घडतो. (२६३) पंचाक्षरोपदेशी असून जर तो नर स्तुति करणारा असेल तर तो अलिंगी दुराचारी कुकवि, आहे असें समजतात. (२६४) अनेक लिंगांचें पूजन करणें; अनेक मंत्रांची उ-

लिंगं बहुमंत्रं बहुभाषा बहुर्गुरुः ॥ बहु चित्तं बहुभावो भविनां भवबंधनं ॥ २६४ ॥ भविना शयनाद्यानात्संपर्कात् सहभोजनात् ॥ संचरंति महाघोरे नरके कालमक्षयं ॥२६५॥ सत्यं क्षमा दया शौचं नियमो मार्दवं तथा ॥ तपस्त्यागो ब्रह्मचर्यं संतुष्टिश्चार्जवं तथा ॥ धर्मा एकादश प्रोक्ता भक्तानां शुभलांछने ॥ २६६ ॥ कामं भक्तिरतौ कुर्यात् क्रोधं चाधर्मकर्मणि ॥ लोभं शिवार्चने कुर्यान्मोहं भक्तजनेषु च ॥ मात्सर्यं करणेष्वेव मदं मायापराङ्मुखे ॥२६७॥

इति शैवरत्नाकरे आचारस्थलं नाम सप्तदशोऽध्यायः ॥ श्रीशंकरार्पणमस्तु ॥

---

पासना करणें; एकवचनी नसणें; पुष्कळ गुरू करून घेणें; चंचल मन ठेवणें; अनेक देवतांवर भक्ति ठेवणें; हीं भवीचीं भवबंधनें आहेत. (२६५) अलिंगी मनुष्याबरोबर शयन करणें, जाणें, संबंध ठेवणें, सहभोजन करणें ह्यांनीं तो मनुष्य महाघोर नरकामध्यें अक्षयकाल पडतो. (२६६) हे सुंदरि सत्य, क्षमा, दया, शौच-नियम, मार्दव, तसेंच तप, त्याग, ब्रह्मचर्य, संतोष, सरलता हे अकरा भक्तांचे धर्म होत. (२६७) भक्तिप्रेमाविषयीं इच्छा असावी, अधर्मकर्मांत क्रोध असावा; शिवार्चनाविषयीं लोभ असावा व भक्तजनांच्या ठिकाणीं मोह, इंद्रियांच्या ठिकाणीं मात्सर्य, मायापरङ्मुखाच्या ठिकाणीं मद हीं मनुष्यानें नित्य राखावींत.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकरांतील आचारस्थलनामक सतरावा अध्याय पुरा झाला.



## ॥ अथ अष्टादशोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ लिंगांकिततनुप्राणं लिंगजीवस्तु जीवनं ॥ लिंगतत्त्वपरिज्ञानं प्राणलिंगस्थलं भवेत् ॥१॥ वायुप्राणगुणं त्यक्त्वा लिंगप्राणसमाहितः ॥ पुण्यपापभयं नास्ति प्राणलिंगस्थलं भवेत् ॥२॥ प्राणा यस्य विलीयंते परमात्मनि शंकरे ॥ स प्राणलिंगसंबंधी नैष केवलमानवः ॥३॥ यद्देहे स्थापितं लिंगं तत्प्राणे तु प्रतिष्ठितं ॥ प्राणलिंगस्य सायुज्यं प्राणलिंगमिति स्मृतं ॥४॥ प्राणेन प्राणनिर्देशः प्राणभावं परित्यजेत् ॥ प्राणे लिंगं प्रतिष्ठाप्य लिंगप्राणमिदं स्मृतं ॥५॥असंस्कारी च यः प्राणस्तत्प्राणो जड एव च ॥ संस्कारलिंगनिर्देशं लिंगप्राणं विनिर्दिशेत् ॥६॥ प्राणशब्दं परित्यज्य लिंगशब्दः प्रतिष्ठितः॥लिंगनिर्देशनिरतो लिंगप्राण इति स्मृतः॥७॥प्राणे लिंगं प्रतिष्ठाप्य तत्प्राणः कुत्र वर्तते ॥ तत्प्रभेदं न जानाति सोऽपि लिंगं न पूजयेत् ॥८॥ निर्देशे प्राणलिंगस्य इष्टलिंगं न पश्यति ॥ लिंगद्वयेऽपि यो मूढो लिंगाचारं न पश्यति ॥९॥ लिंगं च प्राणवद्ग्राह्यं प्रसादग्राहिणी तनुः॥

---

श्रीशिवाभ्यां नमः–(१) ज्याच्या शरीरावर लिंगचिन्ह आहे तोच प्राणी, असून लिंगधारण करून राहणें हेंच मनुष्याचें अस्तित्व होय; तसेंच लिंगतत्व जाणणें ह्या सर्वांस प्राणलिंगस्थल असें ह्मणतात. (२) वायुरूपी प्राणांच्या गुणांचा त्याग करून लिंगरूपी प्राणी होणें व ज्यांत पुण्याचें किंवा पापाचें भय नाहीं ह्यांस प्राणलिंगिस्थल असें ह्मणतात. (३) परमात्म्या शंकराच्या ठिकाणीं ज्यांचे प्राण लीन होतात तो प्राणलिंगसंबंधी होय तो सामान्य मनुष्य नाहीं. (४) शरीरावर धारण केलेलें लिंग प्राणाच्या ठिकाणीं प्रतिष्ठित करावें; प्राण व लिंग ह्यांच्या सायुज्याला प्राणलिंगस्थल असें ह्मणतात. (५) प्राण शब्दानें प्राणाचा ( वायूचा ) निर्देश होतो ह्मणून प्राणभाव सोडून प्राणाच्या ठिकाणीं लिंगाची स्थापना करावी त्यास प्राणलिंग असें ह्मणतात. (६) ज्या प्राणास संस्कार नाहीं त्यास जड असें ह्मणतात. परंतु प्राणाला लिंगसंस्कार झाला तर त्यास प्राणलिंग असें ह्मणावें. (७) प्राण शब्दाच्या ठिकाणीं लिंगशब्दाची स्थापना केली असतां त्यास लिंगनिर्दिष्ट लिंगप्राण असें ह्मणतात. (८) प्राणाच्या ठिकाणीं लिंगस्थापना झाली असतां तो प्राण कोठें असतो; यांतील भेद ज्यास कळत नाहीं त्यानें लिंगपूजा करूनये. (९) प्राणलिंग ह्मणजे इष्टलिंग हें ज्यास कळत नाहीं व प्राणलिंग व इष्टलिंग ह्यांविषयीं जो अज्ञान असतो त्यास लिंगाचार समजत नाहीं. (१०) लिंगास प्राणाप्रमाणें स-

येन येन हि मंतव्यं लिंगसारोक्तिरीदृशी ॥१०॥ अनिद्रः क्षुत्तृषालस्यकामक्रोधादिवर्जितः ॥ लिंगप्रसादलिंगी स्याल्लिंगसारपरायणः ॥ स तत्र प्राणलिंगे च लिंगसंकर एव च ॥११॥ प्रसादसंकरश्चैव गुणत्वेन न युज्यते ॥ प्रसादं प्राणलिंगस्य यो भुंक्ते लिंगवर्जितः ॥१२॥ स श्वमांसं सरुधिरं सादरं भक्षितो भवेत् ॥ प्राणलिंगसमायुक्तः परहस्तसमर्पितं ॥१३॥ गुरुवाक्य उदासीनो भुंजीयात्किल्बिषं भवेत् ॥ प्राणलिंगं परित्यज्य योऽन्यलिंगमुपासते ॥१४॥ स नरो नरकं याति यावच्चंद्रदिवाकरौ ॥ प्राणलिंगमविश्वस्य तीर्थलिंगं तु विश्वसेत् ॥१५॥ स नरः स्वर्गमाप्नोति गणत्वेन न युज्यते ॥ कीर्तयेत्प्राणलिंगं च त्वन्यलिंगं न कीर्तयेत् ॥ अन्यलिंगप्रणामेन गणत्वेन न युज्यते ॥१६॥ प्राणलिंगसमायुक्तो नोपवासादिकं चरेत् ॥ मोहाद्यद्याचरेत्तस्य प्रत्यवायो महान् भवेत् ॥ १७ ॥ प्राणत्यागभयप्राप्ते चोरभूतांबुवन्हिषु ॥ अप्रमादे प्रमादे च प्राणलिंगं न वर्जयेत् ॥१८॥ प्राणो लिंगेन विच्छिन्नो लिंगप्रा-

---

मजावें व शरीर हें प्रसादग्राहक आहे. ज्यावरून ज्याच्या बोध व्हावा त्यावरून त्याचाच बोध झाला पाहिजे असें लिंगसार ग्रन्थाचेंहि मत आहे. (११) ज्यास निद्रा, क्षुधा, तृषा, आळस, स्त्रीच्छा, क्रोध, हीं नाहींत व जो लिंगप्रसादी, लिंगी, व लिंगाच्या ठिकाणीं आसक्त असतो तो प्राणलिंगाच्या ठिकाणीं लिंगसंकर होतो (१२) जो मनुष्य अनेक देवतांचा प्रसाद स्वीकार करितो तो गण होत नाहीं. जो लिंगहीन मनुष्य प्राणलिंगाचा प्रसाद भक्षण करितो तो (१३) रक्तासह कुत्र्याचें मांस भक्षितो असें होतें; प्राणलिंगयुक्त मनुष्य दुसऱ्यानें दिलेला प्रसाद (१४) गुरुवचनीं उदासीन राहून भक्षण करितो तो पाप भक्षण करितो. प्राणलिंगाचा त्याग करून जो अन्य लिंगाची उपासना करितो (१५) तो अक्षय नरकाला जातो. प्राणलिंगावर अविश्वास ठेवून जो मनुष्य तीर्थलिंगावर विश्वास ठेवितो (१६) त्यास स्वर्गप्राप्ति होते परंतु त्यास गणत्वप्राप्ति होत नाहीं. प्राणलिंगाचें कीर्तन करावें परंतु अन्य लिंगाचें कीर्तन करूं नये. अन्य लिंगास नमस्कार केला असतां त्यास गणत्व प्राप्त होत नाहीं. (१७) प्राणलिंगाशीं समायुक्त होऊन उपवासादि व्रताचरण करूं नये जर कोणी मोहानें तसें करील तर त्यास मोठा प्रत्यवाय होतो. (१८) प्राणत्यागाचें भय प्राप्त झालें असतां; किंवा चोर, भूत, जल, किंवा अग्नि ह्यांचें भय प्राप्त झालें असतां चुकून वा न चुकूनहि इष्टलिंग वर्ज्य करूं नये. (१९) इष्टलिंगरहित प्राण झाला असतां लिंगरूपी प्राणी मृत

णो गमिष्यति॥परोक्षे प्राणसंस्थाचेद्रौरवं नरकं व्रजेत् ॥१९॥शिवधर्म-शास्त्रे ॥ लिंगाद्धस्तशतं यावच्छिवक्षेत्रं समंततः ॥ देहिनां तत्र पंचत्वं शिवसायुज्यकारणं ॥२०॥ मानुषैः स्थापिते लिंगे क्षेत्रमानमिदं स्मृतं ॥ स्वयंभुवे सहस्रं स्यादार्षे स्याच्च तदर्धकं ॥२१॥ पापाचारोऽपि पुरुषो मृतो गच्छेच्छिवं यतः ॥ तस्मादावसतिं कृत्वा शिवक्षेत्रे समीपतः ॥२२॥ रहस्ये ॥ यः प्राणलिंगसंलग्नो लिंगप्राणी स उच्यते शरीरदहनात्तस्य नरके कालमक्षयं॥२३॥यत्प्राणो लिंगनिक्षिप्तो निक्षिपेत्तं सलिंगकं ॥ तद्देहदहनाद्घोरं रौरवं नरकं व्रजेत् ॥२४॥ उत्तमोऽदृश्यमाप्नोति निक्षेपो मध्यमो भवेत् ॥ कनिष्ठो दाहमाप्नोति शिवभक्तो मृतो यदि ॥२५॥ दग्धस्य दहनं नास्ति पक्वस्य पचनं तथा ॥ शिवाग्निदग्धदेहस्य न च श्राद्धं न च क्रिया ॥२६॥

इति शैवरत्नाकरे प्राणलिंगस्थलं नाम अष्टादशोऽध्यायः ॥ संपूर्ण॥

---

होतो. लिंग नसतां प्राणधारणा केली तर तो प्राणी रौरव नरकाला जातो. शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, (२०) शिवलिंगापासून शंभरहातपर्यंतचा प्रदेश शिवक्षेत्राप्रमाणें समजावा. प्राणी त्या जागेंत मरण पावला असतां तो शिवसायुज्य पावतो. (२१) हें पूर्वोक्त क्षेत्रमान मनुष्यांनीं स्थापिलेल्या लिंगासंबंधीं होय; स्वयंभू लिंगासंबंधीं क्षेत्रमान एक हजार हात घ्यावें, व ऋषीनें स्थापिलेल्या लिंगासंबंधीं पांचशें हात क्षेत्रमान घ्यावें. (२२) पापाचरण करणारा पुरुषहि ह्या क्षेत्रमानांत मरण पावला तरी तो शिवलोकीं जातो. ह्याकरितां शिवक्षेत्रासमीप वास करावा. रहस्य ग्रन्थात सांगितलें आहे कीं, (२३) जो प्राणलिंगाशीं संलग्न झाला असतो त्यास लिंगप्राणी असें ह्मणतात. त्याचें शरीर दहन केलें असतां दहन करणारा अक्षयकाल नरकाला जातो; (२४) लिंगधारी प्राण्याचें शरीर लिंगासहित जमिनींत पुरावें. त्याच्या देहाचें दहन केलें तर दहन करणारा घोर रौरव नामक नरकाला जातो. (२५) उत्तम शिवभक्त शिखिकर्पूराप्रमाणें अदृश्यत्व पावतो; मध्यमास भूमिनिक्षेप मिळतो व कनिष्ठ मरण पावला असतां दहन केला जातो. (२६) ज्याप्रमाणें दग्ध झालेल्या वस्तूस पुनर्दहन नाहीं व पक्व झालेल्या वस्तूस पुनः पचन नाहीं त्याप्रमाणें शिवाग्नीनें दग्ध झालेल्या शिवभक्ताचें पुनर्दहन नाहीं त्याचें श्राद्ध नाहीं किंवा त्याला और्ध्वदेहिकक्रियाहि नाहीं.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रन्थांतील प्राणलिंगस्थल नांवाचा अठरावा अध्याय पुरा झाला.

## ॥ अथैकोनविंशोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अथ जंगमस्थलं ॥ जकारः कथ्यते चंद्रो मकारः सूर्य उच्यते ॥ एकत्र गमयेदेताविति जंगम इष्यते ॥१॥ निःसंगत्वं निराभारं निर्देहं निरुपाधिकं ॥ निःसीमं निर्मलं चैव निरूपं जंगमस्थलं ॥२॥ वातुलतंत्रे ॥ लिंगक्षेत्रे गुरुस्थानं गुरुक्षेत्रे च जंगमः ॥ जंगमस्तु निराभारी भाराभारनिवर्तकः ॥३॥ शिवधर्मशास्त्रे ॥ लिंगद्वयं समाख्यातं चरं चाचरमेव च ॥ चरं चातिथिविख्यातमचरं पार्थिवादिकं ॥४॥ चरे सदा वसत्येव प्रीतियुक्तो महेश्वरः ॥ अचरे मंत्रसंस्कारैः स्वयं सत्यं सदाशिवः ॥५॥ जटी मुंडी शिखी वापि भिक्षाशी विगतस्पृहः ॥ मौनी भूतानुकंपी च यतिः शांतगतिश्चरेत् ॥६॥ जटाकलापधारी स्यादथवा वपनान्वितः ॥ यदेव पुण्यं जटिनां तत्पुण्यं वपनाद्भवेत् ॥७॥ त्रिसंध्यमाचरेन्नित्यं भस्मस्नानं त्रिपुंड्रकं ॥ पत्रपुष्पफलैर्वन्यैर्जंगमो लिंगमर्चयेत् ॥८॥ सर्वभूतदयाधर्मः कर्म शंकरपू-

---

श्रीशिवाभ्यां नमः—(१) आतां जंगमस्थल ह्मणजे काय तें सांगतों जकार ह्मणजे चंद्र व मकार ह्मणजे सूर्य हे दोन्ही ज्यांत एकत्र मिळतात तो जंगम होय. (२) निःसंग, निराभार, निर्देह, उपाधिरहित, अमर्याद, शुद्ध व निरूप असें जंगमस्थल आहे. वातुलतंत्रांत सांगतात कीं, (३) लिंगक्षेत्रीं गुरुस्थान व गुरुक्षेत्रीं जंगम होय तो जंगम भार किंवा अभार ह्यांनीं वर्जित आहे. शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, (४) लिंगें दोन प्रकारचीं सांगितलीं आहेत एक चर व दुसरें अचर; चरलिंग अतिथिरूपानें व अचर पाषाणरूपी आहे असें सांगितलें आहे. (५) चरलिंगाच्या ठिकाणीं प्रीतीनें साक्षात महेश्वर सदा वास्तव्य करितो व अचरलिंगाच्या ठायीं तो सदाशिव मंत्रसंस्कारांनींच खरोखर वास्तव्य करितो. (६) यति हा जटा राखलेला, मुंडन केलेला, किंवा शिखायुक्त असो; तो निरिच्छपणें भिक्षाशन करणारा आसावा, तसाच मौन धारण करणारा, सर्व प्राणिमात्रांवर दया करणारा असावा अशा यतीनें शांतपणें चालावें. (७) जटाभार धारण करणारा असो किंवा वपन केलेला असो जटा धारण करणाऱ्यास जें पुण्य तेंच वपन करणाऱ्यास आहे. (८) यतीनें त्रिकाल—सकाळीं, मध्यान्हीं, व सायंकाळीं—भस्मस्नानपूर्वक त्रिपुंड्र धारण करावें. व त्यानें वनांतील पत्र, पुष्प, फळें यांनीं लिंगार्चन करावें (९) सर्व प्राणिमात्रावर दया करणें हा जंगमाचा धर्म आहे व शंकरपूजन हें

जनं ॥ नित्यं मनोलयो यस्य ह्येवं जानाति जंगमः ॥९॥ अतिवर्णश्च धर्मात्मा विचरेद्व्रतकर्षितः ॥ सर्वलोकहितार्थाय शिवज्ञानी जितेंद्रियः ॥१०॥ माधुकरेण मार्गेण गृहस्थानन्दकारकः ॥ जंगमस्तु चरेद्भिक्षां यादृशीं यावतीमपि ॥११॥ पंचात्मिकासु भिक्षासु माधुकर्यन्नमुत्तमं ॥ स्वसामयिकनिर्दिष्टमाचरेद्व्रतनिश्चलः ॥१२॥ चरेन्माधुकरीं भिक्षां मधुव्रत इवावनौ ॥ एकान्नं तु न भुंजीत बृहस्पतिसमोपि च॥१३॥ माधुकरीं चरेद्भिक्षामेकान्नं परिवर्जयेत् ॥ उपवासात्परं भैक्षमेकान्नं गृहिणो मलं ॥१४॥ यथा मध्वाददानोऽपि भृंगः पुष्पं न बाधते ॥ तथा माधुकरीं भिक्षामाददीत गृहाधिपात् ॥१५॥ भक्तैरपि च पूज्याः स्युर्व्रतिनः शिवभिक्षुकाः ॥ एभिर्विना कृतान्यत्र सा पूजा निष्फला भवेत् ॥१६॥ गृहस्थाः संविदातारस्तदर्हा इतरे पुनः ॥ परस्परमपेक्ष्यंते पूज्यपूजकभावतः ॥१७॥ अभक्तेभ्यो न गृण्हीयाद्भक्तेभ्यो यदि लभ्यते ॥ न वस्तुसंग्रहं कुर्याद्द्यादागंतवे पुनः ॥१८॥ सुवर्णधान्यप्रमुखवस्तु-

---

त्याचें कर्म आहे. नित्य ज्याच्या मनाचा लय लागलेला असतो त्यास जंगम असें ह्मणतात. (१०) अतिवर्ण होऊन, धर्मस्वरूपी होऊन, व्रतानें कृश होऊन शिवज्ञानी व जितेंद्रिय अशा जंगमानें सर्व लोकांच्या हिताकरितां संचार करीत असावें. (११) मधुकराच्या रीतीनें गृहस्थांस आनंद देणाऱ्या जंगमानें जशी जितकी मिळेल तितकी भिक्षा घेत फिरावें. (१२) पांच प्रकारच्या भिक्षेमध्यें माधुकरीचें अन्न उत्तम व आपल्या आचारांत सांगितलेलें असल्यामुळें जंगमानें अढल व्रताचरण करून तें स्वीकारावें. (१३) जंगमानें मधुकराप्रमाणें माधुकरीनें उपजीवन करावें तो बृहस्पतिसमान असला तरी त्यानें एकाकडचें अन्न भक्षण करूं नये. (१४) माधुकरीची भिक्षा घ्यावी व एकान्न वर्ज्य करावें. उपवासापेक्षां भिक्षा बरी व गृहस्थाकडून एकान्न घेणें मल होय. (१५) जसा मधु ग्रहण करणारा भुंगा फुलाला इजा करीत नाहीं तशी गृहस्थाकडून माधुकरीची भिक्षा जंगमानें घ्यावी. (१६) शिवाच्या नांवानें भिक्षा मागणारे व्रती भक्तांस पूज्य होत. याशिवाय केलेली पूजा निष्फल होते. (१७) गृहस्थ दान करण्यास योग्य आहे व इतर लोक तें घेण्यास योग्य आहेत ह्मणून पूज्यपूजकभावानें त्या उभयतांत परस्परापेक्षा आहे. (१८) भक्तांपासून जर मिळेल तर अभक्तांकडून घेऊं नये. व वस्तुसंग्रह करूं नये तर तेंच पुनः अतिथ्याभ्यागतांस देत असावें. (१९) जर यति सुवर्ण, धान्य इत्यादि

वृध्युपजीवनात् ॥ अतिवर्णो यदि चरेत् सोऽयं पातकिनां वरः ॥१९॥ जटी मुण्डी शिखी वापि मुद्रापंचकभूषितः ॥ प्रमादान्मैथुनं कृत्वा शिवद्रोही न संशयः ॥२०॥ अलिंगी लिंगिवद्भूत्वा यो लिंगेनोपजीवति ॥ स पच्यते महाघोरे नरके कालमक्षयम् ॥२१॥ लिंगलांछनसंयुक्तो ह्यन्यवेषं न धारयेत् ॥ तद्भूषणेन सद्भक्तो रौरवं नरकं व्रजेत् ॥२२॥ स्थावरं चांगदोषेण व्रतदोषेण जंगमः ॥ उभयोर्भिन्नलिंगयोर्नार्चनं नाभिवंदनं ॥२३॥ वातुलतन्त्रे ॥ प्राणलिंगप्रतिग्राही प्राणो जंगम एव च ॥ सोऽपि त्वमेव दृश्येत प्राणलिंग इति स्मृतः ॥२४॥ अस्मिन्नर्थे ॥ स्थावरं जंगमश्चैव द्विविधं लिंगमुच्यते ॥ जंगमस्यावमानेन स्थावरं निष्फलं भवेत् ॥२५॥ स्थावराराधनं पुण्यं जंगमाराधनादिकं ॥ स्थावराणां सहस्रेभ्यो जंगमस्तु विशिष्यते ॥२६॥ कनिष्ठा मत्प्रिया पूजा मध्यमं गुरुपूजनं ॥ उत्तमा जंगमार्चा तु विशिष्टं समयार्चनं ॥२७॥ वातुलतन्त्रे ॥ साहित्यं द्विविधं प्रोक्तं चराचरविभेदतः ॥ प्रथमं चरसाहित्यं द्वितीयं चाचरं स्मृतम् ॥२८॥ अतो न लिंगसाहित्यं चरसाहित्यवंचनात्

---

वस्तूंचा संग्रह करील तर तो अत्यंत पातकी होईल. (२०) जटी, मुंडी किंवा शिखी हा मुद्रापंचकानें अलंकृत असून जर तो चुकून स्त्रीसमागम करील तर तो निःसंशय शिवद्रोही होईल.(२१) जो अलिंगी मनुष्य लिंगवंताप्रमाणें होऊन लिंगलाञ्छनानें उपजीवन करितो तो अक्षय मोठ्या भयंकर नरकांत पचन पावतो.(२२) लिंगचिन्हानें युक्त असलेल्यानें दुसरा वेष घेऊं नये. तशा भूषणानें सद्भक्त रौरवनामक नरकास जातो. (२३) स्थावरलिंगांत कांहीं अंगवैकल्य असल्यास तसेंच जंगम व्रतभ्रष्ट असल्यास त्यांचें पूजन करूं नये. वातुलतंत्रांत सांगतात कीं,(२४) प्राणलिंग प्रतिग्रहण करणाराचा प्राण जंगम आहे व तो तूंच आहेस ह्मणून त्यास प्राणलिंग असें ह्मणतात. याचअर्थीं (२५) स्थावर व जंगम असें दोन प्रकारचें लिंग आहे. जंगमाच्या अपमानानें स्थावरलिंगाराधन निष्फल होतें. (२६) जंगमाराधनापूर्वक स्थावरलिंगाची आराधना केली तर तें पुण्य आहे. हजार स्थावरलिंगांपेक्षां जंगमलिंग विशेष आहे. (२७) माझें पूजन कनिष्ठ आहे. गुरुपूजन मध्यम आहे. जंगमाची अर्चा—पूजन—उत्तम आहे. ह्या सर्वांपेक्षां समयार्चन श्रेष्ठ आहे. वातुलतंत्रांत सांगतात कीं, (२८) चराचरभेदानें साहित्य दोन प्रकारचें सांगितलें आहे. प्रथम चरसाहित्य व दुसरें अचरसाहित्य. (२९) चरसाहित्याचें वंचन

॥ क्रमेण फलदं लिंगं चरं साक्षात्फलप्रदं ॥२९॥ लिंगसत्कृतिभागश्च साहित्यं जंगमस्य च ।। तदभावे महादेवि कुर्याल्लिंगस्य सत्कृतिः ॥३०॥ स्वलिंगभजनं देवि किंतु जंगमसंसदि ॥ अत एव गुरुः साक्षाज्जंगमः प्रभुरीश्वरः॥३१॥ जंगमेन विना देवि कर्माण्याचरते यदि॥ स एव नरके घोरे पुनश्चंडालजन्मनि ॥३२॥ इष्टलिंगार्पितं शुद्धं स्वदेहस्यैव कारणं ॥ गृहीतं जंगमात्सिद्धं चराचरनिवर्तकं ॥३३॥ मत्प्रसादीष्टसंयुक्तं यो भुंक्ते जंगमं विना ॥ गुरुद्रोही शिवद्रोही भक्तद्रोही बहिष्कृतः ॥३४॥ तस्मात्कारणात् ॥ गृहीत्वा स्वगृहे भक्तः प्राणलिंगं च जंगमं ॥ उच्चैः सिंहासने भक्त्या स्थापयेद्भवनाशनं ॥३५॥ वस्त्रभूषणगन्धादिपुष्पशय्यादिपंचकम् ॥ वाहनाद्यखिलं वस्तु तदुच्छिष्टं तु भोजयेत् ॥३६॥ गृहक्षेत्रं धनं धान्यं गोकुलं महिषी तथा ॥ जंगमेष्टं न दत्तं चेत्प्रसादं निष्फलं भवेत् ॥३७॥ विवाहे च प्रतिष्ठासु गणसंकुलपर्वणि ।। जंगमेष्टं विना भुक्तं प्रसादं निष्फलं भवेत् ॥३८॥ तैलाभ्यंगो-

---

करून लिंगसाहित्य करूं नये. लिंग क्रमशः फल देणारें आहे व चरलिंग साक्षात्फल देणारें आहे. (३०) लिंगसत्कार व जंगमसत्कारही अवश्य आहेत परंतु जंगमाभावीं हे महादेवी, लिंगाचा सत्कार करावा. (३१) हे पार्वति, स्वलिंगाचें भजन करणें तें जंगमांच्या सभेंत करावें कारण जंगम साक्षात गुरु, प्रभु व ईश्वर आहे. (३२) हे देवि जंगमाशिवाय जो कोणी कर्माचरण करितो तो घोर नरकांत जातो व पुनः चांडाल कुलांत जन्म घेतो. (३३) इष्टलिंगास अर्पण केलेला शुद्ध प्रसाद स्वदेहाचेंच कारण होय. जंगमापासून घेतलेला सिद्धप्रसाद चराचराचें निवारण करणारा आहे. (३४) जो माझा प्रसादी जंगमाशिवाय इष्टांसह भोजन करितो तो गुरुद्रोही, शिवद्रोही, भक्तद्रोही होतो; तो बहिष्कृत असा समजावा. (३५) ह्या कारणास्तव भक्तानें प्राणलिंगस्वरूपी जंगमाला आपल्या घरांत घेऊन त्या भवनाशकाला भक्तीनें उच्च सिंहासनावर बसवावें. (३६) व वस्त्रें भूषणें, सुगंधीं द्रव्यें पुष्पशय्या वगैरे पंचक व वाहनादि सर्व वस्तु अर्पण कराव्या व त्याचें उच्छिष्ट भक्षण करावें. (३७) घर, क्षेत्र, धन, धान्य, गुरें, वांसरें, हैस हीं जंगमास इष्ट असतां न दिलीं तर तो प्रसाद निष्फल होय. (३८) विवाहकालीं, प्रतिष्ठाप्रसंगीं, गणसमाज जमला असतां जंगमास इष्टार्पण केल्याशिवाय जेवलें तर तो प्रसाद निष्फल होतो. (३९) तैलाभ्यंगानें अंगमर्दन करतांना, स्नान, भोजन, व स्त्रीसंभोग याप्र-

द्वर्तने च स्नानभोजनमैथुने ॥ जंगमेष्टं विना भुक्तं प्रसादं निष्फलं भवेत् ॥ ३९ ॥ आसने शयने याने सर्वकर्मसु सर्वदा ॥ असाक्षिणं चरं कृत्वा रौरवं नरकं व्रजेत् ॥४०॥ भोज्यं लेह्यं च चोष्यं च भुक्त्वा जंगमवर्जितं ॥ आस्ये मलं समश्नाति चंडालगृहसंभवं ॥४१॥ जंगमं प्राणलिंगं च तन्निवेद्यं च भोजयेत् ॥ पश्यन्ति जंगमं यत्र तत्र कार्या नमस्क्रिया ॥४२॥ जंगमो लिंगमाख्यातस्तत्रैवाष्टविधार्चनं ॥ तदाज्ञापालनं देवि ममाज्ञाप्रतिपालनं ॥४३॥ इति जंगमार्चनविधिः ॥ शिवयोगिप्रकरणं ॥ अथ शिवयोगीश्वरः ॥ शिवस्वभाव एवैकश्चिंत्यते निरुपाधिकः ॥ तस्मिन्नेव मनोवृत्तिर्महायोग इहोच्यते ॥४४॥ वायवीयसंहितायां ॥ मदुक्तेनैव मार्गेण मयि संस्थाप्य चेतसम् ॥ वृत्त्यंतरनिरोधो यः स योग इति कथ्यते ॥४५॥ वैराग्यज्ञानसंपन्नः शिवशांतेन तेजसा ॥ युक्तः षडंगयोगेन शिवयोगी स कीर्तितः॥४६॥वातुलतन्त्रे ॥ शिवज्ञानं शिवे भक्तिः शिवमुद्रा शिवव्रतं ॥ शिवलिंगार्चनज्ञप्तिः शि-

---

संगीं जंगमास इष्टार्पण केल्याविना त्याचा उपभोग घेतल्यास तो प्रसाद निष्फल होतो. (४०) आसन, शयन, गमन वगैरे सर्व कर्मांत सर्वकाळीं जंगमास साक्षी ठेवल्याशिवाय जो कर्म करितो तो रौरव नांवाच्या नरकाला जातो. (४१) भोज्य, लेह्य, व चोष्य (चोखण्याचा पदार्थ) वगैरे पदार्थांचें जंगमावांचून सेवन केल्यास तें चांडालाच्या घरांतील मल तोंडांत घातल्याप्रमाणें समजावें. (४२) जंगम व प्राणलिंग ह्यांस निवेदन करून भोजन करावें जेथें जंगमास पाहावें तेथें नमस्कार करावा. (४३) जंगम ह्मणजे लिंग असें ह्मटलें आहे, तेथेंच अष्टविध पूजन करणें व त्याची आज्ञा पाळणें हे पार्वति माझी आज्ञा पाळण्यासारखें आहे. ह्याप्रमाणें जंगमाच्या पूजेचा विधि झाला. आतां शिवयोगीश्वराचें लक्षण सांगतों. (४४) निरुपाधिक शिवस्वभावाचेंच ज्यांत चिंतन केलें जातें व त्याच्याच ठिकाणीं मनोलय केला जातो त्यास महायोग असें ह्मणतात. वायवीयसंहितेंत सांगतात कीं, (४५) मी सांगितलेल्या मार्गानें माझ्याच ठिकाणीं चित्त लावून अन्य पदार्थांच्या ठिकाणीं वृत्तिनिरोध करणें यास योग असें ह्मणतात. (४६) वैराग्य व ज्ञान यांनीं संपन्न व शिव व शांत अशा तेजानें व षडंग ( सहा आंगांच्या ) योगानें युक्त जो असतो त्यास शिवयोगी असें ह्मणतात. वातुलतंत्रांत सांगतात कीं, (४७) शिवसंबंधी ज्ञान, शिवभक्ति, शिवमुद्रा, शिवव्रत व शिवलिंगाच्या पूजेवि-

वयोगो हि पंचधा ॥४७॥ शिवयोगिशरीरेषु नित्यं सन्निहितः शिवः॥ योगींद्रं पूजयेत्तस्मात्साक्षात्संपूजितः शिवः ॥४८॥ युगपत्पूजितास्तेन ब्रह्मविष्णुमहेश्वराः ॥ पितरः सर्वदेवाश्च योऽर्चयेच्छिवयोगिनं ॥४९॥ सर्वेषामेव भूतानामुत्तमः पुरुषः स्मृतः ॥ पुरुषेभ्यो द्विजः श्रेष्ठो द्विजेभ्यो ग्रन्थपारगः ॥ ५० ॥ ग्रन्थज्ञाद्वेदपुरुषस्तेभ्यस्तत्त्वार्थचिंतकः ॥ नानातत्त्वविदां मध्ये क्रतुबुद्धो विशिष्यते ॥५१॥ क्रतुबुद्धसहस्रेभ्यो विशिष्टा योगिनः स्मृताः ॥ योगिनां कोटिकोटिभ्यः परमः शिवयोगिराट् ॥५२॥ सर्वयज्ञतपोदानकृत्यैर्दत्तस्य यत्फलं ॥ तत्फलं लभते सर्वं संभोज्य शिवयोगिनं ॥५३॥ ध्यायमानः शिवं योगी यो भुंक्ते संस्कृतं यदि ॥ तदा साक्षाच्छिवेनैव तद्भुक्तमशनं भवेत् ॥५४॥ विप्राणां वेदविदुषां कोटिं संभोज्य यत्फलं ॥ भिक्षामात्रप्रदानेन तत्फलं शिवयोगिनः ॥५५॥ शिवयोगी गृहे यस्य भिक्षां गृण्हाति संस्कृतां ॥ कुलमुत्तारयेत्तस्य नरकार्णवसंस्थितं ॥५६॥ शिवयोगिनमायातं दृष्ट्वैव गृहसंस्थिताः ॥ क्रीडंत्योषधयः सर्वा यास्यामः स्वर्गमक्षयं ॥५७॥ पि-

---

षयीं स्मरण असा हा पांच प्रकारचा शिवयोग आहे. (४८) शिवयोग्यांच्या शरीरांत सर्वदा शिवसान्निध्य असतें ह्मणून श्रेष्ठयोग्याची पूजा करावी ह्मणजे साक्षात् शिवपूजा केल्याप्रमाणें होतें. (४९) जो शिवयोग्यांची पूजा करितो त्यानें एकसमयावच्छेदें ब्रह्मा, विष्णु, महेश्वर तसेंच सर्व देव व पितर हे पूजिल्याप्रमाणें होतें. (५०) सर्व प्राण्यांमध्यें पुरुष उत्तम असा मानिला आहे त्या पुरुषांमध्यें द्विज श्रेष्ठ होय द्विजांपेक्षां विद्वान श्रेष्ठ (५१) व विद्वानांपेक्षां वेदज्ञ पुरुष श्रेष्ठ व त्यापेक्षां सर्वार्थचिंतन करणारा श्रेष्ठ व अनेक तत्ववेत्त्यांमध्यें यज्ञविद् विशेष होय. (५२) व सहस्र यज्ञवेत्त्यांपेक्षां योगी अधिक श्रेष्ठ होत. आणि कोटिशः योग्यांपेक्षां शिवयोगिराज श्रेष्ठ होय. (५३) यज्ञ, तप, दान वगैरे सर्व कृत्यांनीं दान केल्याचें जें फल तेंच एका शिवयोग्यास भोजन घातल्याचें फल होय. (५४) शिवध्यान करणारा योगी जेव्हां संस्कृत अन्न खातो तेव्हां तें साक्षात् शिवानेंच अन्न सेविल्याप्रमाणें होतें. (५५) वेदवित् कोटि विप्रांना जेवूं घातल्याचें जें फल तेंच फल शिवयोग्यास केवल भिक्षादान केल्यानेंच मिळतें. (५६) ज्याच्या घरीं शिवयोगी संस्कृत भिक्षा ग्रहण करितो तो त्याचें नरकसागरांत पडलेलें कुल उद्धरितो. (५७) शिवयोग्यास येतांना पाहतांच घरांतील सर्व पदार्थ आतां आपणास अक्षय स्वर्गाची प्राप्ति होणार ह्मणून नाचूं लागतात. (५८) पितरांना उद्देशून केलेल्या श्राद्धांत

तृनुद्दिश्य यः श्राद्धे भोजयेच्छिवयोगिनं ॥ संगच्छेतैश्वरं स्थानमेकविंशत्कुलान्वितः ॥५८॥ अपि नः स्वकुले कश्चिज्जनयेत्पुत्रमीदृशं ॥ यः संपूज्य शिवं श्राद्धे भोजयेच्छिवयोगिनं ॥५९॥ नृत्यंति पितरस्तुष्टा गायंति च पितामहाः ॥ अद्य नः पुत्रपौत्रो वा योगिनं भोजयिष्यते ॥६०॥ रूपान्वितं विरूपं वा मलिनं मलिनांबरं ॥ योगींद्रशंकया नित्यमतिथिं न विचारयेत् ॥६१॥ अत्यल्पमपि यद्दत्तं शिवज्ञानार्थवेदिने ॥ तन्महाप्रलये यावद्दातुर्भोगाय कल्प्यते ॥६२॥ गंगास्नानादिकं पुण्यं दर्शनाच्छिवयोगिनां ॥ सर्वतीर्थाभिषेकेभ्यस्तत्संभाषणमुत्तमं ॥६३॥ मुच्यते सर्वपापेभ्यः प्रणम्य शिवयोगिनं ॥ शुश्रूषयति तं भक्त्या शिवलोके महीयते ॥६४॥ ज्ञानयोगरतं शांतं रोगार्तं शिवयोगिनं ॥ यः करोति नरः स्वस्थं सर्वदानफलं लभेत् ॥६५॥ ये योगिनं द्विषन्त्यज्ञाः सर्वपापेष्ववस्थिताः ॥ अधोमुखोर्ध्वपादास्ते पतंति नरकादिषु ॥६६॥ अथ शरणलक्षणमुच्यते ॥ वातुलतंत्रे ॥ स्वयं परं परं

---

जो शिवयोग्यास भोजन घालतो तो आपल्या एकवीस कुलांसह शिवलोकास जातो. (५९) आमच्या कुलांत असा एखादा पुत्र उत्पन्न होईल काय कीं, जो श्राद्धकालीं शिवपूजन करून शिवयोग्यास भोजन घालील. अशी स्वर्गस्थ पितर इच्छा करितात. (६०) पितर संतुष्ट होऊन नृत्य करितात व पितामह ( अजोबा ) गायन करितात कारण कीं, आज आमचा मुलगा वा नातू शिवयोग्यास जेवूं घालील. (६१) योगिश्रेष्ठ अतिथीविषयीं हा सुंदर आहे का कुरूप आहे का मलिन वस्त्र परिधान केलेला आहे का अशुद्ध आहे अशी कधींहि शंका घेऊं नये. विचारणा करूं नये. (६२) शिवज्ञानार्थ जाणणाऱ्यास अत्यंत अल्पदान केलें असतांहि तें महाप्रलयपर्यंत भोगण्यास पुरतें. (६३) शिवयोग्याचें दर्शन गंगास्नानाचें पुण्य देणारें आहे व सर्व तीर्थस्नानांपेक्षां त्याचें संभाषण उत्तम होय. (६४) शिवयोग्यास नमस्कार केल्यास सर्व पापांपासून मनुष्य मुक्त होतो व त्याची भक्तीनें शुश्रूषा केली तर तो सेवक शिवलोकीं महत्व पावतो. (६५) ज्ञानयोगपरायण, शांत, परंतु रोगानें पीडिलेल्या अशा शिवयोग्यास जो मनुष्य स्वस्थ ( सुखी ) करितो त्यास सर्व दानांचें फल मिळतें. (६६) जे मूर्ख लोक नानातऱ्हेच्या सर्व पापांमध्यें मग्न होऊन शिवयोग्याचा द्वेष करितात ते अधोमुख होऊन नरक इत्यादींत पडतात. आतां शरणाचें लक्षण सांगतों—वातुलतंत्रांत सांगतात कीं, (६७) आपपरभाव

नास्ति स्वदेहं निर्मलप्रभं ॥ अद्वयं चाचलानंदं शरणस्थलमुत्तमं॥६७॥ निष्प्रपंचनिरालम्बं शरणस्थलमुत्तमं ॥६८॥ ज्ञातृज्ञानविनिर्मुक्तं सुज्ञानं निर्मलप्रभं ॥ स्वानुभावार्थनिर्देशं शरणस्थलमुत्तमं ॥६९॥ निर्मोहं च निरापेक्षं निर्देहं निरहंकृति ॥ आत्मदीपप्रकाशत्वं शरणस्थलमुत्तमं ॥७०॥ सुखदुःखभयं नास्ति पुण्यपापैर्न लिप्यते ॥ न शीतं च न चोष्णं च शरणस्थलमुत्तमं ॥७१॥ पतिर्लिंगं सती चाहमिति युक्तः स्वयं प्रभुः ॥ प्रापंचिकसुखं नास्ति शरणस्थलमुत्तमं ॥७२॥ अनेनैव शरीरेण रुद्रः संतिष्ठते क्षितौ ॥ पापहा सर्वभूतांनां सल्लापादर्शनादपि ॥७३॥ षड्र्मयश्च षड्वर्गा नास्ति चाष्टविधार्चनं ॥ निर्भावो निजलिंग्यैक्यः शिखिकर्पूरयोगवत् ॥ ७४ ॥

इति शैवरत्नाकरे शिवयोगिप्रकरणं नाम एकोनविंशोऽध्यायः ॥

---

ज्यांत नाहीं व ज्याचा देह निर्मल तेजस्वी आहे, ज्यास द्वैतभाव नाहीं, व जो अक्षयानंदांत असतो तें उत्तम शरणस्थल होय. (६८) जो निष्प्रपंच, व निरालंब आहे त्यास उत्तम शरणस्थल असें ह्मणावें. (६९) ज्ञातृ व ज्ञान यांपासून जो मुक्त व ज्यास उत्तम ज्ञान आहे व जो निर्मल तेजस् आहे व स्वानुभवाकरितां ज्याचा निर्देश आहे तें उत्तम शरणस्थल समजावें. (७०) ज्यांत मोह नाहीं, अपेक्षा नाहीं, देहभाव नाहीं, अहंकार नाहीं व ज्यांत आत्मदीप प्रकाशत आहे तें उत्तम शरणस्थल होय. (७१) यांस सुखदुःखाचें भय नाहीं व पुण्यपापाचा लेप नाहीं, ज्यास शीत नाहीं, उष्ण नाहीं तें उत्तम शरणस्थल होय. (७२) लिंग माझा पति व मी त्याची सती अशा भावनेनें जो युक्त असून स्वसामर्थ्यवान् असतो व ज्यास प्रापंचिक सुख नाहीं तो उत्तम शरणस्थल होय. (७३) अशा प्रकारच्या (शरणाच्या) शरीरानें साक्षात रुद्र या भूमीवर वास करितो तो संभाषणानें किंवा दर्शनानें सर्व प्राण्यांचें पाप नाश करितो (७४) षडूर्मि, षड्वर्ग, अष्टविध अर्चन हीं ज्यास नाहींत ज्यास भाव नाहीं व शिखिकर्पूर– ( अग्नि व कापूर ) योगाप्रमाणें जो आत्मलिंगाच्या ठिकाणीं ऐक्य पावला आहे तो शरण होय.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकर ग्रंथांतील शिवयोगिप्रकरण नांवाचा एकोणिसावा अध्याय पुरा झाला.

## ॥ अथ विंशोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः॥ अथ पाराशरस्मृतौ॥ तपः परं कृतयुगे त्रेतायां ज्ञानमुच्यते॥ द्वापारे यज्ञमेवाहुर्दानमेव कलौ युगे॥१॥ अभिगम्य कृते दानं त्रेतामाहूय दीयते॥ द्वापारे याचमानाय सेवकाय तथा कलौ॥२॥ अभिगम्योत्तमं दानमाहूतं चैव मध्यमं॥ अधमं याचमानं स्यात्सेवादानं तु निष्फलम्॥३॥ कृते त्वस्थिगताः प्राणास्त्रेतायां मांसमाश्रिताः॥ द्वापारे रुधिरप्राणाः कलौ त्वङ्नाडिकास्थिताः॥४॥ शिवरहस्ये॥ भक्तः स्वजातियोगेन कर्मणा व्यवसायवान्॥ अतिथिप्रियकारी स्यादात्मवित्तानुसारतः॥ वित्ततृतीयभागेन प्रकुर्वीत शिवार्चनम्॥५॥ कुर्वीत वा तदर्धेन यतोऽनित्यं हि जीवितम्॥ चित्तं वित्तानुसारेण कदा कस्य भविष्यति॥६॥ ग्रासादर्धमपि ग्रासं युक्तं दातुं तदर्थिने॥ कल्याणमित्रमायातमर्थिनं को न पूजयेत्॥७॥ दानतः स्वर्गमाप्नोति कोऽन्यो बन्धुरिहार्थिनः॥ प्रियो वा यदि वा द्वेष्यो मूर्खो वा पण्डितोऽपि वा॥८॥ यो दानकाले संप्राप्तः सोऽतिथिः स्वर्गसाधनः॥ न पृच्छे-

---

श्रीशिवाभ्यां नमः॥ पाराशरस्मृतींत सांगितलें आहे कीं, (१)कृतयुगांत तप, त्रेतायुगांत ज्ञान, द्वापारांत यज्ञ, व कलियुगांत दान हीं अनुक्रमें श्रेष्ठ कर्में मानिलीं आहेत. (२) कृतयुगांत घरीं जाऊन, त्रेतांत बोलावून व द्वापारांत याचना केली असतां दान दिलें जातें व कलियुगांत सेवा घेऊन दान दिलें जातें. (३) घरीं जाऊन दान करणें उत्तम; बोलावून देणें मध्यम व याचना केली असतां दान देणें अधम व सेवा घेऊन दान करणें तर निष्फल होय. (४) कृतयुगांत अस्थींच्या ठिकाणीं प्राण होते; त्रेतायुगांत मांसांत होते; द्वापारांत रक्तांत प्राण होते; व कलियुगांत चर्म व नाड्या यांत प्राण असतात. शिवरहस्यांत सांगतात कीं, (५) भक्त आपल्या जातियोगानें कर्मांप्रमाणें व्यापार करितो. आपल्या द्रव्यानुसार अतिथीला प्रियकारी व्हावें; वित्ताच्या तिसऱ्या हिश्यानें शिवार्चन करावें. (६) अथवा अर्ध्यानेंही करावें; कारण जीवित अनित्य आहे कधीं कोणाचें चित्त वित्तानें संतुष्ट झालें आहे काय ? (७) ह्मणून घासांतला अर्धा घास अतिथीला देणें योग्य होय. कल्याणसखा अतिथि आला असतां त्याची कोण पूजा करणार नाहीं बरें? (८) दानानें स्वर्गप्राप्ति होते. ह्यालोकीं अतिथीविना दुसरा कोण बंधु आहे? प्रिय असो वा अप्रिय असो; मूर्ख असो वा पंडित असो; (९) जो अतिथी दानसमयीं प्राप्त झाला

द्गोत्रचरणे न स्वाध्यायं श्रुतं तथा ॥९॥ हृदये कल्पयेत्तस्मिन् सर्ववेद-मयो हि सः ॥ दूराद्वा पथि विश्रांतो दानकाल उपस्थितः ॥१०॥ अ-तिथिं तं विजानीयान्नातिथिं पूर्वमागतं ॥ नैकग्रामीणमतिथिमग्रहीत्तु कदाचन ॥११॥ अनित्यश्चागतो यस्मातथा चातिथिरुच्यते ॥ अपूर्वः सद्व्रती विप्रो ह्यपूर्वः प्रयतस्तथा ॥ विद्याभ्यासरतो नित्यं त्रयोऽपूर्वा दिने दिने ॥१२॥ अतिथिर्यस्य भग्नाशो गृहात्प्रतिनिवर्तते ॥ स तस्य दुष्कृतं दत्वा पुण्यमादाय गच्छति ॥१३॥ अतिथिश्चापवादी च द्वावे-तौ मम बांधवौ ॥ अतिथिः सुकृतं दद्यादपवादी दुष्कृतं हरेत् ॥१४॥ स्वदेहान्निर्विशेषेण शिवभक्तांश्च पालयेत् ॥ भयदारिद्र्यरोगेषु तेषां कुर्यात्प्रियाणि तु ॥१५॥ दारिद्र्यार्णवनिर्मग्नं हाहाभूतमचेतनं ॥ समु-द्धृत्य यथाशक्त्या सर्वान्कामानवाप्नुयात् ॥१६॥ पतितादरसंकीर्णचं-डालादिश्वपाक्षिणां ॥ कारुण्यात्सर्वभूतानां देयमन्नं स्वशक्तितः ॥१७॥ यदि चान्नमदेयं स्यात्संप्राप्तायार्थिने गृहं ॥ वाक्यान्यपि च वेष्टानि

---

तो स्वर्गप्राप्तीचें साधन आहे असें समजावें. त्यास गोत्र शाखा, अध्याय, किंवा वेद हीं विचारूं नयेत. (१०) तो सर्व वेदमय आहे अशी हृदयांत कल्पना क-रावी. दुरून आला आहे, किंवा मार्गांत विश्रांतीस्तव राहिला आहे. (११) दा-नसमयीं आला आहे त्यास अतिथि समजावें. पूर्वी आलेला तो नव्हे. एकाच गांवीं वास्तव्य करणाऱ्या अतिथीचें कधींहि ग्रहण करूं नये. (१२) जो अनित्य असून अकस्मात् आलेला त्यास अतिथि असें ह्मणतात. सद्व्रताचरणी विप्र, तसाच शुद्ध ब्राह्मण, त्याचप्रमाणें नित्य विद्याभ्यासांत निमग्न असलेला ब्राह्मण हे तिघेहि प्रत्य-हीं अपूर्व ( नूतन ) होत. (१३) ज्याच्या घरून अतिथि तृप्त न होतां जातो तो त्या यजमानास आपलें दुष्कृत देऊन त्याचें पुण्य घेऊन जातो. (१४) अतिथि व अपवादी हे दोघे माझे बांधव होत. अतिथी सुकृत देतो व अपवादी दुष्कृत हरण करितो. (१५) आपल्या जिवाप्रमाणें शिवभक्तांचें रक्षण करावें. त्यांस भय, दारिद्र्य, रोग प्राप्त झालीं असतां त्यांचें हित करीत असावें. (१६) दारिद्र्यरूपी सागरांत निमग्न होऊन हाहाकार करणाऱ्या निष्प्राण लोकांचें यथाशक्ति रक्षण क-रून आपल्या सर्व इच्छा पूर्ण करून घ्याव्यात. (१७) पतित, करुणार्ह चंडाल व-गैरे श्वपचांसुद्धां सर्व प्राण्यांना यथाशक्ति कारुण्यानें अन्नदान करावें. (१८) अतिथि घरीं आला असतां जर त्यास अन्न द्यावयाचें नसेल तर त्यांनीं निदान

प्रियाण्यनुगतानि च ॥१८॥ प्रत्युत्थानाभिगमनं स्वागतं प्रियवादनं ॥ आसनं चान्नपानं च मुक्तेः सोपानसप्तकं ॥१९॥ शिवधर्मशास्त्रे ॥ पात्रे देशे च काले च विधिना श्रद्धया च यत् ॥ हुतं दत्तं कृतं चेष्टं तदनंतफलं भवेत् ॥ २० ॥ पात्रापात्रविवेकोऽस्ति धेनुपन्नगयोरिव ॥ तृणात्संजायते क्षीरं क्षीरात्संजायते विषं ॥२१॥ क्षांतिः स्पृहा दया दानं सत्यं शीलं तपः श्रुतं ॥ एतदष्टांगमित्युक्तं वरं पात्रस्य लक्षणम् ॥२२॥ किंचिद्वेदमयं पात्रं किंचित्पात्रं तपोमयं ॥ आगमिष्यति यत्पात्रं तत्पात्रं तारयिष्यति ॥२३॥ न्यायोपार्जितवित्तस्य द्वावेवानर्थकारणं ॥ अपात्रे प्रतिपत्तिश्च पात्रे चाप्रतिपादनं ॥२४॥ तद्यथा ॥ आमपात्रे रसो यद्वन्नश्यते सहभाजनः ॥ दानमज्ञे तथा न्यस्तं सहपात्रेण नश्यति ॥२५॥ तद्वीजमूषरे यद्वद्वापितं निष्फलं भवेत् ॥ भस्मनीव हुतं हव्यं यथा होतुस्तु निष्फलं ॥२६॥ ज्ञानाग्निरहिते विप्रे तथा दानं निरर्थकं॥

---

मधुर, इष्ट व अनुकूल असें भाषण तरी करावें. (१९) अतिथी आला असतां उठून सामोरें जाणें, त्याचें स्वागत करणें, त्याच्याशीं गोड बोलणें, त्यास आसन देणें, व अन्न, पान, देणें हीं सात कर्मे मोक्षमार्गाच्या पायऱ्या आहेत. शिवधर्मशास्त्रांत सांगतात कीं, (२०) देश, काल, पात्र पाहून यथाशास्त्र श्रद्धेनें जें हवन किंवा दान करण्यांत येतें तें अनंत इष्ट फलदायक होतें. (२१) धेनुपन्नगन्यायानें पात्रापात्रविचार केला पाहिजे. कारण धेनूच्या ठिकाणीं गवतापासून दूध होतें व तेंच दूध सापाच्या ठिकाणीं विष होतें. (२२) क्षांति, स्पृहा, दया, दान, सत्य, तप, शील, वेदाध्ययन, हीं आठ अंगें उत्कृष्टपात्राचीं लक्षणें होत. (२३) एखाद्या पात्राच्या ठिकाणीं वेदज्ञान असतें, तर दुसऱ्या एखाद्याच्या ठिकाणीं तपोबल असतें, याकरितां जें पात्र येईल तें पात्र (तो अतिथि) उद्धार करितें. (२४) न्यायानें संपादिलेल्या द्रव्याला दोन अनर्थकारणें आहेत—एक अपात्रीं दान करणें व दुसरें पात्रीं दान न करणें. (२५) तें कसें ह्मणाल तर—न भाजलेल्या मातीच्या भांड्यांत पाणी ओतिलें असतां जसें तें मडक्यासहित नाश पावतें. त्याप्रमाणें अज्ञास दान केलें असतां त्या दुष्ट अतिथीसह तें दान नष्ट होतें. (२६) ऊषरांत (खाऱ्या जमिनींत) घातलेलें बीं जसें निष्फल होतें किंवा राखाडींत हविष द्रव्य टाकिलें असतां जसें त्याचा हवन करणाऱ्यास उपयोग होत नाहीं तसें (२७) ज्ञानाग्नि विरहित असलेल्या विप्रास दान केल्यास तें दान निरर्थक होतें. ह्मणून अ-

तस्मात्पात्रतमं ज्ञात्वा शिवभक्तमकल्मषं ॥२७॥ तस्मै सर्वं प्रदातव्यमक्षयं फलमिच्छता ॥ तस्य पात्रमहात्म्याद्वा दानमण्वपि चाक्षयं ॥२८॥ तस्मात्तस्मै सदा देयमप्रमाणफलादिभिः॥सर्वेषामपि पात्राणामतिपात्रं महेश्वरः ॥२९॥ पतनात्त्रायते यस्मा दतीव नरकार्णवे ॥ शिवभक्तः सदानंदः श्वपचोऽपि मम प्रियः ॥३०॥ न तस्माद्धिकं किंचिद्विद्यते पात्रमुत्तमं ॥ असंयतः संयतो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ॥३१॥ यो वा को वा शिवे भक्तः शिववत्पात्रमुत्तमम् ॥ गुणवत्पात्रपूजायां वरं शासनपूजनं ॥३२॥ शासनं पूजयेत्तस्मादविचार्य शिवाज्ञया ॥ पात्रशासनयोर्मध्ये शासनं तु विशिष्यते ॥३३॥ तस्माच्छासनमेवादौ पूज्यं यत्नादि वा यथा ॥ तस्मात्पात्रतमं ज्ञात्वा शिवभक्तमकल्मषम् ॥ तस्मै सर्वं प्रदातव्यमक्षयं फलमिच्छता ॥३४॥ वृ०॥ (नाहं तदद्मि यजमानहविर्वितानं यद्यद्धुतं प्लुतमिदं हुतभुङ्मुखेन ॥ यज्जंगमस्य मुखतश्चरतोऽनुघस्त्रः तृप्तः स मह्यविहितैर्निजकर्मपाकैः) ॥३५॥ क्षीयन्ते च वरारोहे तपोयज्ञक्रियादयः ॥ न क्षीयते वरारोहे शैववक्त्रहुतं हविः ॥३६॥ शिवधर्मशास्त्रे ॥ नैवेद्यं पुरतो न्यस्तं दर्शनात्स्वीकृतं

---

क्षय फलाची इच्छा करणाऱ्यानें निष्पाप शिवभक्त उत्तम पात्र आहे असें पाहून (२८) त्यास सर्व दान करावें. त्याच्या पात्रमाहात्म्यानें अल्प दानही अक्षय होतें. (२९) ह्याकरितां अशा शिवभक्तास नित्य दान करावें; सर्व पात्रांत महेश्वर श्रेष्ठ पात्र होय. (३०) कारण नरकसमुद्रांतील पतनापासून दात्याचें तो रक्षण करितो. नित्यानंदी शिवभक्त चांडाल असला तरी तो मला प्रिय होय. (३१) त्याहून अधिक उत्तम दुसरें पात्र नाहीं. जितेंद्रिय असो वा नसो; कोणत्याही अवस्थेंतील (३२) तो कोणीहि असला तरी जर तो शिवभक्त असेल तर तो शिवाप्रमाणेंच दानपात्र आहे असें समजावें. गुणवंत पात्राच्या पूजेमध्यें शासनपूजा अधिक श्रेष्ठ. (३३) शिवाज्ञेनें विचार न करितां शिवशासनाची पूजा करावी. (शिवाज्ञा पाळावी हें तात्पर्य होय.) पात्र व शासन यांत शासन श्रेष्ठ होय. (३४) करितां शासनाची अगोदर पूजा करावी. ह्मणून अक्षय फलाची इच्छा करणाऱ्यानें निष्पाप शिवभक्त पात्रोत्तम समजून त्यास सर्व दान करावें. (३५–३६) हे सुंदरि, तप, यज्ञ इत्यादि क्रिया क्षय पावतात परंतु शिवभक्ताच्या तोंडीं हवन केलेलें हविषान्न क्षीण होत नाहीं. शिवधर्मशास्त्रांत सांगतात कीं, (३७) पुढें ठेविलेला नैवेद्य मी केवल दर्शनानेंच स्वीकृत करितों. भक्तांच्या जिव्हाग्रांवरून हे ब्रह्मदेवा मी रस ग्रहण करितों.

मया ॥ रसान्मद्भक्तजिव्हाग्रादश्नामि कमलोद्भव ॥३७॥ यत्र भुंजीत भस्मांगी मूर्खो वा पण्डितोऽपि वा ॥ तत्र भुंक्ते महादेवः सपत्नीको वृषध्वजः ॥३८॥ शिवस्य परिपूर्णस्य किन्नाम क्रियते जनैः ॥ यत्कृतं शिवभक्तानां तच्छिवाय कृतं भवेत् ॥३९॥ वायवीयसंहितायां ॥ न मे प्रियश्चतुर्वेदी मद्भक्तः श्वपचोऽपि यः ॥ तस्मै देयं ततो ग्राह्यं स च पूज्यो यथा ह्यहं ॥४०॥ शिवभक्ताय यद्दानं भक्त्या दत्तं यदर्चितं ॥ तदहं चानुगृण्हामि तेनानन्तं तदुच्यते ॥४१॥ श्वपचः शिवभक्तश्चेदुत्तमोत्तमजन्मभाक् ॥ तस्य कन्यादिदानेन दाता मद्वंशजः शिवे ॥४२॥ पात्रविवेकः॥वाराणसी कुरुक्षेत्रं प्रयागः पुष्करं तथा ॥ गंगासमुद्रशरयूनैमिषारण्यकण्टकाः ॥४३॥ श्रीपर्वतो महारण्यो गोकर्णः श्वेतवर्षकः ॥ इत्याद्याः कीर्तिता देशाः सुरसिद्धनिषेविताः ॥४४॥ सर्वे शिवसमाः पुण्याः सर्वनद्यः सपर्वताः ॥ गोसिद्धमुनिवासाश्च देशाः पुण्याः प्रकीर्तिताः ॥४५॥ शिवायतनसंस्थाने यदल्पमपि दीयते ॥ तदनन्त-

---

(३८) जेथें भस्मधारण केलेला भक्त मग तो मूर्ख असो वा पंडित असो, भोजन करितो तेथें वृषध्वज महादेव पार्वतीसह भोजन करितो. (३९) नित्यतृप्त असणाऱ्या शिवास लोकांकडून काय वरें अर्पण केलें जातें. जे कांहीं उपचार शिवभक्तांस करितात ते सर्व शिवास केल्यासारखे होतात. वायवीयसंहितेंत सांगतात कीं, (४०) भक्तिमान असून जातीनें चांडाल असलेलाहि मनुष्य मला जितका प्रिय होतो तितका चार वेदांचें अध्ययन करून अभक्त असलेला ब्राह्मण मला प्रिय नाहीं. दानाला किंवा प्रतिग्रहाला तो भक्तच योग्य; जसा मी पूज्य आहें तसाच तो पूज्य होय. (४१) शिवभक्तास जें भक्तीनें दान दिलें जातें अथवा त्याचें पूजन केलें जातें तें मी ग्रहण करितों तेणेंकरून तें अक्षय होतें असें ह्मणतात.(४२) चांडाल असून जर तो शिवभक्त असेल तर तो उत्तम जन्माचा समजावा. त्यास कन्या वगैरे दान केल्यानें तो दाता हे पार्वति माझा वंशज होतो. ह्याप्रमाणें पात्रविवेक समाप्त झाला. (४३) काशी, कुरुक्षेत्र, प्रयाग, पुष्कर, गंगा, समुद्र, शरयू, नैमिषारण्य व कंटकदेश (४४) तसेच श्रीपर्वत, महारण्य, गोकर्ण, श्वेतवर्षक इत्यादि सुरसिद्धांनीं वास्तव्य केलेले देश दान करण्यास योग्य होत. (४५) गाई, सिद्ध, मुनी यांनीं वास्तव्य केलेले सर्व देश व पर्वतांसह सर्व नद्या शिवासमान पुण्यकारक मानितात. (४६) शिवालयस्थानांत किंचित् दान केलें असतांहि तें शि-

फलं ज्ञेयं शिवक्षेत्रानुभावतः ॥४६॥ इति देशविवेकः ॥ ॐ अथ कालविवेकः ॥ ग्रहणं चंद्रसूर्याभ्यां दक्षिणायनमुत्तमम् ॥ विषुवं च व्यतीपातं षडशीतिमुखं तथा ॥४७॥ इति कालविवेकः ॥ भक्तिभावः परा प्रीतिः शिवधर्मैकतानता ॥ प्रतिपत्तिरिति ज्ञेयाः साधुपर्यायवाचकाः ॥४८॥ अथ दानप्रकरणं ॥ सर्वेषामेव दानानामन्नदानं परं स्मृतम् ॥ सद्यः प्रीतिकरं नित्यं बलवृद्धिविवर्धनम् ॥४९॥ नान्नदानसमं दानं त्रिषु लोकेषु विद्यते ॥ अन्नाद्भवंति भूतानि तदलाभे म्रियन्ति च ॥५०॥ रक्तं मांसं वसा शुक्रं क्रमादन्नात्प्रवर्तते ॥ शुक्राद्भवंति भूतानि तस्मादन्नमयं जगत् ॥५१॥ हेमरत्नाश्वनागेंद्रैर्नारीस्रक्चंदनादिभिः ॥ समस्तैरपि संप्राप्ता न रमंति बुभुक्षिताः ॥ ५२ ॥ गर्भस्था जायमानाश्च बालवृद्धाश्च मध्यमाः ॥ आहारमभिकांक्षति देवदानवतामसाः ॥५३॥ क्षुधा हि सर्वरोगाणां व्याधिः श्रेष्ठतमा स्मृता ॥ तस्यान्नौषधलेपेन प्रतीकारः प्रकीर्तितः ॥५४॥ क्षुधापन्नगदष्टस्य विषदग्धस्य देहिनः ॥

---

वक्षेत्रप्रभावानें अनंत फल देणारें असें समजावें. हा देशाचा विचार झाला. (४७) यानंतर कालविचार सांगतों—चंद्रसूर्यांचा ग्रहणकाल, संक्रांतिकाल, विषुव व व्यतीपात हे सहा काल दानास योग्य. ह्याप्रमाणें कालविवेक झाला. (४८) ह्याप्रमाणें मनुष्यांस पुण्यवर्धक काल सांगितला. भक्तिभाव, उत्तम प्रीति, शिवधर्मांच्या ठायीं एकाग्रता, ज्ञान हे सर्व चांगल्याचे पर्यायवाचक शब्द होत. आतां दानाविषयीं सांगतों. (४९) सर्व दानांत अन्नदान श्रेष्ठ मानिलें आहे. कारण तें तात्काल प्रीतिवर्धन करणारें व नित्य बलवृद्धि करणारें आहे. (५०) अन्नदानासारखें तीन लोकांत दुसरें दान नाहीं, अन्नापासून प्राणी निर्माण होतात व त्याच्या अभावीं ते मरण पावतात. (५१) रक्त, मांस, चर्बी, शुक्र, हीं सर्व क्रमशः अन्नापासून उत्पन्न होतात. व शुक्रापासून प्राणि निर्माण होतात ह्मणून हें सर्व जग अन्नमय आहे. (५२) सुवर्ण, रत्नें, घोडे, उत्तम गज, स्त्रिया, पुष्पमाला, चंदन वगैरे पदार्थ असूनही पोटांत आग पडली असतां त्यांतील एकहि गोड वाटत नाहीं. (५३) गर्भवासी प्राणी, उपजणारा प्राणी, लहान थोर वृद्ध सर्व प्राणी तसेच देव, राक्षस वगैरे सर्व जीव आहाराचीच अपेक्षा करितात. (५४) सर्व रोगांत क्षुधा हा श्रेष्ठ रोग असें मानितात ह्मणून त्यास अन्नरूपी औषधलेपानें प्रतिकार सांगितला आहे. (५५) क्षुधारूपी सर्पाकडून चावला गेल्यामुळें विष भिनलेल्या मनुष्याला

अन्नमौषधमंत्राणां दाता निर्विषमेव च ॥५५॥ नास्ति क्षुधा समं दुःखं नास्ति रोगः क्षुधा समः ॥ नास्त्याहारसमं सौख्यं नास्ति क्रोधसमो रिपुः ॥५६॥ अत एव महत्पुण्यमन्नदानप्रदानतः ॥ यतः क्षुधाग्निसंतप्ता म्रियंते सर्वदेहिनः ॥ ५७ ॥ अन्नदः प्राणदः सर्वमिहामुत्र फलं लभेत् ॥ यस्यान्नदानपुष्टांगः कुरुते पुण्यसंचयं ॥५८॥ अन्नप्रदातुस्तस्यार्धं निश्चितं हि न संशयः ॥ धर्मार्थकाममोक्षाणां देहः परमसाधनं ॥५९॥ स्थितिस्तस्यान्नपानाभ्यामतस्तत्सर्वसाधनम् ॥ अन्नं पितामहः साक्षादन्नं विष्णुः शिवः स्वयम् ॥ तस्मादन्नसमं दानं न भूतं न भविष्यति ॥६०॥ वृ० ॥ आहारदानार्जितपुण्यपाकाद्दीर्घायुरारोग्ययुतः सुखानां ॥ स्त्रीणां सुराणां च महागुणानां स्वामी भवेत्सिद्धिवधूवरश्च ॥६१॥ त्रयाणामपि लोकानामुदकं जीवनं स्मृतं ॥ पवित्रममृतं दिव्यं शुद्धं सर्वरसाश्रयं ॥६२॥ मीनकर्कटयोर्मध्ये यावच्चरति भास्करः ॥ फलमेकं तु तोयानां सुवर्णकोटिरुच्यते ॥६३॥ अरण्ये निर्जने यत्र देशे तोयविवर्जिते ॥ जलदानं तृषार्तानां पुण्यसंख्या न विद्यते ॥६४॥

---

अन्नरूपी औषधमंत्र घालणारा दाता अमृत होय. (५६) क्षुधेसारिखें दुःख नाहीं व क्षुधेसारिखा रोग नाहीं; आहारासारिखें सौख्य नाहीं व क्रोधासारिखा शत्रु नाहीं. (५७) ह्मणून अन्नदानाचें मोठें पुण्य आहे कारण क्षुधाग्नि संतप्त होऊन सर्व प्राणी मरण पावतात. (५८) अन्नदान करणारा ह्मणजे प्राणदान करणारा असें समजावें त्यास इहपरलोकीचें फल मिळतें. कारण त्याच्या अन्नानें पुष्ट होऊन तो प्राणी पुण्यसंचय करितो. (५९) त्या पुण्यसंचयापैकीं अर्ध्यावर अन्न देणाऱ्याचा हक्क असतो यांत संशय नाहीं; कारण धर्म, अर्थ, काम व मोक्ष याचें उत्तम साधन देह आहे. (६०) त्या अन्नपानापासून शरीररक्षण होतें ह्मणून तें सर्वार्थांचें साधन आहे. अन्न साक्षात् ब्रह्मा, विष्णु व सदाशिव होय ह्मणून अन्नासारिखें दान कधीं झालें नाहीं व पुढें होणार नाहीं. (६१) अन्नदानानें मिळविलेल्या पुण्यप्रभावानें अन्नदात्याला दीर्घ आयुरारोग्य प्राप्त होऊन तो सुखें, स्त्रिया थोर गुण यांचा स्वामी होऊन सिद्धिरूपी वधूचा पति होतो. (६२) उदक तिन्ही लोकांचें जीवन मानिलें आहे. तें पवित्र, अमृत, दिव्य, शुद्ध व सर्व रसांना आश्रयभूत आहे. (६३) मीन व कर्क ह्या राशींमध्यें जोंपर्यंत सूर्य क्रमण करीत आहे तावत् जलदानाचें फल कोटि सुवर्णाप्रमाणें आहे. (६४) अरण्यांत ओसाड प्रदेशांत किंवा जेथें पाणी मिळत नाहीं तेथें तृषितांना जलदान केलें असतां त्याचे पुण्याला सीमा.

वृ०॥ भूदानमादाय हरः प्रसन्नो भूदेवरूपेण गुणाधिकेन ॥ ददाति तस्मै सुरलोकवासं तस्मिन्समाप्ते भुवि भूमिराज्यं ॥६५॥ भक्तेभ्यः स्वेन दत्तानि भ्रात्रा पुत्रेण भार्यया ॥ मात्रा पित्रा च दत्तानि पुण्यक्षेत्राण्यनुपद्रवं ॥६६॥ पितृव्यैर्मातुलैरन्यैर्मान्यैर्दत्तानि यानि च ॥ स्वदत्ताधिकपुण्यानि पूर्वदत्तानि पार्थिवैः ॥६७॥ ये पालयंति भूतानां लोकपालसमा हि ते ॥ पक्कां लिंगार्चके दत्वा भूमिं गोपदमातृकां ॥६८॥ भूलोकाधिपतिर्भूत्वा शिवेन सह मोदते ॥ स्वदत्ताद्द्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनं ॥६९॥ परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत् ॥ स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत्तु वसुंधरां ॥७०॥ षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते क्रिमिः ॥ यो हरेदवनिं भक्तदत्तां स्वेन परेण वा ॥७१॥ हरेदिति धनं तेषां पुरं देशं च हारयेत् ॥ विंध्याटवीषु घोरासु शुष्ककोटरवासिनः ॥७२॥ कृष्णसर्पाः प्रजायंते भक्तदत्तापहारकाः ॥ न हरेद्वसुधां विप्रदत्तां भूयः फलामपि ॥७३॥ गुणतारुण्यरूपाढ्यां भुक्तां भोज्यामिवात्मजां ॥ एकैव

---

नाहीं. (६५) गुणश्रेष्ठ ब्राह्मणाच्या रूपानें भूदान घेऊन तो शंकर त्यास स्वर्गवास देतो व तो स्वर्गवास संपला ह्मणजे पुनः त्यास पृथ्वीवर राज्यपद देतो. (६६) भक्तांना आपण दिलेलीं किंवा भावानें, पुत्रानें, भार्येनें, मातेनें, बापानें दिलेलीं दानें पुण्यक्षेत्राप्रमाणें समजावीं त्यांस उपद्रव करूं नये. (६७) चुलत्यांनीं, मामांनीं किंवा दुसऱ्या सन्माननीयांनीं पूर्वी दिलेलीं दानें आपण चालविलीं तर आपण दिलेल्यापेक्षां तीं अधिक पुण्यकारक आहेत असें समजावें. (६८–६९) राजांनीं प्राण्याला दिलेल्या दानांचें जे रक्षण करितात ते राजाप्रमाणें होत. पिकलेल्या पिकाच्या जमिनीचें गोपाद मात्र दान केलें तर दान करणारे भूलोकचे राजे होऊन शिवलोकीं शिवाबरोबर रममाण होतात. दुसऱ्यानें दिलेल्याचें रक्षण करणें आपण दिल्यापेक्षां दुप्पट पुण्यदायक आहे. (७०) दुसऱ्यानें दिलेल्याचा अपहार केल्यानें आपण दिलेलें निष्फल होतें. आपण दिलेली किंवा दुसऱ्यानें दिलेली जमीन जो हरण करितो (७१) तो साठ हजार वर्षें नरकांत किडा होऊन राहतो. भक्तास आपण दिलेली किंवा दुसऱ्यानें दिलेली भक्ताची भूमि जो हरण करितो (७२) त्याचें धन, नगर, व देश हीं हरण करावींत. व भयंकर विंध्याटवीमध्यें ते सुकलेल्या झाडांच्या ढोलींत राहणारे होतात. (७३) भक्तांस दिलेल्याचा अपहार करणारे दरिद्री होऊन जन्मास येतात. ब्राह्मणास दिलेली जमीन पुनः फलवती झाली तरी हरण करूं नये. (७४) कारण गुण, यौवन, सौंदर्य यांनीं युक्त मुलगी असली तरी

भगिनी लोके सर्वेषामेव भूभृतां ॥ न भोग्या भूतले ह्यस्मिन् विप्रदत्ता वसुंधरा ॥७४॥ भक्तक्षेत्रमुखं बध्वा निम्नं कृष्टं पुरःस्थितं ॥ कुल्यायाः परतो नेता स्वामी गंता यमांतिकं ॥७५॥ भक्तक्षेत्रप्रसंगे तु नराणामुपकारिणां ॥ पुण्यानां पितरः पुण्या भवंति स्वर्गसंमुखाः ॥ ७६ ॥ गृहदानं तु यः कुर्याद्गृहोपस्करणान्वितं ॥ बन्धुपुत्रयुतो राज्यं वहन् द्रव्यपतिर्भवेत् ॥७७॥ सक्तालिंगार्चके दत्वा वस्त्रमात्रं यदृच्छया ॥ एकछत्रं लभेद्राज्यं शिवसायुज्यमाप्नुयात् ॥ ७८ ॥ सक्तालिंगार्चके दत्वा सुवर्णं चाणुमात्रकं ॥ देवेभ्यः पूज्यते सम्यग्गणमुख्यो गणेश्वरः ॥७९॥ सक्तलिंगार्चके दत्वा धेनुं बहुपयोधरां ॥ रुद्रलोके तु वसति यावद्रोमाणि तत्पशोः ॥८०॥ फलमूलानि भक्ताय शाकानि विविधानि च ॥ सक्तालिंगार्चके दत्वा शिवलोके महीयते ॥८१॥ क्रमुकं नागरं पत्रं चूर्णं कर्पूरमिश्रितं ॥ सक्तलिंगार्चके दत्वा इहामुत्र सुखी भवेत् ॥८२॥ यथा सुराणां सर्वेषां परमः परमेश्वरः ॥ तथैव सर्वदानानां विद्यादानं परं स्मृतं ॥८३॥ धर्मार्थकाममोक्षाणामारोग्यं साधनं यतः ॥ तस्मादारोग्यदानेन

---

ती बापानें भोगण्यास योग्य नाहीं. ह्यालोकीं सर्व राजांस ही पृथ्वी एकच बहिणीसारखी आहे. ब्राह्मणास दिलेली जमीन उपभोग घेण्यास योग्य नाहीं. (७५) जवळ असलेल्या, नागरलेल्या व उतार अशा भक्ताच्या शेताचें तोंड बांधून कालवा दुसरीकडे नेणारा यमसदनास जातो. (७६) भक्तांच्या क्षेत्रांसंबंधी उपकार करणाऱ्या पुण्यवंत लोकांचे पितर पुण्यवन्त होऊन स्वर्गगमनोन्मुख होतात. (७७) घरांतील सर्व भांड्याकुंड्यांसह जो घर दान करितो तो बंधुपुत्रांसहवर्तमान राज्य करितो व मोठा धनिक होतो. (७८) जो लिंगपूजकास सहज वस्त्रदान करितो त्यास एकछत्री राज्य लाभतें व त्यास शिवसायुज्य मिळतें. (७९) अणुमात्रसुवर्ण लिंगपूजकास एकवार दिलें असतां तो सर्व गणांत श्रेष्ठ गणेश्वर होऊन तो देवांकडून पूजिला जातो. (८०) पुष्कळ दुधाची गाय एकवार लिंगपूजकास दिली असतां तिच्या अंगावरच्या लोंकरीच्या संख्याकालपर्यंत तो दाता स्वर्गलोकीं वास्तव्य करितो. (८१) कंद, फळें, अनेक तऱ्हेच्या भाज्या एकवार शिवलिंगपूजकास दिल्या असतां तो शिवलोकांत सन्माननीय होतो. (८२) सर्व सामानानें युक्त तांबूल शिवलिंगपूजकास एकवार दिला असतां तो उभयलोकीं सुखी होतो. (८३) जसा परमेश्वर सर्व देवांना श्रेष्ठ तसें सर्व दानांमध्यें विद्यादान श्रेष्ठ मानिलें आहे. (८४) धर्म अर्थ काम, मोक्ष यांचें साधन आरोग्य आहे ह्मणून आरोग्य-

दत्तं स्याच्च चतुष्टयं ॥ ८४ ॥ आकाशस्य यथा नांतं सुरैरप्युनुमीयते ॥ दत्वा ह्यारोग्यदानस्य नांतं संविद्यते क्वचित् ॥८५॥ यो दद्याच्छिवभक्तानामुपानत्काष्ठपादुके ॥ स वराश्वेन यानेन सुखं याति शिवं पदं ॥८६॥ छत्रदानेन गच्छंति यथा छत्रेण देहिनः ॥ शिविकासंप्रदानेन तद्वदेव सुखं व्रजेत् ॥८७॥ शय्यासनप्रदानेन पुष्पारामप्रदायकः ॥ देवायतनकर्ता च यतीनामाश्रमस्य च ॥८८॥ अनाथमंटपानां च कर्ता याति गृहोत्तमैः ॥ देवाग्निगुरुविप्राणां मातापित्रोश्च पूजकाः ॥८९॥ पूज्यमाना नरा यांति कामिकेन यथासुखं ॥ द्योतयंतो दिशः सर्वा यांति दीपप्रदायिनः ॥९०॥ विश्राम्यमाणा गच्छंति गुरुशुश्रूषणे रताः ॥ यद्यदिष्टं समुत्कृष्टं न्यायप्राप्तं च यद्भवेत् ॥९१॥ भक्ताय तन्निवेद्यं स्याद्भक्त्यानंतफलार्थिभिः ॥ यद्यदात्महितं लोके तत्तद्द्रव्यमवंचयन् ॥ ९२ ॥ तत्तद्गुणवते देयं फलमक्षयमिच्छता ॥ द्वाविमौ पुरुषौ लोके स्वर्गस्योपरि तिष्ठतः ॥ दुर्भिक्षे चान्नदाता च सुभिक्षे च हिरण्यदः ॥९३॥ अपहृत्य-

---

दान केलें तर त्यास अर्थचतुष्टय दिल्यासारखें होतें. (८५) जसा आकाशाचा अंत सुरांनाहि लागत नाहीं तसें आरोग्यदान केलें असतां त्यास ( दानास ) कधींहि अंत नाहीं. (८६) जो शिवभक्तांस उपानह ( जोडे ) व लांकडाच्या पादुका दान देतो तो उत्तम घोड्याच्या गाडींतून शिवस्थानीं जातो. (८७) छत्र दान केल्यास छत्रासह व पालखी दान केल्यास पालखींतून सुखानें मनुष्यें शिवपदास जातात. (८८) शय्या, आसन, फुलझाडांचा बाग, हीं दान देणारा, देवालय बांधणारा, यतींचे आश्रम बांधणारा, (८९) अनाथ धर्मशाला बांधणारा, हा उत्तम शिवपदास जातो. देव, अग्नि, गुरु, विप्र, मातापितर यांची पूजा करणारे (९०) लोक पूज्य होऊन आपल्या इच्छेप्रमाणें सुखानें शिवपदास जातात. दीपदान करणारे सर्व दिशा प्रकाशित करीत जातात. (९१) गुरुशुश्रूषापरायण झालेले लोक विश्रांति घेत जातात. जी कांहीं उत्कृष्ट व इष्ट वस्तु न्यायानें मिळविली असेल ती (९२) अनंत फलाची इच्छा करणाऱ्यांनीं शिवभक्ताला अर्पण करावी. इहलोकीं जें कांहीं आपणास इष्ट असेल तें तें द्रव्य खरेपणानें (९३) गुणवंताला अक्षय फलाची इच्छा करणाऱ्यानें द्यावें. दुष्काळांत अन्नदान करणारे व सुकाळांत द्रव्यदान करणारे हे दोन प्रकारचे लोक स्वर्गांत वास्तव्य करितात. (९४) एकाचें द्रव्य

परस्यार्थान्यः परेभ्यः प्रयच्छति ॥ स नरो नरकं याति यस्यार्थस्तस्य तत्फलं ॥९४॥ अनित्यानि शरीराणि विभवो नैव शाश्वतः ॥ नित्यं संनिहितो मृत्युः कर्तव्यो धर्मसंग्रहः ॥९५॥ अटन्नपि महीं कृत्स्नां विशन्नपि रसातलं॥ उत्पतन्नपि वाऽऽकाशं नादत्तमुपतिष्ठति ॥९६॥ यस्मिन्देशे च काले च वयसा यादृशेन च ॥ कृतं शुभाशुभं कर्म तत्तथा तेन भुज्यते ॥९७॥ गृहादर्था निवर्तंते श्मशानान्मित्रबांधवाः ॥ सुकृतं दुष्कृतं चैव गच्छंतमनुगच्छति ॥९८॥ अनुकूलविधौ देयमंतः पूरयिता च सः ॥ प्रतिकूले न दातव्यं यतः सर्वं हरिष्यति ॥ ९९ ॥ न्यायोपार्जितवित्तस्य त्याग एव हि रक्षणं ॥ तडागोदरसंस्थानां परिवाह इवांभसां ॥१००॥ वृ० ॥ दानं भोगो नाशस्तिस्रो गतयो भवंति वित्तस्य ॥ यो न ददाति न भुंक्ते तस्य तृतीया गतिर्भवति ॥१०१॥ एकेन तिष्ठताधःस्थाद्धस्तेनोपरि तिष्ठता ॥ दातृयाचकयोर्भेदः कराभ्यामेव सूचितः ॥ १०२ ॥ द्वारं द्वारमटंत्येते भिक्षुकाः पात्रपाणयः ॥ दर्शयंतीव लोकानामदातुः फल-

---

अपहार करून जो दुसऱ्यास देतो तो मनुष्य नरकास जातो व ज्याचें द्रव्य असतें त्यास दानाचें फल मिळतें. (९५) शरीरें अनित्य आहेत; वैभवशाश्वत नाहीं, नेहमीं मृत्यु संनिध आहे ह्मणून धर्मसंग्रह करीत असावें. (९६) सर्व पृथ्वीपर्यटन केलें; पातालांत प्रवेश केला, आकाशांत उड्डाण केलें तरी न दिलेलें कधींहि मिळणार नाहीं. (९७) ज्या कोणत्या देशांत किंवा काळीं ज्या वयांत जें शुभाशुभ कर्म केलें असेल त्याप्रमाणें तो तें भोगतो. (९८) घरांतून लक्ष्मी मागें फिरते, स्नेही, आप्त श्मशानांतून मागें फिरतात आणि सुकृत दुष्कृत मात्र मरून जाणाऱ्याच्या मागून जातें. (९९) प्रारब्ध अनुकूल असतांना दान करावें; तें प्रारब्धच पुरविणारें आहे विधिप्रतिकूल असतां दान करूं नये कारण तो सर्व हरण करीत असतो. (१००) तलावाच्या पाण्याला पाट काढून देणें जसें तलावाचें रक्षण करितें तसें न्यायानें उपार्जित द्रव्याचें दान करणें हेंच रक्षण होय. (१०१) दान, भोग, नाश हे धनाचे तीन परिणाम आहेत. जो दान करीत नाहीं किंवा उपभोग करीत नाहीं त्याच्या धनाचा तिसरा परिणाम ( नाश ) होतो. (१०२) दानप्रसंगी दात्याचा हात वर व याचकाचा खालीं अशी स्थिति असते. ह्यावरूनच दाता व याचक यांतील भेद जाणिला जातो. (१०३) हे भिक्षुक हातांत पात्र घेऊन दारोदार फिरतात व लोकांना अशा प्रकारचें हें अदात्याचें फल आहे ह्मणून दाखवीत अस-

मीदृशं ॥१०३॥ सुदध्वमनिशं बुध्वा माभूत कृपणा जनाः ॥ भाग्यक्षयेण क्षीयंते नोपभोगेन संपदः॥१०४॥तद्यथा ॥वृ०॥ भवंति नम्रास्तरवः फलोद्गमैर्नवांबुभिर्भूरिविलंबिनो घनाः॥ अनुद्धताः सत्पुरुषाः समृद्धिभिः स्वभाव एवैष परोपकारिणां ॥१०५॥ पिवंति नद्यः स्वयमेव नांभः खादंति न स्वादुफलानि वृक्षाः ॥ वसुंधरा न क्वचिदत्ति सस्यं परोपकाराय सतां विभूतयः ॥१०६॥ छायामन्यस्य कुर्वंति स्वयं तिष्ठंति चातपे ॥ फलंति च परार्थाय नात्महेतोर्महाद्रुमाः ॥१०७॥ स्वयमापद्गतोऽन्यस्य क्लेशं नुदति सज्जनः ॥ इंदुस्तमो नुदत्येव राहुग्रस्तेतरैः करैः ॥१०८॥ किमत्र चित्रं यत्संतः परानुग्रहतत्पराः ॥ न हि स्वदेहशैत्याय जायंते चंदनद्रुमाः ॥१०९॥ वृ०॥ संपदो जलतरंगविलोला यौवनं त्रिचतुराणि दिनानि ॥ शारदाभ्रपरिप्लवमायुः किं धनैः परहितानि कुरुध्वं ॥११०॥ धर्मः स्यादिति वास्तु कीर्तिरिति वा प्रोक्तं प्रियेणेति वा शिष्टा-

---

तात. (१०४) असें जाणून दान करीत असावें; कृपण होऊं नये. कारण संपदा भाग्यक्षयानें क्षीण होते उपभोगानें क्षणि होत नाहीं. (१०५) जशीं झाडें फळांच्या पाडानें नम्र होतात किंवा वर्षाकालांतील नूतन मेघ पाण्यानें वांकलेले दिसतात तसे सत्पुरुष ऐश्वर्यानें उद्दाम होत नाहींत. कारण हा परोपकारी जनांचा स्वभावच आहे. (१०६) नद्या आपलें जल आपण स्वतः पीत नाहींत किंवा वृक्ष आपलीं मधुर फळें आपणच खात नाहींत व पृथ्वीहि आपल्या पृष्ठभागावरील धान्य आपण स्वतः भक्षण करीत नाहीं कारण सज्जनांचे अवतार परोपकाराकरितांच असतात.(१०७) महान वृक्ष आपण ऊन सोसून दुसऱ्यांस छाया देतात व दुसऱ्यांकरितांच फलद्रूप होतात यांत त्यांचा स्वार्थ कांहींहि नसतो. (१०८) सज्जन मनुष्य स्वतः आपद्ग्रस्त झाला असतांहि दुसऱ्यांचे क्लेश परिहार करितो. उदाहरणार्थ चंद्र राहुग्रस्त झाला असतांहि अवशिष्ट किरणांनीं अन्धःकाराचा नाश करीत असतो. (१०९) दुसऱ्यांवर अनुग्रह करण्यास सज्जन लोक नेहमीं तत्पर असतात यांत आश्चर्य कोणतें ? चंदनवृक्ष आपल्याच शरीरास थंडाई यावी ह्मणून जन्म घेत नसतात. (११०) लक्ष्मी जलतरंगाप्रमाणें चंचल आहे; तारुण्य क्षणिक चार दिवसांचें. जीवित शरद्कालीन अभ्राप्रमाणें चंचल आहे करितां द्रव्याचें काय प्रयोजन आहे; तें परोपकारीं लावणेंच चांगलें. (१११) धर्म व्हावा; किंवा कीर्ति व्हावी; प्रियमित्रानें सांगितलें आहे ह्मणून; किंवा शिष्टांनीं याचें शीघ्र आचण केलें आहे ह्मणून; प्रतिष्ठा व्हावी

नुष्ठितमंजसेदमिति वा स्यान्मे प्रतिष्ठेति वा ॥ ऐश्वर्यस्य फलं किमन्यदिति वा लोके मतोऽस्मीति वा वित्तं मेऽपहरेन्नृपादिरिति वा दानं विधेयं शुभम् ॥१११॥

इति शैवरत्नाकरे विंशोऽध्यायः ॥ २० ॥

---

किंवा ऐश्वर्यांचें अन्य फल काय आहे ह्मणून; किंवा लोकांत माझी मान्यता आहे ह्मणून; किंवा राजादि लोक माझ्या वित्ताचा अपहार करितील ह्मणून मनुष्यानें शुभदायक द्रव्यदान करीत असावें;

ह्याप्रमाणें शैवरत्नाकरांतील विसावा अध्याय पुरा झाला.



## ॥ अथैकविंशोऽध्यायः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अथ लैंगे ॥ शिवभक्ता महोत्साहाः शिवार्चनपरायणाः ॥ संयता धर्मसंपन्नाः शिवाः सर्वार्थसाधकाः॥१॥ सर्वद्वंद्वसहा धीरा नित्यमुद्युक्तचेतसः॥ परोपकारनिरता गुरुशुश्रूषणे रताः॥२॥ ऋजवो मृदवः स्वच्छा अनुकूलाः प्रियंवदाः॥ शांताः स्मितमुखा भद्रा नित्यं स्वागतवादिनः ॥३॥ अल्पवाचः सुवक्तारः शूरास्त्यागविशारदाः ॥ अमानिनो बुद्धिमंतस्त्यक्तस्पर्धा गतस्पृहाः ॥४॥ शौचाचारसमायुक्ता दयादाक्षिण्यगोचराः॥दम्भमात्सर्यनिर्मुक्ता याथातथ्याभिभाषिणः ॥५॥ संविभागपराः प्राज्ञा ह्यशठाश्चाप्यकुत्सिताः ॥ न दीना नापि मलिना न च रोषवशानुगाः ॥६॥ भवंति भवितात्मानः सुस्निग्धाः साधुसेविनः ॥ नपादपाणिवाक्चक्षुःश्रोत्रशिश्नवशानुगाः ॥७॥ चापलानि न कुर्वंति सर्वंव्यासंगवर्जिताः ॥ एकांतां भक्तिमास्थाय गुणेष्वेतेषु वर्तिनः ॥ पूजनीयाः शिवे नित्यं परापरविभूतये ॥८॥ तात्पर्यसंग्रहे ॥ वृ० ॥ ये रुद्रलोकादवतीर्य रुद्रा मानुष्यमाश्रित्य जगद्धिताय ॥ चरंति नानाविधचारुचेष्टास्तेभ्यो नमस्त्र्यंबकपूजके-

---

श्रीशिवाभ्यां नमः॥ लिंगपुराणांत सांगतात कीं, (१) शिवपूजनासक्त, जितेंद्रिय, धर्मसंपन्न, शुभकारक, सर्व अर्थ साधणारे, (२) शीतोष्णादि सर्व सहन करणारे; धीर, नेहमीं शिवाच्या ठिकाणीं मन लावून राहणारे, परोपकारपरायण, गुरुसेवासक्त, (३) सरल, नम्र, निर्मल, लोकांस अनुकूल, प्रियभाषणी, शांत, हास्यवदन, कल्याणकारक, सर्वदा पाहुणचार करणारे, (४) मितभाषी, मधुर बोलणारे, शूर, दानशौंड, अगर्वी, बुद्धिमान्, स्पर्धा न करणारे, निरीच्छ (५) शुद्ध आचार पाळणारे, दया, औदार्य दाखविणारे, दंभ, मत्सर ज्यांचे ठिकाणीं नाहींत असे, यथार्थवादी, (६) षष्ठांश देणारे, ज्ञाते, साधु, अनिंद्य, दीन व मलिन नसणारे, रागीट नसलेले (७) असे सज्जन लोक, प्रेमळ, साधुसेवातत्पर व जितेंद्रिय होतात. (८) दुष्कर्माचरण न करणारे, सर्वसंगपरित्यागी, अत्यंत भक्ति करणारे, व पूर्वोक्त गुणांच्या ठिकाणीं वर्तणारे अशा प्रकारचे शिवभक्त, हे पार्वती ऐहिक पारलौकिक कल्याणाकरितां सर्वदा पूज्य होत. तात्पर्यसंग्रहांत सांगितलें आहे कीं, (९) जगाचें कल्याण व्हावें ह्मणून रुद्रलोकांतून अवतार घेऊन व मनुष्यरूप धारण करून इहलोकीं अनेक प्रकारचे आचार करीत संचार कारणाऱ्या त्या शिवपू-

भ्यः ॥९॥ नमो विश्वेशभक्तेभ्यस्तेभ्य एव नमो नमः ॥ अभावे शिवभक्तानां विश्वेशाय नमो नमः ॥१०॥ वृ० ॥ व्यालाकल्पा विषमनयना विद्रुमाताम्रभासो जायामिश्रा जटिलशिरसश्चंद्रलेखावतंसाः ॥ नित्यानंदाः नियतललिताः स्निग्धकल्माषकंठा देवा रुद्रा धृतपरशवस्ते भविष्यन्ति भक्ताः ॥११॥ नादशून्यः शरण्यात्मेत्येवमागमिकं वचः ॥ इत्युदीरयति प्रायो भक्त एव शिवः स्वयं ॥१२॥ चंडालश्वपचागारे लिंगे तिष्ठेन्महेश्वरः ॥ इत्याचष्टे विशेषेण भक्त एव शिवः स्वयं ॥१३॥ स्वर्गे वाप्यथ पाताले करस्थाः सर्वे सिद्धयः ॥ यस्य स्वेच्छागतिश्चोक्ता सोऽयं सोमेश्वरो जनः ॥१४॥ उपवीतिसहस्रेभ्यो ब्रह्मचारी विशिष्यते ॥ ब्रह्मचारिसहस्रेभ्यो वेदाध्यायी विशिष्यते ॥१५॥ वेदाध्यायिसहस्रेभ्यश्चाग्निहोत्री विशिष्यते ॥ अग्निहोत्रिसहस्रेभ्यो यज्ञयाजी विशिष्यते ॥१६॥ यज्ञयाजिसहस्रेभ्यः सत्रयाजी विशिष्यते ॥ सत्रयाजिसहस्रेभ्यः सर्वविद्यार्थपारगः ॥ सर्वविद्यार्थवित्कोट्याः शिवभक्तो विशिष्यते॥१७॥ यस्मिन् कस्मिन् शिवे भक्तो भूतिशासनसंयुतः॥

---

जकांना नमस्कार असो. (१०) विश्वेश्वर शंकराच्या भक्तांस नमन असो. त्या शिवभक्तांनाच केवल नमस्कार असो. शिवभक्त नसतील तर त्या विश्वेश्वरास नमस्कार असो. (११) सर्प ज्यांचें भूषण आहे; ज्यांस तीन डोळे आहेत, पोंवळ्याप्रमाणें ज्यांची कांति आहे; जे सभार्य आहेत. ज्यांच्या डोक्यावर जटाभार आहे; ज्यांच्या मस्तकावर शशिकला भूषण आहे, जे नित्य आनंदी असतात, जे सुंदर आहेत; जे नीलकंठ आहेत; जे हातांत परशु धारण करितात ते रुद्र ह्या जगतांत भक्तरूपानें अवतार घेतात. (१२) नादशून्य, शरण्यात्मा ह्मणून वेदवाक्य आहे असें भक्तरूपानें शिवच बहुतकरून स्वतः सांगत असतो. (१३) चांडाल वगैरे श्वपचांच्या घरीं व लिंगांत महेश्वर वास्तव्य करितो असें शिवच भक्तरूपानें बहुतकरून सांगतो. (१४) स्वर्गलोकीं किंवा पाताललोकीं ज्यास सर्वसिद्धि साध्य आहेत व जो स्वैरगतीनें संचार करितो तो मनुष्य शिव आहे असें समजावें. (१५) हजारो उपनयन झालेल्या द्विजांपेक्षां ब्रह्मचारी श्रेष्ठ, हजारो ब्रह्मचाऱ्यांपेक्षां वेदाध्ययन करणारा विप्र श्रेष्ठ, (१६) हजारो वेदाध्यायींपेक्षां अग्निहोत्री विशेष होय. हजारो अग्निहोत्र्यांपेक्षां यज्ञ करणारा श्रेष्ठ होय. (१७) यज्ञ करणाऱ्या हजारो लोकांपेक्षां यज्ञ करविणारा जास्त श्रेष्ठ, हजारो याजकांपेक्षां सर्व विद्यांचा अर्थ जाणणारा श्रेष्ठ, कोट्यावधि विद्यार्थजाणणारांपेक्षां शिवभक्त विशेष होय. (१८) भस्मशासनयुक्त

तत्रास्ति योजनं गंगा प्रभावाच्चासनस्य वै ॥१८॥ अंत्यजो वाऽधमो वापि मूर्खो वा पंडितोऽपि वा ॥ यस्मिन्देशे वसेन्नित्यं भूतिशासनसंयुतः ॥१९॥ तस्मिन् सदाशिवः सोमः सर्वभूतगणैर्वृतः ॥ सर्वतीर्थैश्च तीर्थशः सान्निध्यं कुरुते सदा ॥२०॥ शिवरहस्ये ॥ अष्टादशानां वर्णानां श्रेष्ठा माहेश्वरा जनाः ॥ पूतस्तदीयदेशोऽपि किं पुनस्तस्य बांधवाः ॥२१॥ शिवभक्तो वसेद्यत्र ग्रामे वा नगरेऽपि वा ॥ न तत्र क्षुत्पिपासाद्या दुर्भिक्षा व्याधयोऽपि च ॥२२॥ चांडालवाटिकायां वा शिवभक्तः स्थितो यदि ॥ तच्छ्रेणिः शिवलोकः स्यात्तद्गृहं शिवमंदिरं ॥२३॥ कीकटेष्वपि देशेषु यत्र माहेश्वरो जनः ॥ मनाक् प्रपन्नोऽपि वसेत् काशीक्षेत्रसमं हि तत् ॥२४॥ नाहं वसामि कैलासे न मेरौ न च मंदरे ॥ मद्भक्ता यत्र तिष्ठंति तत्र तिष्ठामि पार्वति ॥२५॥ यस्मिन् क्षेत्रे शिवो नास्ति नास्ति माहेश्वरो जनः॥ तत्र स्थानं न कर्तव्यं विंध्ये नरवनांतरं ॥ ॥२६॥ यमलोकभयं नास्ति संसारस्य भयं न च ॥ मम भक्तस्य माहात्म्यं देवि किं कथयामि ते ॥ २७ ॥ स्कांदे ॥ सर्वाचारविही-

---

शिवभक्ताचें ज्या कोणत्या प्रदेशांत वास्तव्य असतें तेथें त्याच्या वस्तिप्रभावानें योजनमात्र आसमंतभार्गी गंगेचें सांनिध्य असतें. (१९) भूतिशासनयुक्त शिवभक्त मग तो अंत्यज असो वा अधम असो; मूर्ख असो किंवा पंडित असो ज्या प्रदेशांत राहतो (२०) तेथें सर्व भूतगणांसह शशिशेखर वास्तव्य करितो. सर्व तीर्थांसह तीर्थराजाचें सान्निध्य असतें. शिवरहस्यांत सांगतात कीं, (२१) अठरा जातींत माहेश्वर लोक श्रेष्ठ आहेत ज्या देशांत त्यांचें वास्तव्य असतें तो देशही पवित्र होतो मग त्यांचे आसेष्ट पवित्र होतील यांत काय नवल आहे. (२२) गांवांत किंवा नगरांत जेथें शिवभक्त वास करील तेथें तहानभूक, दुष्काळ, रोग हीं असूं शकत नाहींत. (२३) चांडालाच्या गल्लींत जर शिवभक्त राहिला तर त्याची ती गल्ली शिवलोक होतो, व त्याचें घर शिवमंदीर होतें. (२४) कीकट देशांत देखील जर माहेश्वर लोक किंचित् वास्तव्य करतील तर तो देश काशी क्षेत्राप्रमाणेंच होईल. (२५) हे पार्वती मी कैलासांत, मेरुपर्वतावर किंवा मंदरावर राहत नाहीं तर जेथें माझे भक्त वास्तव्य करितात तेथें मी राहतों. (२६) ज्या क्षेत्रांत शिव किंवा माहेश्वर लोक नाहींत तेथें वस्ति करूं नये तें स्थान विंध्याटवीप्रमाणें मानावें. (२७) हे सुंदरि माझ्या भक्तांना यमलोकाचें किंवा संसाराचें भय नाहीं माझ्या भक्तांचें माहात्म्य केवढें ह्मणून सांगूं. स्कांदपुराणांत सांगतात कीं, (२८) सर्व आ-

नोऽपि सर्वाश्रमविवर्जितः ॥ भक्तिलेशयुतः स्कंद मत्प्रियो न गुणाधिकः ॥२८॥ यदि पापरतः क्रूरः स्वाश्रमाचारवर्जितः॥ मम भक्तो यदि भवेन्माननीयः सदैव हि ॥२९॥ पातके समनुप्राप्ते शिवभक्तगृहं व्रजेत् ॥ याचयेदन्नममृतं तदलाभे जलं पिबेत् ॥३०॥ सुदूरमपि गंतव्यं यत्र माहेश्वरो जनः ॥ प्रयत्नेनापि द्रष्टव्यस्तत्र संनिहितो हरः ॥३१॥ उपपातककोटींश्च ब्रह्महत्यायुतानि च ॥ दहत्यशेषपापानि शिवभक्तस्य दर्शनात् ॥३२॥ विष्णुनारदसंवादे ॥ दर्शनाच्छिवभक्तानां सकृत्संभाषणादपि ॥ अतिरात्रस्य यज्ञस्य फलं भवति नारद ॥३३॥ शिवभक्तं सकृन्निंदेद्यो जनः पापकर्मकृत् ॥ युगकोटौ क्रिमिर्भूत्वा विष्ठायां जायते पुनः ॥३४॥ सूकरः कोटिजन्मानि जायते शतकोटिशः ॥ मृगश्च कोटिजन्मानि शृगालः कोटिजन्मसु ॥३५॥ अंधः स्यात्कोटिजन्मानि कुब्जः स्यात्कोटिजन्मसु ॥ पंगुश्च शतजन्मानि पाषंडी जायते शतं ॥ उलूको वायसो गृध्रः सर्पसूकरगर्दभाः ॥३६॥ जायते म्रियते चैव निष्कृतिर्न विधीयते ॥ मद्भक्तान् द्वेष्टि यो मोहादपराध्यति चाधमः ॥

---

चारभ्रष्ट किंवा सर्व आश्रमहीन असा मनुष्य जरी किंचिद्भक्तिमान असला तरी हे स्कंदा तो माझा मित्र आहे मला त्याहून कोणीहि अधिक प्रिय नाहीं. (२९) पापी, क्रूर स्वाश्रमहीन असा जरी माझा भक्त असला तरी तो सर्वदा पूज्य होय. (३०) पातक जवळ आलें असतां शिवभक्ताच्या घराला जावें व अन्नामृत मागावें किंवा तें नसेल तर पाणी प्यावें. (३१) माहेश्वर फार लांब असतील तरी दूर जाऊन प्रयत्नानें त्यांचें दर्शन घ्यावें कारण तेथें शंकराचें सान्निध्य असतें. (३२) कोटिशः उपपातकें किंवा हजारो ब्रह्महत्यापातकें शिवभक्ताच्या दर्शनानें निःशेष दग्ध होतात. विष्णुनारद संवादांत ह्मटलें आहे कीं, (३३) हे नारदा शिवभक्ताचे एकवार दर्शनानें किंवा संभाषणानें अतिरात्रनामक यज्ञाचें फल प्राप्त होतें. (३४) जो पापी मनुष्य एकवार कां होईना शिवभक्ताची निंदा करितो तो कोटियुगपर्यंत क्रिमी होऊन पुनः नरकांत जन्म पावतो. (३५) कोटि जन्म डुकराच्या योनींत जाऊन पुनः मृगयोनींत शंभरकोट जन्म घेतो; व कोटि जन्म कोल्ह्याच्या योनींत जन्म घेतो. (३६) कोटि जन्म अंधत्व पावतो कोटि जन्म कुवडा होतो. कोटि जन्म लंगडा व शंभर जन्म पाखंडी होतो. घुबड, कावळा, गिधाड, सर्प, डुक्कर, गाढव, (३७) इत्यादि योनींत जन्म घेतो व पुनः मरतो त्याची

न सहे तं दुरात्मानं सहे मय्यपराधिनं ॥३७॥ मद्भक्तरक्षणायैव मम सर्वं हि चेष्टितं ॥ इति जानीत मद्भक्ताः प्राणेभ्योऽपि परं प्रियाः ॥३८॥ य इदं शृणुयान्नित्यं शिवस्य पुरतः सदा ॥ स विधूयाशु पापानि शिवसाधर्म्यमाप्नुयात् ॥३९॥ पुराणज्ञाय शांताय भूमिं दद्याद्विचक्षणः ॥ तदलाभे तु गां दद्याद्गोमूल्यं चैव भक्तितः ॥४०॥ भूषणानि च वस्त्राणि दद्याद्भक्तिसमन्वितः ॥ मद्भक्ता न विनश्यंति मद्भक्ता गतकल्मषाः ॥ आदावेव प्रतिज्ञातं न मे भक्तिः प्रणश्यति ॥४१॥

इति शैवरत्नाकरे माहेश्वरमाहात्म्यं नाम एकविंशोऽध्यायः ॥

॥ श्रीसांबशिवार्पणमस्तु ॥

---

त्यापासून सुटणूक होत नाहीं. माझा अपराध करणारा मला सहन होतो, परंतु जो अधम माझ्या भक्तांचा मोहानें द्वेष करितो व मोठा अपराध करितो तो दुष्ट मला सहन होत नाहीं. (३८) माझें सर्व अस्तित्व माझ्या भक्तांचें रक्षण करण्याकरितां आहे असें समजावें, माझे भक्त मला प्राणापेक्षां प्रिय आहेत. (३९) जो हें शिवापुढें नित्यशः श्रवण करील तो तात्काल सर्व पापांपासून मुक्त होऊन शिवसाधर्म्य पावेल. (४०) सुज्ञानें पुराणज्ञ व शांत अशा शिवभक्ताला जमीन द्यावी ती न मिळाल्यास गाय द्यावी किंवा भक्तिपुरःसर गायीची किंमत तरी द्यावी. (४१) भक्तियुक्त अंतःकरणानें त्यास भूषणें व वस्त्रें अर्पण करावींत. माझ्या भक्तांना नाश नाहीं व माझे भक्त निःपाप असतात. माझी भक्ति कधींहि नाश पावत नाहीं असें मी प्रथमतःच सांगितलें आहे.

ह्याप्रमाणें शैवरत्नाकरांतील माहेश्वरमाहात्म्य नांवाचा एकविसावा अध्याय पुरा झाला.



## स्वातंत्र्यात् स्त्रीणां शिवसंस्कारकर्मण्यनधिकारः

क्रियासारे त्रयोदशोपदेशे—

नाधिकारः स्वतो नार्याः शिवसंस्कारकर्मणि ॥ नियोगाद्भर्तुरस्त्यैव यदि भक्ता महेश्वरे ॥ ६७ ॥ तथैव भर्तृहीनायाः पुत्रादेरभ्यनुज्ञया ॥ अधिकारो भवत्येव कन्यायाः पितुराज्ञया ॥ ६८ ॥ शूद्राणामन्यजातीनां पतितानां विशेषतः ॥ तथाऽसंस्कारजातीनां नाध्वशुद्धिर्विधीयते ॥६९॥ तेप्यकृत्रिमभावाश्चेच्छिवे परमकारणे ॥ पादोदकप्रदानाद्यैः कुर्यात्पाशविशोधनम् ॥ ७० ॥

---

अर्थ—क्रियासारांतील तेराव्या उपदेशांत सांगितलें आहे कीं,—(६७) शिवसंस्कारकर्मांत स्त्रियांस स्वतंत्र अधिकार नाहीं. जर एखादी स्त्री शिवभक्त असेल तर (६८) तिला शिवसंस्कारांत पतीच्या आज्ञेनेंच अधिकार पोंचतो; त्याचप्रमाणें विधवेस व अविवाहित मुलीस अनुक्रमें पुत्राच्या व बापाच्या हुकुमानेंच शिवसंस्कारकर्मांत अधिकार प्राप्त होतो. (६९) अन्य जातीय शूद्रांस विशेषतः पापी जनांस व संस्कारविरहित जातींना षडध्वशुद्धि विहित नाहीं. (७०) परशिवाच्या ठिकाणीं जर त्यांची अकृत्रिम भक्ति असेल तर पादोदक वगैरे देऊन त्यांची पाशशुद्धि करावी ( मायापाशांतून मुक्त करावें ).